# शासनव्यवहारात मराठी

## (समस्या : स्वरूप : प्रक्रिया)

भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन

१ पदनाम कोश
२ वित्तीय शब्दावली
३ शासन व्यवहार कोश
४ ग्रंथालयशास्त्र परिभाषा कोश
५ गणितशास्त्र परिभाषा कोश
६ समाजशास्त्र परिभाषा कोश
७ तत्त्वज्ञान व तर्कशास्त्र परिभाषा कोश
८ वाणिज्यशास्त्र परिभाषा कोश
९ रसायनशास्त्र परिभाषा कोश
१० भूशास्त्र परिभाषा कोश
११ शारीर परिभाषा कोश
१२ शिक्षणशास्त्र परिभाषा कोश
१३ यंत्र अभियांत्रिकी परिभाषा कोश
१४ स्थापत्य अभियांत्रिकी परिभाषा कोश
१५ भौतिकशास्त्र परिभाषा कोश
१६ विद्युत अभियांत्रिकी परिभाषा कोश
१७ कृषिशास्त्र परिभाषा कोश
१८ जीवशास्त्र परिभाषा कोश
१९ शरीरक्रियाशास्त्र परिभाषा कोश
२० राज्यशास्त्र परिभाषा कोश
२१ साहित्य समीक्षा परिभाषा कोश
२२ लोकप्रशासन परिभाषा कोश
२३ अर्थशास्त्र परिभाषा कोश
२४ धातुशास्त्र परिभाषा कोश
२५ मानसशास्त्र परिभाषा कोश
२६ व्यवसाय व्यवस्थापन परिभाषा कोश
२७ मराठी लघुलेखन
२८ मराठी लघुलेखन मार्गदर्शिका
२९ मराठी टंकलेखन प्रवेशिका
३० प्रशासन वाक्प्रयोग
३१ प्रशासनिक लेखन
३२ राजभाषा परिचय
३३ राजभाषा परिचय कार्यरूप व्याकरण
३४ कार्यदर्शिका
३५ शुद्धलेखन नियमावली
३६ मंथन
३७ भारताचे संविधान

महाराष्ट्र शासन

# शासनव्यवहारात मराठी

## समस्या, स्वरूप व प्रक्रिया

भाषा संचालनालय महाराष्ट्र शासन

# प्रास्ताविक

सरकारी कार्यालयांच्या व त्यांतील कर्मचाऱ्यांच्या इंग्रजी नावांचे मराठी पर्याय देणारा ‘ पदनाम कोश ’ भाषा संचालनालयाद्वारे गेल्या वर्षी प्रकाशित करण्यात आला. शासकीय धोरणानुसार राज्यकारभाराच्या माध्यमाचे मराठीकरण करण्याच्या दृष्टीने टाकण्यात आलेले हे पहिले पाऊल होते. आजच्या पुढारलेल्या राज्यव्यवहारासाठी मराठी भाषा प्रथमच उपयोगात आणावयाची असल्याने तिचे शासनोपयोगी स्वरूप, विशेषत: तिच्यातील परिभाषा, निश्चित करणे आवश्यक होते. या कामी मराठीतील नामवंत भाषातज्ज्ञांचे व कोशकर्त्यांचे साहाय्य घेण्यात आले. भाषा सल्लागार मंडळाने ‘ पदनाम कोशा ’ तील मराठी संज्ञा राजभाषेच्या स्वरूपाचा व गरजांचा पूर्ण विचार करूनच ठरवल्या आहेत व याच धोरणानुसार इतर प्रशासनोपयोगी शब्द, विधिविषयक संज्ञा, शासनाच्या दैनंदिन व्यवहारात वापरात असलेले वाक्प्रचार इत्यादिकांचे मराठी पर्याय देणारे कोशही तयार करण्यात येत आहेत.

‘ पदनाम कोश ’ प्रकाशित झाल्यावर त्यातील पर्यायांसंबंधी काही वृत्तपत्रांनी अनुकूल अभिप्राय प्रकट केले, तर काहींनीं त्यासंबंधी नापसंती दर्शवून कडक टीका केली. ही उलटसुलट प्रतिक्रिया व्यक्त झाली ती राज्यकारभाराच्या भाषेचे स्वरूप कसे असावे यासंबंधीच्या मतभेदांतून. टीका प्रामाणिक मतभेदांतूनच झाली व अशा टीकाकारांत काही विचारवंत लोकही होते. म्हणून टीकाकारांचे समाधान होईल, त्यांनी उपस्थित केलेल्या शंकांचे निरसन होईल, अशा पद्धतीने शासन-व्यवहाराच्या भाषेसंबंधीची शास्त्रीय व व्यावहारिक भूमिका स्पष्ट करणे भाषा सल्लागार मंडळास अगत्याचे वाटले. राजभाषा म्हणून मराठीला पूर्वपरंपरा असली तरी पूर्वीच्या आणि आजच्या काळात व दृष्टिकोनात बराच फरक पडला आहे. शासन-व्यवहाराच्या नव्या परंपरा निर्माण झाल्या आहेत, नव्या गरजा उत्पन्न झाल्या आहेत. त्यानुसार राज्यकारभाराच्या भाषेचे स्वरूप कसे असावे या प्रश्नाचा पुनर्विचार करणे आज जरूर झाले आहे. ठराविक, एकाची दृष्टिकोनातून राजभाषेचा विचार करून आज भागणार नाही. पूर्वी भाषेच्या निरनिराळ्या क्षेत्रांतील उपयोगासंबंधीच्या

शास्त्रीय कसोट्या नव्हत्या त्या आज उपलब्ध झाल्या आहेत. इतर सर्व प्रश्नांप्रमाणे या प्रश्नालाही एक नवा भारतीय संदर्भ आज प्राप्त झाला आहे. या सर्व गोष्टी लक्षात घेऊन सदरहू प्रश्नासंबंधीची ऐतिहासिक पार्श्वभूमी, त्यामागची शास्त्रीय भूमिका व आजचा भारतीय संदर्भ स्पष्ट होईल अशा रीतीने शासनव्यवहारातील मराठी भाषेच्या स्वरूपासंबंधीचे सोपपत्तिक विवेचन करण्याची आवश्यकता होतीच. ती गरज भागवण्याच्या दृष्टीने प्रस्तुत पुस्तिका तयार करण्यात आली आहे.

'पदनाम कोशा' वरील निरनिराळ्या अभिप्रायांतून व टीकांतून जे मुद्दे उपस्थित झाले आहेत त्यांचा आधार पुस्तिकेतील विवेचनासाठी घेण्यात आला असला व त्या टीकालेखांतील उदाहरणांचा स्पष्टीकरणासाठी उपयोग करण्यात आला असला, तरी एकूण विवेचनामागील हेतू टीकेचा नसून राज्यकारभाराच्या भाषेसंबंधीचा यथार्थ दृष्टिकोन स्पष्ट व्हावा एवढाच आहे. या प्रश्नासंबंधीचे शास्त्रसंमत विचार लोकांना कळावे व राजभाषेसारख्या जनतेच्या जिव्हाळ्याच्या विषयाबाबत एक जाणते लोकमत तयार व्हावे, या विधायक दृष्टीतूनच या विषयाची सविस्तर चर्चा करण्यात आली आहे. राजभाषेच्या प्रश्नासंबंधीचा विचार कोणत्या दृष्टिकोनातून करणे जरूर आहे, एवढे जरी या विवेचनामुळे पटले तरी या पुस्तिकेचा उद्देश सफल झाला असे मानता येईल. वृत्तपत्रांना व विचारवंतांना ही भूमिका पटली म्हणजे या बाबतीतील शासकीय उपक्रमांना त्यांचे सहकार्य व पाठिंबा मिळेल हाही प्रस्तुत पुस्तिकेच्या प्रकाशनाद्वारे लाभ होणार आहे.

भाषा सल्लागार मंडळाच्या विनंतीवरून प्रस्तुत पुस्तिकेचा मसुदा तयार करण्याचे काम भाषा संचालनालयाचे उपसंचालक श्री. के. मा. आराध्ये यांच्याकडे सोपवण्यात आले होते. त्यांनी मंडळाची भूमिका उत्तम रीतीने मांडली. मंडळ त्याबद्दल त्यांचे आभारी आहे. त्यांनी तयार केलेल्या मसुद्यावर भाषा सल्लागार मंडळाने आपल्या बैठकीतून सांगोपांग व सविस्तर चर्चा करून व काही फेरफार सुचवून तो संमत केला आहे. राज्यकारभाराच्या भाषेसंबंधीचा मंडळाचा व शासनाचा दृष्टिकोन कोणता आहे हे स्पष्ट होण्याच्या कामी ही पुस्तिका उपयोगी ठरावी अशी अपेक्षा आहे.

**वा. ना. पंडित,**
सचिव,
भाषा सल्लागार मंडळ व
संचालक, भाषा विभाग, महाराष्ट्र शासन.

# अनुक्रम

'यश्च प्रकाशाप्रकाशयोः प्रकाशयिता शब्दाख्यः प्रकाशः
तत्रैतत् सर्वमुपनिबद्धं यावत् स्थास्नु चरिष्णु च ।'

— वाक्यपदीय १.१२

'We shall shape the pattern of our Languages and then the pattern of our Languages will shape us !'

—*Report of the Official Language Commission*

# भूमिका

महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीनंतर बहुसंख्य लोकांची भाषा म्हणून मराठीला या राज्यात राजभाषेचा मान मिळणे स्वाभाविकच होते लोकशाहीत राज्यकारभार जनतेच्या भाषेतूनच चालला पाहिजे ही जाणीव ठेवून शासनव्यवहारात शक्य तितक्या लवकर मराठीचा वापर करण्याचे धोरण महाराष्ट्र सरकारने जाहीर केले. या 'मराठीचिये नगरी' तिला तिचे राजभाषेचे उचित ते स्थान मिळाले आणि दीडशे वर्षे खंडित झालेली परंपरा पुन्हा सांधण्यात आली. एवढा दीर्घकाळ मराठीला राजमान्यता नसल्याने एक साहित्याचे क्षेत्र सोडले तर अन्य क्षेत्रांतील तिच्या विकासाच्या वाटा अवरुद्ध झाल्या होत्या. शिक्षण आणि प्रशासन, तंत्र आणि विज्ञान, व्यापार आणि उद्योग, कला नि शिल्प या लोकव्यवहाराच्या नानाविध अंगांनी व्हावयाची तिची वाढ खुरटली होती. याला कारण म्हणजे परकीय भाषेच्या वर्चस्वाचे सावट जसे तिच्यावर आले होते तसेच राजाश्रयाचे खतपाणीही तिला मिळाले नव्हते, हे होय. राजभाषा म्हणून मराठीला मिळालेली मान्यता ही आता एकपरी तिच्या विकासाची सनदच होय. मराठी आता सर्वांगी फुलेल, वहरेल ऱ्यात शंका

असण्याचे कारण नाही. पण हे सर्व घडून येण्यास बराच कालावधी लागेल. शासनाची तत्काळ निकड होती ती प्रशासनाची भाषा म्हणून मराठीचा उपयोग करता येण्याची. प्रशासनिक भाषा म्हणून मराठीचा विकास व वापर करण्याचे धोरण त्वरेने अमलात आणता यावे म्हणून सरकारने भाषा विभागाची निर्मिती केली. याबरोबरच सदर कामात मराठीतील अधिकारी विद्वानांचे व नामवंत भाषा-तज्ञांचे मार्गदर्शन व सहकार्य मिळवण्याच्या दृष्टीने भाषा सल्लागार मंडळ नेमण्यात आले. सर्व प्रकारच्या शासनव्यवहारास आवश्यक अशी परिभाषा तयार करण्याचे काम या मंडळाकडे सोपवण्यात आले.

परिभाषानिर्मितीच्या कार्यातील पहिला टप्पा म्हणून भाषा सल्लागार मंडळाने सुरुवातीस 'पदनाम कोश' तयार केला व तो शासनाकडून प्रकाशित करण्यात आला. सरकारी कार्यालये, त्यातील अधिकारी व कर्मचारी यांच्या इंग्रजी पदसंज्ञांचे मराठी पर्याय या कोशात देण्यात आले आहेत. ज्यांना ही पदनामे वापरायची आहेत अशा सरकारी कर्मचाऱ्यांचा, मराठीकरणाविषयी आस्था असलेल्या विद्वानांचा व जनमताचे प्रतिनिधित्व करणाऱ्या निरनिराळ्या वृत्तपत्रांचा या मराठी पर्यायांविषयी अभिप्राय काय आहे, हे जाणून घेणे ते रूढ होण्याच्या दृष्टीने अगत्याचे होते. सरकारी कार्यालयांनी हे पर्याय पदनामांशी संबंधित कामाची नीट कल्पना देणारे व अन्वर्थक असल्याचा निर्वाळा दिला. विद्वानांच्या व वृत्तपत्रांच्या अभिप्रायांत मात्र याबाबत दोन मते दिसून आली. स्वतःला अभिप्रेत असलेल्या प्रशासनिक भाषेच्या कल्पनेस अनुसरून त्यांपैकी काहींना ही परिभाषा सुयोग्य व प्रशंसार्ह वाटली तर काहींनी ती सदोष ठरवून तिच्यावर टीका केली. ही टीका मूलतः दोन दृष्टिकोनांतून झाली.

पहिला दृष्टिकोन शुद्धीकरणवादी म्हणता येईल. परकीय शब्दांची हकालपट्टी करून त्यांऐवजी केवळ स्वकीय शब्दांचा वापर व्हावा, अशा दृष्टीतून त्यांनी या परिभाषेकडे पाहिले. कोशातील पुष्कळसे

पर्याय नव्याने तयार करावे लागल्याने बरेचदा त्यांसाठी संस्कृत भाषेचा आश्रय घ्यावा लागला. हे शुद्धीकरणाच्या भावनेतून झाले असा त्यांचा ग्रह ; व 'रेडिओ, पोलीस, कारकून, महसूल असे कोशात राहून गेलेले इंग्रजी व उर्दू शब्द वेचून काढून त्याजागी संस्कृतोद्भव शब्द घ्यावे' हा त्यांचा पुढील आग्रह. केवळ रूढ आहेत म्हणून अशा शब्दांना मराठी परिभाषेत स्थान मिळू नये, असे त्यांचे म्हणणे होते. ही परिभाषा राज्यातील मराठी, कानडी, तेलगू, गुजराती, हिंदी या पाचही भाषिकांना समजली पाहिजे हे एक, आणि भारतातील सर्व राज्यांत सारखे पर्याय रूढ झाले पाहिजेत हे दुसरे. अशा दोन्ही कारणांस्तव परिभाषा संस्कृतोद्भव असावी असा त्यांचा या संबंधातला युक्तिवाद आहे.

दुसरा दृष्टिकोन रूढवादी म्हणावा लागेल. प्रतिक्रियेचे हे दुसरे टोक होते. शुद्धीकरणवाद्यांनी गुण म्हणून ज्याचा उल्लेख केला तोच नेमका या वर्गातील टीकाकारांना कोशाचा सर्वात मोठा दोष वाटला. त्यांना या कोशावर 'संस्कृत पांडित्याचा ठसा' उमटलेला आढळला. या टीकाकारांचे आक्षेप क्रमवार पुढीलप्रमाणे सांगता येतील :—

(१) कोशातील परिभाषेत 'संस्कृतिनिष्ठेऐवजी संस्कृतनिष्ठेवर' भर देण्यात आला आहे. संस्कृतीकरणाची ही प्रवृत्ती मराठीच्या स्वभावाला न जुळणारी असून तिचे मूळ आज प्रचारात येऊ पाहणाऱ्या कृत्रिम व बोजड हिंदीच्या अंध अनुकरणात आहे.

(२) रूढ व मराठीत स्थिरावलेल्या शब्दांची हकालपट्टी करण्यात आली आहे. खाते, हुद्दा, कायदा, इंजिनियर, मॅजिस्ट्रेट इत्यादी आतापर्यंत वापरात असलेले शब्द हुसकून लावणे ही प्रतिगामी वृत्ती होय.

(३) पर्याय सोपे, सरळ आणि सुबोध नाहीत. कोशातील प्रभारी, परिवहन, अभियंता इत्यादी शब्द क्लिष्ट, दुर्बोध व अपरिचित असून बहुजनसमाजाला—शेतकऱ्याला व कामगाराला—कळण्याजोगे नाहीत.

(४) कोशावरून निष्पन्न होणारे मराठीचे भाषिक स्वरूप सामान्य जनांच्या बोलीचे नाही. ही भाषा नित्य व्यवहाराच्या

मराठीपासून दूर असून ती प्रचलित करणे म्हणजे मराठीच्या संसारात ढवळाढवळ करणे होय. शेतकऱ्याच्या झोपडीत व गवळ्याच्या गोठ्यात ऐकू येणारी व दळणकांडण करणाऱ्या बहिणाबाईच्या जिभेवर नाचणारी मराठी भाषाच राजभाषा झाली पाहिजे.

(५) " तुकाराम-रामदास यांची मराठी हीच राजभाषा म्हणून मिरवली पाहिजे. 'अमृतातेही पैजा जिंके' अशा मराठी भाषेत कोश तयार झाला पाहिजे. "

वरील दोन्ही मतांचा सविस्तर निर्देश केला आहे तो अशासाठी की या उलटसुलट प्रतिक्रियांतून, प्रशासनात वापरायच्या मराठीच्या स्वरूपा-संबंधी निरनिराळ्या लोकांच्या काय अपेक्षा आहेत याची नीट कल्पना यावी. शुद्धीकरणवाद्यांनी संस्कृतनिष्ठ मराठीचा वापर पुरस्कारलेला आहे. रूढ इंग्रजी, उर्दू शब्दांची उचलबांगडी केल्याने भाषेचे मराठी-पण कमी होत नसून उलट त्यातील स्वकीयत्वाच्या आविष्काराने ते अधिक उजळून दिसेल, अशी त्यांची भावना आहे. या उलट प्रशासनातील भाषेच्या वापरात तिचे सामान्य जनतेस परिचित असलेले रूढ स्वरूप अविकृत राहावे हा मराठीच्या प्रेमापोटीच रूढवाद्यांनी धरलेला आग्रह आहे. मराठीवर संस्कृतचे आणि पर्यायाने हिंदीचे अप्रत्यक्ष आक्रमण होत आहे, मराठीचे मराठमोळेपण धोक्यात आले आहे, असा त्यांचा आक्षेप आहे. या दोहोंपैकी कोणते मत योग्य, की यांहून एखादे तिसरे मत सयुक्तिक हे कालांतरानेच ठरणार असले तरी त्यांतून निर्माण होणारी समस्या मात्र खरी आहे. आकारास येत असलेल्या उद्याच्या प्रशासनिक मराठीचे स्वरूप कसे असावे हे वस्तुनिष्ठ व शास्त्रीय भूमिकेतून ठरवण्याची आज गरज आहे. या प्रश्नाचा पायाशुद्ध विचार करताना त्याची ऐतिहासिक पार्श्वभूमि काय आहे, तो सोडवताना कोणत्या शास्त्रीय कसोट्या वापराव्या, आजच्या व्यापक राष्ट्रीय संदर्भात त्यासंबंधी कोणता दृष्टिकोन स्वीकारावा, या सर्व गोष्टींचा सखोल ऊहापोह झाला पाहिजे. या उद्देशानेच पुढील चर्चेचा उपक्रम करण्यात आला आहे.

# मराठीची संस्कृती : काळची, आजची आणि उद्याची

**म**राठी भाषेचे प्रशासनिक स्वरूप कसे असावे यासंबंधी दिसून येणाऱ्या दोन वेगळ्या विचारसरणींचा भूमिकेत उल्लेख करण्यात आला आहे. त्या विचारसरणी लक्षात घेता, या प्रश्नाकडे पाहण्याचा एक सर्वसाधारण दृष्टिकोन दिसून येतो. हा दृष्टिकोन भाषेच्या संस्कृतीविषयीचा होय. भाषेला एक संस्कृती असते, मराठीलाही एक विशिष्ट संस्कृती आहे, ही सामान्य भूमिका दोन्ही विचारसरणींत गृहीत धरली आहे. एका विचारसरणीत या संस्कृतीत बदल घडून येऊ नये असा आग्रह आहे, तर दुसरी विचारसरणी, या संस्कृतीचे आजचे वळण काही विशिष्ट आदर्शांनुसार नि आवश्यकतेनुसार बदलले पाहिजे अशी आहे. भाषेच्या संस्कृतीची ही सामान्य भूमिका आधारभूत समजून मराठीच्या प्रशासनिक स्वरूपाची चर्चा करणे युक्त ठरेल.

भाषेला संस्कृती असते म्हणजे काय ? भाषा ही समाजव्यवहाराचे साधन, त्या व्यवहाराचा अंगभूत भाग असल्यामुळे त्या त्या भाषिक समाजाच्या परंपरेचा व संस्कृतीचा ठसा तिच्यावर सतत उमटत असतो. या दृष्टीने मराठी भाषेची आजची घटना व तिच्यातला शब्दसंग्रह हा मराठी समाजाच्या विशिष्ट परंपरेचा आणि इतिहास-

क्रमाचा परिपाक होय, असें म्हणता येईल. मराठीची संस्कृती ती हीच. विशिष्ट काळातील परंपरेचा परिणाम व त्या काळातील ऐतिहासिक आवश्यकता यांनुसार मराठीच्या घटनेत फरक पडत आला आहे. मराठीची बाह्य घट्टना अशी सिद्ध होत असताना याच इतिहासातून व परंपरांतून तिने काही विशिष्ट प्रेरणाही ग्रहण केल्या आहेत. मराठीची बाह्य घटना हे जर तिचे शरीर, तर या प्रेरणा म्हणजे तिचा आत्मा. या प्रेरणांना तिचा स्वभाव, तिची संस्कृती म्हणता येईल. मराठीच्या रूपपरिवर्तनात या प्रेरणांनाही महत्त्वाचे स्थान आहे. मराठीच्या ह्या प्रेरणा कोणत्या ?

**सांस्कृतिक प्रेरणा**

स्वयंसिद्ध आत्मविश्वास हा मराठीला तिच्या इतिहासापासून मिळालेला वारसा आहे. संतमंडळाने तिच्या सांस्कृतिक मूलधनाची जोपासना केली. स्वत्वरक्षणाचा बाणा हा तिला लाभलेला संतांचा प्रसाद होय. महाराष्ट्रीयत्वाच्या अभिमानाचे बाळकडू तिला आरंभा-पासूनच मिळाले होते. “साठी लक्ष देश महाराष्ट्र । तेथिचे शिहांणे सुभटू । वेदशास्त्रचातुर्याची पेठू । भरैली तिये देशीं ।। ऐसे ते महाराष्ट्रराये सुंदरू । वरी महाराष्ट्रभाषा चतुरू । तेहीं वसविलें गंगातीरू । क्षेत्र त्र्यंबकू वेन्हीं ।। ” महानुभावांचा हा महाराष्ट्राचा अभिमान शतके उलटली तरी मराठी अविच्छिन्नपणे वागवीत आली आहे. पण तिचा महा-राष्ट्रीयत्वाचा अभिमान केवळ प्रादेशिक नाही; तो महाराष्ट्रीयत्वाहूनही मोठ्या भारतीयत्वाशी एकरूप झाला आहे. मोगली सत्तेच्या सर्वग्रासी आक्रमणाशी तिने मुकाबला केला तो हिंदवी स्वराज्याचे भव्य स्वप्न तिने पाहिले होते म्हणून. याच भावनेतून इंग्रजांच्या भारतातील वाढत्या वर्चस्वालाही पायबंद घालण्याचा तिने प्रयत्न केला व त्यांच्याशी अखेरचा सामना देऊनच ती राजसिंहासनावरून खाली उतरली.

धर्मकारण म्हणून महानुभावांनी ही मराठी काबूलकंदहारपर्यंत नेली, तर मराठी राज्यकर्त्यांनी तिच्या राजकारणाचा झेंडा अटकेवर

नेऊन पोचवला. चक्रधर-नागदेवाचार्यांनी तिला जनतेचा जिव्हाळा दिला, ज्ञानेश्वर-एकनाथांनी तिला धर्माची खूण सांगितली आणि तुकाराम-रामदासांनी या धर्मासाठी झुंजावे नि मरावे कसे हे शिकविले. शिवाजी महाराजांनी तिचे राज्य जसे निर्माण केले तशीच तिला एक सुसंघटित राष्ट्रीय संस्कृती प्राप्त करून दिली. या संस्कृतीच्या रक्षणासाठी व प्रसारासाठी थोरल्या बाजीरावांनी व माधवरावांनी तिच्या ठिकाणी विजिगीषा निर्माण केली.

मराठीची ऐतिहासिक व सांस्कृतिक परंपरा अशी वैशिष्टचपूर्ण आहे. राजकारण, धर्मकारण व लोकव्यवहार या सर्व क्षेत्रांत मराठी समर्थपणे वावरली आहे. या सर्व ठिकाणी सामान्य जनतेची ती प्रेरणा झाली व सामान्य जनतेबरोबरच ती राहिली. महाराष्ट्राच्या स्वत्वरक्षणाचा आग्रह जसा तिच्या ठिकाणी आहे तसाच दुसऱ्यांना सामावून घेण्याचा उदारपणाही आहे. परंपरेची ती पूजक असली तरी तिच्या चौकटीत ती बंदिस्त झाली नाही. याचे कारण लोक-जीवनाशी समरस झाल्याने ती काळाबरोबर राहू शकली, प्रवाहाबरोबर वाहू शकली. प्रादेशिकतेची जाण ठेवूनही राष्ट्रीयत्वाचे तिचे भान कधीही सुटले नाही.

मराठीच्या या सांस्कृतिक प्रेरणा आहेत. इतिहासाच्या निरनिराळ्या कालखंडांतून तिची घडण कशी होत गेली, तिचे स्वरूप कसे पालटत गेले, याचा मागोवा घेताना तिच्या वरील प्रेरणांच्या अनुरोधाने या परिवर्तनाचा उलगडा आपणास करता येईल. याबरोबरच प्रशासनिक भाषा म्हणून तिच्या स्वरूपात होऊ घातलेला कमीजास्त बदल हा किती प्रमाणात या प्रेरणांशी जुळणारा आहे याचा देखील अंदाज लागेल.

### इतिहासावर दृष्टिक्षेप

मराठी भाषेच्या गेल्या सातआठशे वर्षांच्या ज्ञात इतिहासावर दृष्टिक्षेप टाकला तर तिच्या स्वरूपात लहानमोठी परिवर्तने सतत होत आली आहेत, हे ध्यानात येऊ शकेल. इतिहासाच्या

निरनिराळ्या कालखंडांत तर ही स्थित्यंतरे दिसून येतातच, परंतु एकाच कालखंडातही तिची रूपे वेगवेगळी असल्याचे दाखवून देता येईल. परभाषिकांची आक्रमणे, राज्यक्रांत्या आणि धार्मिक चळवळी, अन्य संस्कृतींशी संघर्ष व त्यांचा संपर्क अशा अनेक कारणांनी मराठीची रूपे बदलत आलेली दिसतील. हे बदल ठळक स्वरूपाचे आहेत. भाषेच्या स्वरूपात नित्यशः थोडाफार फरक पडण्याची क्रिया तशी अबाधितपणे चालूच असते. तिचा विचार येथे करावयाचा नाही. भाषा ही सर्वकाळ एकच रहावी असा आग्रह अटळ इतिहासक्रमापुढे टिकू शकणारा नाही. भाषाशास्त्रालाही तो मान्य नाही.

अगदी आरंभी मराठीचे स्वरूप कसे होते हे सांगणे आज दुरापास्तच आहे. पण ज्ञानेश्वर-मुकुंदराजांच्या व महानुभावांच्या काळची मराठी आपण प्रमाण मानली तर तिचा घाट शुद्ध मराठी, म्हणजे इतर भारतीय भाषांनी अस्पृष्ट असा आहे. ती संस्कृत-प्राकृत अपभ्रंश अशा स्वरूपात परिवर्तित झाल्याने या भाषांतील शब्दसंग्रहावरच तिचे पोषण झाले आहे. प्रौढ सरणीचा अवलंब करताना शब्दांसाठी ती आपल्या मूळ स्रोताकडे—संस्कृतकडे—वळते, हे मात्र लक्षात ठेवले पाहिजे. या भाषेवर तसा शेजारच्या कानडी व तेलगू भाषांचा परिणाम झाला असला तरी त्या तिच्या जन्मकाळीच्या खुणा आहेत. मुसलमानी आक्रमणाची झळ अजून महाराष्ट्राला लागलेली नव्हती. त्यामुळे फार्शीचा संसर्ग मराठीला या काळात झाला नव्हता. क्वचित उत्तर भारतातून झिरपत आलेले पेरोज, रुका, निसाण असे चारआठ फार्शी शब्दच[1] काय ते या यादवकालीन मराठीत आढळून येतात.

**फार्शीचे आक्रमण**

यानंतरचा कालखंड बहामनीकालीन मराठीचा म्हणता येईल. यादवांची मराठी राजवट संपुष्टात येऊन बहामनी राज्याची स्थापना

[1] डॉ. तुळपुळे : यादवकालीन मराठी भाषा, पृ. ३४३–४४.

झाली, तेव्हापासून शिवछत्रपतींच्या स्वराज्यस्थापनेपर्यंत जवळपास तीन शतके महाराष्ट्र मुसलमानी सत्तेखाली होता. मराठीच्या मोठ्या प्रमाणावरील रूपपरिवर्तनास हे परभाषिकांचे आक्रमण व त्यांचा दीर्घकालीन अंमल या गोष्टीच मुख्यत्वेकरून कारणीभूत झाल्या. या काळात फार्शी ही राज्यकारभाराची भाषा झाली. राज्यकर्ते व त्यांच्या संपर्कात येणारा उच्चवर्ग व पांढरपेशा समाज यांच्या प्रभावाने मराठीवर फार्शीचे प्रत्यक्षाप्रत्यक्ष आक्रमण सुरू झाले. या मुसलमानी राजवटीचा परिणाम महाराष्ट्राचा धर्म व संस्कृती यांवर जेवढा होऊ शकला नाही तेवढा तो राज्यकारभाराच्या मराठी भाषेवर झाला. फार्शीचा परिणाम सरकारदरबारी जेवढ्या लवकर व जितक्या प्रमाणात झाला तसा तो बहुजनसमाजाच्या भाषेवर किंवा वाङ्मयीन भाषारूढीवर झाला नाही. सरकारी कामकाजाच्या गरजे-नुसार फार्शी शब्दांचा जो एक लहानसा प्रवाह मराठीत प्रविष्ट झाला त्यानेच पुढे प्रचंड लोंढ्याचे स्वरूप धारण केले. या कालखंडाच्या शेवटच्या उपलब्ध पत्रव्यवहारावरून राजवाड्यांनी जे फार्शी व मराठी शब्दांचे प्रमाण काढले आहे त्यात मराठी शब्द फक्त शेकडा १४·४ इतकेच आहेत.[१]

या कालखंडातल्या मराठी भाषेचे स्वरूप पाहता दोन प्रवृत्ती दिसून येतात. राज्यव्यवहाराशी संबंध येणारी भाषा आणि वाङ्मयीन व धार्मिक ग्रंथांत उपयोजिलेली भाषा अशी तिची दोन रूपे एकाच वेळी रूढ होती. व्यावहारिक गरज म्हणून मराठीने पहिल्या प्रकारच्या भाषेत फार्शी शब्दांच्या प्रवेशास विरोध केला नाही. ते शब्द आत्मसात करून घेतले. भाषाशास्त्रीय दृष्टीने पाहिले तरी अखेरीस भाषा हे समाजव्यवहाराचे एक साधनच आहे. तो व्यवहार सुकर होईल असेच रूप ती ग्रहण करते. वाङ्मयीन स्वरूपाच्या बाबत मात्र भाषा ही संस्कृतिवाहक असल्यामुळे मराठीने आपली सांस्कृतिक अस्मिता नष्ट होऊ दिली नाही.

[१]डॉ. ग्रामोपाध्ये : पेशवे दप्तरातील मराठीचे स्वरूप (प्रस्तावना, पृ. ११).

आपल्या संस्कृतीचा मूळ झरा असलेल्या संस्कृत भाषेशी तिने आपला दुवा अखंड राखला आणि फार्शी शब्दांचा वाङमयातील प्रवेश थोपवून धरला.

**मराठीचा उत्कर्षकाळ**

बहामनी काळानंतर मराठी राज्यसत्तेचा काळ येतो. मराठी धर्म, मराठी संस्कृती व मराठी भाषा यांच्या अभ्युदयाचा हा काळ होय. मराठी राज्य निर्माण केल्यानंतर ही स्वराज्यभावना अखंड जागृत ठेवण्यासाठी छत्रपती शिवाजी महाराजांनी स्वभाषेचा पुरस्कार केला. फार्शीचा मराठीवरील प्रभाव यावेळी पराकोटीस पोचला होता. राज्यव्यवहारातच नव्हे, तर त्याद्वारे सामान्य व्यवहारातील मराठी भाषेवरही झालेले फार्शीचे आक्रमण हा एक चिंतेचा विषय झाला होता. राजवाड्यांनी गणना केलेल्या पत्रव्यवहारातील फार्शी व मराठीच्या प्रमाणाचा याआधी जो उल्लेख आला आहे तो या काळातीलच, म्हणजे इ. स. १६२८ मधील होय. मराठी भाषेला पुन्हा तिची प्रतिष्ठा मिळवून देण्यासाठी शिवाजी महाराजांनी आधी तिला राजभाषेचे स्थान दिले. आणि 'यवनवचनैर्लुप्तसरणीम्' अशा दैन्यावस्थेला तिला पोचवण्यास कारण झालेल्या फार्शी शब्दांचे उच्चाटन करून त्याजागी मराठी शब्द वापरण्याच्या उद्देशाने त्यांनी 'राज्यव्यवहार कोश' तयार करवला व आपल्या अष्टप्रधानांची फार्शी पदनामे बदलून संस्कृत पदनामे रूढ केली. सदरहू कोश हा मराठीतला नसला तरी मराठीसाठी केलेला पहिला प्रशासनकोश होय, हे त्याचे ऐतिहासिक महत्त्व मान्यच केले पाहिजे. मराठीच्या शुद्धीकरणाचा हा प्रयत्न केवळ उर्दू-फार्शीच्या विरोधातनच केला गेला असे समजणे बरोबर नाही. मराठी भाषा ही सर्वस्वी फार्शीच्या आहारी जात होती तिला वाचवण्याचा तो प्रयत्न होता. या प्रयत्नाचे यश राजवाड्यांनी तत्कालीन पत्रव्यवहारातील फार्शी व मराठी शब्दांचे जे प्रमाण दिले आहे त्यावरून लक्षात येईल. इ. स. १६२८ मध्य मराठीचे जे प्रमाण १४·४ होते तेच १६७७ त ६२·२ इतके वाढले.

पेशवेकालात वरील शिवकालीन भाषिक धोरणाचा पाठपुरावा करण्यात आला नाही. त्यामुळे मराठीवर फार्शीचा उरलासुरला परिणाम

कायमच राहिला. या काळाच्या मराठीने आपल्या समावेशक प्रवृत्तीतून फार्शी शब्दांना मराठी व्याकरणाचे नियम लावून त्यांचे जसे मराठीकरण केले तसेच फार्शीतील शब्द, उच्चार, अव्यये, प्रयोग हेंही आत्मसात केले.[१] या कालखंडातही मोरोपंत, श्रीधर, महीपती इत्यादी कवींच्या वाङ्मयीन रचनेमुळे मराठीचे शुद्ध स्वरूप कायम राहिले. पण ते केवळ ग्रांथिक भाषेपुरतेच मर्यादित होते. मराठीतील शाहिरी रचनाकारांनी मात्र सामान्यांच्या भाषेतील फार्शी शब्दांनी प्रभावित झालेली धाटणी काही अंशी अवलंबिली व ती भाषेत अधिक रुजवली. बहामनी कालापासून तो पेशवाईचा अस्त होईपर्यंत मराठीचा फार्शीशी जवळपास ५०० वर्षांइतका दीर्घकाळाचा संपर्क आला. या संपर्कामुळे ओळखू न येण्याइतके मराठीचे स्वरूप पालटू शकले असते. पण मराठीच्या ज्या प्रेरणांचा वर निर्देश केला आहे त्या अधिक प्रभावी ठरल्या आणि शब्दसंग्रहाचा काही भाग सोडल्यास मराठीची मूळ प्रकृती कायमच राहिली.

### नवे वळण

पेशवाईच्या अस्तानंतर इंग्रजी राजवटीचा कालखंड सुरू होतो. हे जे सत्तांतर झाले त्याने भारताचा सारा चेहरामोहराच बदलून टाकला. महाराष्ट्र विद्याकलाशास्त्रसंपन्न अशा एका पुढारलेल्या संस्कृतीच्या संपर्कात आला. या संस्कृतीचा प्रत्यक्ष प्रभाव विचारावर जेवढा पडला तेवढा मराठीच्या भाषिक घडणीवर पडला नाही. फार्शीने मराठीचा शब्दसंग्रह जसा व्यापला तसा प्रकार इंग्रजी राजभाषा असूनही तिच्याबाबत झाला नाही. प्रौढ गद्य लेखनाची परंपरा मराठीत सुरू झाली ती संस्कृतज्ञ शास्त्रीपंडितांकडून. त्यामुळे इंग्रजी भाषेपेक्षा संस्कृतचाच परिणाम याकाळी मराठीच्या शब्दसंग्रहावर अधिक झाला. पेशवेकालापर्यंत टिकून असलेला

---

[१] डॉ. ग्रामोपाध्ये : पेशवे दप्तरातील मराठीचे स्वरूप (प्रस्तावना, पृ. १२).

फार्शीचा प्रभाव नष्ट झाला तो इंग्रजीचा परिणाम नसून या शास्त्रीपंडितांच्या संस्कृत शैलीचा होय. मराठी लिखाणात फार्शी शब्द वापरण्याच्या बाबतीत, " (ते) इतर साधारण व्यवहारी सरासरी बरे दिसतात; परंतु शास्त्रीय व्यवहारासंबंधी प्रौढ म्हणन जी भाषा तीत तर अगदीच शोभत नाहीत ;" असा शास्त्रीमंडळींचा दृष्टिकोन होता.[१] संस्कृतचा आश्रय घेतल्यामुळे नवीन इंग्रजी शब्द जसेच्या तसेच घेण्याचा प्रसंग मोठ्या प्रमाणावर याकाळी आला नाही.

प्रशासनिक भाषा इंग्रजी होती व तिचा सामान्य जनतेशी शासन-व्यवहाराद्वारा संबंधही येत होता. पण या कारणाने इंग्रजी शब्द मराठीत फार मोठ्या संख्येत आले नाहीत. राज्यकारभारात पूर्वी रूढ असलेले फार्शी पर्याय हाताशी असल्याने तेच इंग्रजीऐवजी बरेचदा स्वीकारण्यात आले. इंग्रजी राजभाषा असल्यामुळे शासनाच्या साऱ्याच अंगोपांगांशी मराठीचा संबंध येण्यास वाव नव्हता. सामान्य व्यवहारापुरती परिभाषेची गरज अशा रीतीने इंग्रजी व फार्शी पर्याय कामचलाऊ पद्धतीने स्वीकारून भागवण्यात आली.

इंग्रजी राजवटीच्या आरंभकाळात इंग्रजीतील शास्त्रीय विषयां-वरील पाठ्यपुस्तके नव्याने तयार करावी लागली. अशा वेळी मराठीत इंग्रजी शब्दांचा प्रवेश मोठ्या प्रमाणावर होण्याची शक्यता होती. पण हे काम संस्कृतातील शास्त्रे पढलेल्या पंडितांच्या हाती आल्याने ही शास्त्रीय परिभाषा संस्कृतच्या आधारे तयार झाली.

थोडक्यात, इंग्रजी राजवटीत मराठीच्या शब्दसंग्रहावर परभाषेचे आक्रमण फारसे झाले नाही. मात्र या भाषेच्या व तिच्या संस्कृतीच्या संपर्काने मराठीचा नवनवीन विषयांशी संबंध येऊन तिच्या व्यवहाराच्या कक्षा विस्तारल्या आणि अभिव्यक्तीचे सामर्थ्यही वाढले. एकोणिसाव्या शतकापासून मुद्रणालयाचा प्रसार, दळणवळणाची साधने, वृत्तपत्रे इत्यादी सोयी झाल्यामुळे मराठी भाषिक परस्परांच्या

---

[१] य. रा. दाते : महाराष्ट्र भाषाभ्यास (मराठी भाषेची वाढ, पृ. १५).

अधिक निकट संपर्कात आले. शिक्षणाचा प्रसारही मोठ्या प्रमाणावर झाला. अशा रीतीने भाषेचा परस्पर व्यवहार वाढला. त्यामुळे या काळात मराठीला एकात्म व सर्वसंग्राहक असे स्वरूप प्राप्त होऊ लागले.

आरंभापासून तो आजवरच्या मराठीच्या घडणीचा हा समग्र चित्रपट नजरेपुढे आणला तर आपणास काय दिसून येते? परकीय भाषांचे प्रबळ असे राजकीय वर्चस्व असो की सांस्कृतिक वर्चस्व असो, मराठीने आपले वैशिष्टय कायम राखले आहे ते संस्कृत भाषेच्या आधाराने. याचे भाषिक साधर्म्याइतकेच महत्त्वाचे कारण सांस्कृतिक अनुबंध हेही होय. जीवनसरणी, तत्त्वज्ञान, शास्त्र, परंपरा, आदर्श या सर्व बाबतींत मराठी ही संस्कृतपासून दूर नव्हती. या जवळिकेमुळेच आपली सांस्कृतिक अस्मिता टिकवण्यासाठी मराठीने दरवेळी आपल्या उगमस्रोताकडे धाव घेतली आहे. मराठीची संस्कृतिनिष्ठा ही एकपरी संस्कृतनिष्ठाच ठरावी असे हे या सर्वकाळातील दृश्य आहे.

## नव्या युगाची सुरुवात

इंग्रजी शासनकाळात मराठीचे आजचे स्वरूप उत्क्रांत झाले हे आपण पाहिले. इंग्रजी भाषेचा संपर्क मराठीला अनेक दृष्टींनी उपकारक ठरला. मराठीच्या बाह्य स्वरूपाच्या बाबतीत जशी तिला नवी मोडणी मिळाली, तसेच तिने काही नव्या प्रेरणाही ग्रहण केल्या. हे 'वाघिणीचे दूध' मिळाल्यामुळे तिची स्वत्वभावना व स्वातंत्र्यप्रेम अधिक प्रखर झाले. तिचा दृष्टिकोन समाजाभिमुख आणि जनवादी झाला. शास्त्र, कला, विज्ञान इत्यादींची नवनवी संचारक्षेत्रे उपलब्ध झाल्यामुळे कर्तृत्वास अवसर मिळून तिचा आत्मविश्वास बळावला. पण या सर्वांहून महत्त्वाची गोष्ट म्हणजे महाराष्ट्राच्या स्थितीपेक्षा 'आमच्या देशाच्या स्थिती'कडे तिचे लक्ष गेले. भारतातील इतर भाषांच्या बाबतीतही हेच घडले. शिक्षण इंग्रजीतून, केंद्र सरकारचा व प्रांत-सरकारांचा कारभार इंग्रजीतून, असे सार्वत्रिक व्यवहाराचे एकच माध्यम, निदान शिक्षितांपुरते तरी, उपलब्ध झाल्याने देशातील निरनिराळे

प्रदेश जवळ आले, त्यांच्या भाषा जवळ आल्या. या ऐक्यास पोषक अशा राष्ट्रीय व प्रागतिक विचारांचा प्रभाव इंग्रजी वाङ्मयाद्वारे प्रसृत होतच होता. या सर्वांतून राष्ट्रैक्याची भावना साकारली.

राष्ट्रवादाच्या या जाणीवेतूनच स्वातंत्र्याचे देशव्यापी आंदोलन उभे राहिले. देशातील निरनिराळ्या प्रदेशांनी आपली भाषिक भिन्नता विसरून परकीय सत्तेविरूद्ध एकजुटीने उठाव केला. या एकीकृत भारतीय जनशक्तीपुढे इंग्रजांचा निभाव लागला नाही व त्यांना मुकाट्याने सत्तांतर करावे लागले. देश स्वतंत्र झाला आणि भारताचे संपूर्ण-प्रभुत्व-संपन्न प्रजासत्ताक संघराज्य निर्माण झाले. भारताचे राजकीय ऐक्य ही, त्याच्या इतिहासात प्रथमच घडत असलेली घटना होती. या घटनेने भारतात एका नव्या युगाची सुरुवात झाली. भारतीयांच्या जीवनदृष्टीला एक नवी कलाटणी देणारे हे स्थित्यंतर होते.

## भारताची समन्वित संस्कृती

या स्थित्यंतराचा अन्वयार्थ भाषिक दृष्टीने फार महत्त्वाचा होता. भारताच्या संविधानाने संघराज्यातील सर्व घटकराज्यांना जसा समान राजकीय दर्जा दिला, तशीच त्यातील चौदाही भाषांना राष्ट्रीय भाषा म्हणून मान्यता दिली. संघराज्याची भाषा हिंदी घोषित करण्यात आली असली, तरी त्या त्या घटकराज्यातील प्रादेशिक भाषा संविधानाच्या अनुच्छेद ३४५ अनुसार राजभाषा होऊ शकतील अशी तरतूद करण्यात आली.[१] भारतापुढे लोकशाही समाजवादी पद्धतीचा व लोककल्याणकारी राज्याचा आदर्श असल्यामुळे संघ सरकारचा व राज्यसरकारांचा नागरिक जीवनाच्या हरेक अंगाशी संबंध येतो. शासनाचा व जनतेचा संबंध दृढतर करण्यासाठी व जनतेचा भावनिक पाठिंबा मिळवण्यासाठी

---

[१] "३४५. अनुच्छेद ३४६ व ३४७ यांच्या उपबंधांस अधीन राहून, एखाद्या राज्याचे विधानमंडळ विधिद्वारा त्या राज्यात उपयोगात असलेल्या भाषांपैकी कोणतीही एक वा अधिक भाषा अथवा हिंदी त्या राज्याच्या सरकारी प्रयोजनांपैकी सर्व अथवा कोणत्याहिकरिता उपयोगावयाची अथवा उपयोगावयाच्या भाषा म्हणून अंगीकृत करू शकेल."—भारताचे संविधान (भाग १७—अध्याय २), पृ. १२३.

लोकांना समजू शकेल अशा माध्यमातूनच राज्यकारभार चालला पाहिजे. प्रादेशिक भाषा हेच एक असे माध्यम असल्यामुळे शासन-व्यवहाराच्या भाषेचा दर्जा त्यांना प्राप्त करून देणे आवश्यकच होते. भाषेला शासनव्यवहारात एकदा स्थान मिळाले की अन्य क्षेत्रांतील तिच्या विकासालाही अवसर मिळतो. या अर्थाने संविधानातील उपरोक्त तरतुदीमुळे सर्वच भाषांना विकासाची समान संधी मिळाली आहे. ज्या एका संस्कृतिसूत्रात जनतेचे जीवन बांधले असते त्याचे भाषा हे व्यक्त स्वरूप असल्याने भाषेच्या विकासाचा अर्थ भाषिक संस्कृतींचा विकास असाच होतो. हा अर्थ एकदा मान्य केला म्हणजे भाषिक संस्कृतींच्या विकासासाठी भाषिक राज्ये हवीत, ही त्याची स्वाभाविक परिणती ठरते. भारतात भाषावार राज्यपुनर्रचना करण्यात आली ती याच दृष्टीने. भाषिक संस्कृतींचा म्हणजेच प्रादेशिक संस्कृतींचा समतोल व अबाधित विकास व्हावा, हाच विचार यात अभिप्रेत होता. आपापल्या वैशिष्टयांचे रक्षण करीत व एकत्रितपणे भारतीयत्वाचा अंत:प्रवाह परिपुष्ट करीत, या भिन्न संस्कृतीप्रवाहांच्या संगमातून एक व्यापक व समृद्ध अशी भारतीय संस्कृती आकारास यावी, हे त्यामागील उद्दिष्ट होते.[१] भारतीय संविधानातही या भारताच्या समन्वित संस्कृतीचा (Composite Culture) निर्देश हिंदी भाषेच्या विकासासंबंधीच्या अनुच्छेदात करण्यात आला आहे.[२]

### एक राष्ट्रीय गरज

भारताच्या स्वातंत्र्याला व त्याच्या एकराष्ट्रीयत्वाला अर्थ यावयाचा असेल तर केवळ त्याच्या राजकीय ऐक्यावर समाधान मानून चालणार

[१] "There can, of course, be no difference of opinion on the desirability of ensuring free and harmonious development of regional cultures, or sub-cultures as they might be called, the ideal being an Indian culture enriched both in volume and in content by a confluence of diverse cultural streams, which, while merging themselves in the main central current, preserve their individual characteristics."

—*Report of the States' Reorganization Commission*, p. 47

[२] भारताचे संविधान : अनुच्छेद ३५१, पृ. १२५.

नाही. भावनेने, संस्कृतिबंधनाने हे राजकीय ऐक्य जर सांधले गेले नाही, तर त्या ऐक्याला कोणत्याही वेळी तडा जाऊ शकतो. या सांस्कृतिक अथवा भावनात्मक ऐक्याशिवाय भारताच्या स्वातंत्र्याला अर्थ येऊ शकत नाही. भारतीय स्वातंत्र्याचा हा व्यापक अर्थ अजूनही आपल्या मनात म्हणावा तसा ठसला नाही. हा अर्थ सामान्य जनतेपर्यंत पोचवण्याची आणि भारतीय समन्वित संस्कृतीला आकार देण्याची फार मोठी जबाबदारी देशातील चौदाही भाषांवर आहे. निरनिराळ्या भाषिक प्रदेशांतील विद्वानांनी आणि विचारवंतांनी, साहित्यिकांनी आणि कलावंतांनी ही जबाबदारी उचलायची आहे.[१] 'आंतरभारती' सारख्या प्रयत्नांची इष्टता मराठीला पटलीच आहे. निरनिराळ्या भाषांतील विचारकल्पनांचे

एका भारताचेच आहे, या भावनेतून वाङ्मयीन व शास्त्रीय अनुवाद मराठीत होत आहेत. ते वाढत्या प्रमाणावर होतीलही. सर्व भाषांसाठी लिपी एकच असावी, असाही एक विचारप्रवाह दिसून येतोच. याच्या जोडीला संविधानाच्या अनुच्छेद ३५१ मध्ये संघभाषा म्हणून हिंदीच्या विकासाच्या हेतूने जे मार्गदर्शन करण्यात आले आहे त्याच धर्तीवर मराठी व इतर भाषांनी, बाह्य स्वरूपा-बाबत आपली मूळ प्रकृती बिघडू न देता, निरनिराळ्या भाषांतील रूपे, शैली व शब्दप्रयोग आत्मसात करण्याची जरूरी आहे. असे केल्यास भारतातील निरनिराळ्या भाषा एकमेकींच्या अधिक जवळ येऊ शकतील. नव्या शब्दांचा वापर करताना जेथे योग्य असेल तेथे भारतीय भाषांचा समान आधार असलेल्या संस्कृत भाषेतल्या शब्दांना अवसर दिल्यासही परस्पर अर्थग्रहण सुकर होईल. भारतातील

---

[१] "However, it is far easier to create the mechanics of political unity than its spiritual counterpart ................. So far as language has a bearing on the spiritual counterpart, it must be left to be consolidated by the scholars, artists, literati, leaders of thought and opinion in the different regions, reflecting as they doubtless will do, the fellow-feeling, mutual goodwill and sense of 'belonging to each other' which the masses of this country deeply entertain, no matter what languages they may happen to be born to."

—*Report of the Official Language Commission*, p. 46

निरनिराळ्या भाषांना जवळ आणण्याचे कार्य अनेक शतकांपासून संस्कृत भाषा करीत आली आहे. पूर्वीचा इतिहास पाहिला तर काश्मीरातील साहित्यशास्त्र दक्षिणेत नेले आणि दक्षिणेतील तत्त्वज्ञान उत्तरेकडे पोचवले आहे संस्कृत भाषेनेच. आजही इतर भाषा काय नि मराठी काय, प्रत्यही संस्कृतातील नवे शब्द घेऊनच नव्या अभिव्यक्ती साधीत आहेत. वेगळेपणांच्या कल्पनेला थोडी मुरड घालावी लागली, उदारतेची वृत्ती दाखवावी लागली व भाषेला थोडेफार नवे वळण द्यावे लागले, तरी इष्टतर उद्दिष्टाच्या सिद्धीसाठी ते योग्य ठरावे. या गोष्टी प्रयत्नपूर्वक कराव्या लागणार असल्या-मुळे लिखित भाषेतच हे शक्य होईल. तात्काळ रूढ झाले नाहीत, तरी लिखित भाषेतून लोकव्यवहारात अशा शब्दांचा आज ना उद्या प्रवेश होईल. जेथे एकरूप व्यवहार शक्य आहे अशा प्रशासन, विधिव्यवहार, माध्यमिक व उच्च स्तरावरील शिक्षण, शास्त्रीय विषय व संशोधन, आर्थिक व्यवहार इत्यादींसारख्या क्षेत्रांत व विषयांत समान शब्दांचा प्रयोग खचित यशस्वी होऊ शकतो. भाषा ही सक्तीने लादली जाऊ शकत नाही ; पण स्वेच्छेने ती स्वीकारता येऊ शकते, हेही तितकेच खरे आहे. इस्रायल सारख्या राष्ट्राने हे सिद्ध करून दाखवले आहे. मृतप्राय असलेली हिब्रू भाषा तेथे राष्ट्रभाषा म्हणून ठरवण्यात आली. त्या भाषेला आजच्या गरजांनुसार नवे रूप देण्यात आले व ती सर्व व्यवहारासाठी रूढ करण्यात आली. पूर्वी बोलत असलेल्या इतर भाषा तेथील ज्यू विसरले आणि ही नवी भाषा शिकले. बलवत्तर राष्ट्रभावनेने भाषाशास्त्रीय समाजावर मात केली आणि ही भाषा घरादारातून, बाजारहाटातून बोलण्यात येऊ लागली.[१] त्याच भावनेने करण्यात येणारा हा आंशिक एकरूपतेचा प्रयोग भारतातही का यशस्वी होऊ नये ? आपापल्या गरजांनुसार रूढ भाषेत बदल घडवून आणण्याचे व तिला नवे रूप देण्याचे प्रयत्न जगातील इतर राष्ट्रांनी केले आहेत

[१] *Scientific and Technical Translating and other Aspects of the Language Problem* (*UNESCO—1957*) : *6. 1. 17*, p. 178.



३

व ती आजही करीत आहेत. तुर्कस्तानने १९२८ साली आपली जुनी लिपी बदलून रोमन लिपी स्वीकारली आणि त्याबरोबरच आपल्या भाषेतील अरबी शब्दांचे उच्चाटन करून ग्रीक व लॅटीन भाषांवर आधारलेली परिभाषा घेतली. इंडिनेशियात अलीकडेच तेथील मलायी भाषेच्या आधारावर ' बहासा इंडोनेसिया ' ही नवी राष्ट्रीय भाषा विकसित करण्यात आली असून ती झपाट्याने रूढ होत आहे. इंडोनेशियातील साडेसात कोटी जनता २५ भाषांचा वापर करीत होती. यांपैकी एकही भाषा राष्ट्रभाषा म्हणून उपयोगात आणता येईल इतकी विकसित नसल्यामुळे अधिक प्रमाणात बोलली जाणारी मलायी भाषा आधार म्हणून घेऊन इतर भाषांतील शब्दांची आणि त्याबरोबरच नव्याने तयार केलेल्या शब्दांची भर घालून ही नवीन भाषा निर्माण करण्यात आली आहे.[१] राष्ट्रीय गरजांनुसार असे नवे नवे भाषिक प्रयोग अन्य देशांत होत आहेत. जुन्या भाषा नवीन रूपे घेत आहेत; नव्या ' तयार ' भाषा प्रचारात येत आहेत. भारतीय भाषांना एवढे मोठे बदल करावे लागतील असे नाही. एकरूप परिभाषेची राष्ट्रीय गरज लक्षात घेऊन पारिभाषिक स्वरूपाच्या नवीन शब्दांना सामावून घेणे त्यांना कठीण जाणार नाही. इतरत्र जे शक्य झाले ते भारतात होणार नाही असे का समजावे ?

### मराठीची उद्याची संस्कृती

मराठी भाषेचा इतिहास पाहिला तर तिच्या रूढ स्वरूपात अधूनमधून कधी व्यवहाराच्या सोयीसाठी, तर कधी स्वभाषाप्रेमाने परिवर्तने घडली आहेत. असे परिवर्तन भाषेच्या स्वाभाविक परिवर्तनशीलतेमुळे केव्हा सावकाश, तर केव्हा प्रयत्नपूर्वक, नवी दिशा लावून झालेले आहे. फार्शी राजभाषा झाली आणि व्यवहार म्हणून त्या भाषेतील शब्द मराठीत आले, रूढ झाले. पण शिवकालात स्वत्वभावनेचे आवाहन होताच या फार्शी शब्दांची उचलबांगडी झाली.

---

१ *Scientific and Technical Translating and other Aspects of the Language Problem* (*UNESCO—1957*) *: 6. 1. 16*, p. 178.

इंग्रजी काळात नव्या गरजेनुसार पूर्वीचे अनेक रूढ फार्शी शब्द व प्रयोग वापरातून गेले आणि त्यांची जागा इंग्रजी शब्दांनी घेतली. मराठीची संस्कृती गरजही ओळखते व भावनाही ओळखते.

जगातील इतर नवोदित राष्ट्रांच्या प्रगतीचा इतिहास लक्षात घेता पुढारलेल्या राष्ट्रांची बरोबरी करता यावी या स्वाभाविक इच्छेने अनेक सुधारणा व नवे उपक्रम त्यांनी हाती घेतले व यशस्वी केले. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर याच इच्छेने भारताने आपले धोरण आखणे स्वाभाविक होते. राष्ट्रीय ऐक्याला बळकटी यावी व ते प्रभावी ठरावे या हेतूने भारताने समन्वित संस्कृतीचा हा आदर्श आपल्यापुढे ठेवला आहे. समाजवादाचे अधिष्ठान असलेली व वैज्ञानिक-तांत्रिक अंगाने परिपुष्ट होणारी एक नवी संस्कृती भारतात उदयास येत आहे. एकराष्ट्रीयत्वाचा मजबूत पाया असेल तरच ती टिकून राहील. भारतातील भाषिक राज्यांच्या द्वारे फुटीर-पणाची वृत्ती कदाचित जोर धरण्याचा व भाषिक भेदांतून संघर्ष निर्माण होण्याचा संभव लक्षात घेता भारतातील भाषांनी परस्परांच्या अधिक जवळ येणे जरूर आहे. असे केले तरच भारताचे एक-राष्ट्रीयत्व व सांस्कृतिक ऐक्य चिरस्थायी होईल. राष्ट्राची नवी घडण होत असताना नवी मूल्ये, नवे आदर्श स्वीकारावे लागतात ; नव्या सांस्कृतिक परंपरा निर्माण कराव्या लागतात. मराठीने ही काळाची गरज ओळखली पाहिजे. या परिस्थितीत भाषिक दृष्ट्याही नवीन दृष्टिकोन स्वीकारावा लागेल. शिक्षण, विज्ञान, तंत्र, प्रशासन यातील भारतीय एकरूपतेची आवश्यकता ध्यानात घेऊन नवीन एकरूप पर्याय मराठीने आपले म्हणणे, त्यांना आपल्या शब्दसंग्रहात सामावून घेणे जरूर आहे. रूढ असलेले फार्शी किंवा इंग्रजी शब्द मराठीने आत्मसात केले ते त्या काळातील गरज म्हणून. या दोन भाषांच्या संस्कृतीचा मराठीशी जो संपर्क घडला त्याच्या त्या खुणा होत. त्या खुणा कायमच राहातात असे नाही. भाषांच्या इतिहासात नवीन संस्कृतींच्या प्रभावामुळे अशा अनेक

खुणा पुसल्या जातात. एकरूप परिभाषेद्वारा जे नवीन शब्द मराठीत येतील ती एका नव्या भारतीय संस्कृतीची पदचिन्हे असतील. भारतात घडलेल्या एका महान स्थित्यंतराचा इतिहास ते पुढील पिढ्यांना सांगतील. हे नवे पर्याय सर्वसामान्य व्यवहाराच्या भाषेत फार कमी प्रमाणात येणार असून शास्त्रीय, तांत्रिक, शैक्षणिक व प्रशासनिक भाषेतच ते येणार आहेत. या क्षेत्रांत अजून मराठी परिभाषा निश्चित व्हावयाची आहे. इतर सर्व भारतीय भाषांच्या सहकार्याने मराठीला एक व्यापक व सामान्य परिभाषा तयार करावी लागेल. यात तिचे स्वातंत्र्य नाहीसे होत नसून त्याला एक विशाल अर्थ प्राप्त होतो. वस्तुतः भाषेविषयीचा अभिमान म्हणजे तिच्या रूढ परंपरागत स्वरूपाचा अभिमान नव्हे. भाषा अनेक अंगांनी विकसित झाली पाहिजे. हरेक क्षेत्रातील गरजा भागविण्यास ती समर्थ असली पाहिजे. तिची अभिव्यक्तिक्षमता वाढली पाहिजे. अशी विकासशील भाषा हीच अभिमानाचा विषय होऊ शकते. नवी परिभाषा स्वीकारून मराठी भाषा हे सामर्थ्य प्राप्त करून घेऊ शकेल. पण त्याही-पेक्षा भारतीय एकराष्ट्रीयत्वाचे ती पोषण करील, भारताच्या समन्वित संस्कृतीचा ती आविष्कार करील, हाच यातील मुख्य दृष्टिकोन. मराठी भाषा ही गरज ओळखील, ही नवी प्रेरणा ती ग्रहण करील. तीच कदाचित मराठीची उद्याची संस्कृती असेल.

# लोकशाहीतील भाषाकारण

भाषिक संस्कृतींचा विकास घडून यावा व त्याद्वारे भारताच्या एकराष्ट्रीयत्वाची व समन्वित संस्कृतीची उभारणी व्हावी, या हेतूने देशात भाषिक राज्ये निर्माण झाली. भारताचे लोकशाही समाजवादाचे तत्त्व या राज्यांनी स्वीकारले आहे. लोकशाहीचे विशिष्ट राजकारण असते, तसेच तिचे भाषाकारणही असते. लोकशाही यशस्वी होण्यासाठी राजकारणाइतकेच त्यालाही महत्त्व आहे. हे भाषाकारण कोणते, हे नीट ओळखल्यास प्रादेशिक भाषा लोकशाहीतील आपली जबाबदारी योग्य प्रकारे पार पाडू शकतील.

### जनतेची भाषा राजभाषा

लोकशाहीत सर्व सत्ता जनतेच्या ठिकाणी वसत असते. तीच खरी सत्ताधारी असते. स्वत: निवडून दिलेल्या प्रतिनिधींमार्फत ती विधानसभेत कायदे करते व शासनावर नियंत्रण ठेवते. जनतेने केलेल्या कायद्यांनुसारच न्यायालये न्यायनिवाडे देत असतात. तिने निवडून दिलेले मंत्रिमंडळ हे शासनयंत्रणेच्या माध्यमाद्वारे राज्यकारभार चालवते. अशा रीतीने राज्याच्या विधानांग, न्यायांग आणि कार्यांग या तिन्ही अंगांवर जनतेचे

नियंत्रण असते; तिन्ही ठिकाणी जनतेची इच्छा सार्वभौम असते.

जनतेचा शासनाशी सर्व बाजूंनी असा घनिष्ट संबंध येत असल्यामुळे जनतेची भाषा हीच शासनव्यवहाराची भाषा असावयास पाहिजे. त्या जागी एखादी परकीय भाषा असेल तर शासन व जनता यांच्यामध्ये भाषिक अडचणींची भिंत उभी राहील व दोहोंचे संबंध दुरावतील. शासनाविषयी आपलेपणा न वाटल्याने शासकीय योजनांना जनतेचा भावनिक पाठिंबा व क्रियाशील सहकार्य मिळणार नाही. इंग्रजी शासनकाळात हा अनुभव लोकांना आलाच आहे. इंग्रजांनी आपली भाषा प्रशासनाचे व शिक्षणाचे माध्यम ठरवून देशातील जनतेचे दोन भाग पाडले होते. इंग्रजी शिक्षण घेतलेले मूठभर शिक्षित व सरकारी कर्मचारी यांचा एक आणि त्या भाषेचे ज्ञान नसलेल्या कोटयवधी इतर जनतेचा दुसरा. पहिल्याला हाताशी धरून त्यांनी दुसऱ्या वर्गावर मनास येईल तशी सत्ता गाजवली. शासनाशी जनतेचा संबंध येऊ न देण्यासाठी आणि आपली सत्ता टिकवून धरण्यासाठी परकीय राज्यकर्त्यांना अन्य भाषेची ही भिंत उभी करावीच लागते. स्वतंत्र लोकशाहीत सत्ता जनतेची असल्यामुळे तिच्यात व शासकवर्गात जिव्हाळयाचे संबंध असतात. या संबंधाचे माध्यम म्हणून जनतेच्या भाषेचा उपयोग अपरिहार्य ठरतो. लोकशाही विचारसरणीनुसार राजकीय उद्दिष्टांच्या पूर्तीसाठी जनता व शासकवर्ग यांच्या विचारभावना एक असल्या पाहिजेत, कार्याचे रूप एक पाहिजे. समाजातील निरनिराळया व्यक्तींना एकत्र आणण्याचे भाषा हेच एक माध्यम होय. स्वभावत: संयोजक शक्ती असलेल्या या साधनाद्वारेच जनता आणि शासकवर्ग यांच्यात तादात्म्य निर्माण होऊ शकते; जनता व शासन यांत एक समतोल निर्माण होतो व जनतेच्या व्यक्तित्वाचा ठसा शासनावर उमटतो. यामळे जनतेची भाषा हीच राजभाषा असावी असा लोकशाहीचा दंडक आहे. याशिवाय विशिष्ट भाषिक समाजाच्या अस्मितेचे व सांस्कृतिक परंपरेचे प्रतीक या दृष्टीने भाषा ही त्या समाजाचे अभिमानस्थान

असते. शासनात व इतर सर्व व्यवहारांत तिला तिची जागा मिळाली तर जनतेला कार्यप्रवण करणारी ती एक प्रेरक शक्ती ठरू शकते. लोकशाहीत जनतेच्या भाषेला अनेक जबाबदाऱ्या पार पाडायच्या असतात. जनता व शासन यांच्यातील एकात्मतेबरोबर जनतेतील परस्पर सहकार्याची भावना व बंधुत्व यांचे पोषण तिला करता आले पाहिजे. लोकशिक्षणाचे महत्त्वाचे कार्यही तिलाच पार पाडायचे असते. कारण जागृत लोक-मतावरच लोकशाहीचे यश अवलंबून आहे. वेगवेगळ्या मतप्रवाहांना योग्य वळण लावण्याची व प्रसंगी जनहिताच्या धोरणासाठी मतपरिवर्तन घडवून आणण्याची पक्षपातविरहित कामगिरी तिला पार पाडता आली पाहिजे. यासाठी माध्यम म्हणून तिचा बाह्य अंगाने विकास होणे जितके जरूर आहे तितकीच तिची आंतरिक पातळीही उंचावली पाहिजे. लोकशाहीची यथार्थ निष्ठा तिच्यात रुजली पाहिजे.

**लोकशाहीतील मराठीची जबाबदारी**

इतर प्रादेशिक भाषांप्रमाणे लोकशाही महाराष्ट्रात मराठीला ही सर्व कामे पार पाडावी लागतील. मराठी भाषिक समाजाच्या निरनिराळ्या घटकांतील व वर्गांतील ऐक्यभावना तिला टिकवून ठेवावी लागेल व ती वाढीस लावावी लागेल. ही ऐक्यभावना केवळ प्रादेशिक स्तरावरच वाढवून तिला भागण्यासारखे नाही. निरनिराळ्या भाषा बोलणारा अखिल भारतातील लोकशाही समाज हा एकच आहे, हे मराठीने ओळखले पाहिजे. यासाठी मराठीने व तिच्याच जोडीला इतर भाषांनी परस्परांत सामंजस्य निर्माण केले पाहिजे व एकमेकींच्या अधिक जवळ आले पाहिजे. त्यांनी आपली वैशिष्ट्ये कायम ठेवून एकात्मतेचा शोध घेतला पाहिजे. जेथे शक्य होईल तेथे देवाणघेवाण केली पाहिजे व जेथे जमेल तेथे एक-रूपता साधली पाहिजे. ज्या ज्या क्षेत्रात शक्य आहे तेथे एकरूप परिभाषेचा उपयोग करणे हा प्रादेशिक भाषांना जवळ आणण्याचा एक व्यवहार्य उपाय ठरू शकतो, व त्याद्वारे आपण सर्व भारताच्या एकाच लोकशाहीच घटक आहोत, ही धारणा वेगवेगळ्या भाषिक समाजांत निर्माण होऊ शकते.

लोकशाहीत समाजजीवनाची घटना ही वेगळ्या धर्तीवर होत असते. जीवनाच्या निरनिराळ्या क्षेत्रांत व निरनिराळ्या पातळ्यांवर एकत्र येऊन लोकांना व्यवहार करावा लागतो. सामाजिक व राजकीय, आर्थिक व व्यवसायिक, शैक्षणिक व प्रशासनिक अशा निरनिराळ्या व्यवहारांत भाषेचा उपयोग त्यांना करावा लागतो आणि तो व्यवहाराच्या स्तरांनुसार वेगवेगळा असतो. यामुळे लोकशाहीत भाषेच्या माध्यमाचे स्वरूप फार व्यापक झाले आहे. ते एकसाची व मर्यादित राहून चालत नाही. लोक-व्यवहाराच्या सर्वच क्षेत्रांत उपयोगी पडेल इतकी विविधता भाषेत यावी लागते. या व्यवहाराच्या वाढत्या व बदलत्या गरजा पुऱ्या करायच्या तर भाषेला एका जागी थांबून चालणार नाही. तिच्या ठिकाणी गतिमानता यावी लागते. तिला विकासशील व म्हणूनच प्रयोगशील व्हावे लागते. शिक्षित-अशिक्षित, तज्ज्ञ-अतज्ज्ञ या सर्वांनाच आपापल्या पातळीवर वापरता येईल असे भाषेचे सर्वसंग्राहक स्वरूप असावे लागते. यादृष्टीने विचार केला म्हणजे लोकशाहीत मराठीच्या वापराचे क्षेत्र किती वाढणार आहे, हे लक्षात येईल. मराठी ही आता खेड्यांतील निरक्षर मतदारांची -जशी भाषा राहील, तशीच राजधानीतील प्रशासकांचीही भाषा राहील. राज्यातील कायदेपंडितांना व डॉक्टरांना, वास्तुशास्त्रज्ञांना व अभियंत्यांना ती वापरावी लागेल. शास्त्रज्ञांना व तंत्रज्ञांना आपापल्या कामांसाठी व संशोधनासाठी तिचा उपयोग करावा लागेल. शेतात राबणाऱ्या शेतकऱ्यांशी जसा तिचा संबंध येईल, तसाच शेतकी विषया-तील विशेषज्ञांशीसुद्धा येईल. गिरणीतील व कारखान्यातील कामगार जशी ही भाषा वापरील, तशीच तेथील यंत्रसामुग्रीची सांगोपांग माहिती असणाऱ्या यंत्रज्ञालाही ती वापरावी लागेल. या सर्व प्रकारच्या उपयोगां-साठी ती पुरी पडेल इतका आता मराठीचा आवाका वाढला पाहिजे.

### शासनव्यवहार व मराठी

शासनव्यवहारातील मराठीचा विचार केला तर लोकशाहीत अभिप्रेत असलेल्या व्यापक अर्थाइतकीच या क्षेत्रातील तिची

व्याप्ती राहील. आजची प्रशासनिक भाषा ही केवळ सामान्य स्वरूपाच्या कार्यालयीन पत्रव्यवहारापुरती व टिप्पणीलेखनापुरती किंवा जनतेसाठी काढण्यात येणाऱ्या सूचना व प्रसिद्धीपत्रके यांच्यापुरती मर्यादित राहिलेली नाही. सरकारी कार्यालयात धूळ खात पडून राहणाऱ्या दप्तराबाहेर तिचा उपयोग होणार नसल्यामुळे तिचा विकास तो काय करायचा, ही कल्पना आज चुकीची ठरेल. पूर्वी जेव्हा शासनाचे संपर्कक्षेत्र इतके व्यापक नव्हते त्यावेळीही शासनव्यवहाराच्या भाषेचा व्याप सामान्य व्यवहाराच्या भाषेहून अधिक होता. आजच्या घटकेस लोककल्याणकारी राज्याच्या आदर्शामुळे शासनाशी संबंधित विषयांचा आटोप इतका वाढला आहे की लोकजीवनाचे बहुधा एकही क्षेत्र त्यातून सुटले नाही. त्यामुळे प्रशासनिक भाषेचा विकास या सर्व विषयांना आवश्यक अशा भाषेच्या विकासाशी समानार्थक झाला आहे. एक साहित्याचे क्षेत्र सोडले तर इतर अनेक क्षेत्रांत मराठी भाषा ही आजवर मागेच पडली होती. या सर्व क्षेत्रांतील इंग्रजीच्या वापरामुळे व वर्चस्वामुळे मराठीच्या प्रगतीस पायबंद बसला होता. माध्यमिक शिक्षणाचा स्तर वगळता सारे उच्च शिक्षण इंग्रजीतून मिळत होते. प्रशासनातही तालुका व जिल्हा स्तरांवर थोडाबहुत मराठीचा वापर असला तरी इतर सर्व ठिकाणी इंग्रजीतूनच कामकाज होत होते. ही वस्तुस्थिती लक्षात घेतली तर प्रशासनिक मराठीला केवढी मोठी मजल मारायची आहे याची कल्पना येईल. वर सांगितल्याप्रमाणे प्रशासनाच्या कक्षेत सर्वच विषय येत असल्यामुळे त्या प्रत्येक विषयाची परिभाषा तयार होईपर्यंत मराठी ही राज्यकारभाराची भाषा होऊ नये, असे कोणी म्हणणार नाही. प्रशासनाच्या दृष्टीने या विषयांचा जेवढा संबंध येतो तेवढ्यापुरता तरी मराठीतील शब्दसंग्रह तयार असणे जरूर आहे. राज्यव्यवहारात मराठीला लवकर स्थान मिळायचे असेल तर अशी परिभाषा त्या त्या विषयाच्या अनुरोधाने स्वाभाविक क्रमानुसार तयार होईपर्यंत अनिश्चित काळ थांबून चालणार नाही.

धडाडीने पुढे जावे लागेल. इंग्रजीसारख्या पुढारलेल्या भाषेचा विकास पाश्चात्य देशातील औद्योगिक क्रांतीच्या आणि शास्त्रीय व तांत्रिक प्रगतीच्या बरोबरीने पावले टाकून सावकाश झाला आहे. हा विकास अनेक विषयांवरील सतत ग्रंथनिर्मितीद्वारे नैसर्गिक क्रमाने झालेला आहे. तिच्या मानाने अप्रगत असलेल्या मराठीला तिची जागा घ्यायची तर तिला गेल्या काही शतकांच्या विकासाचा टप्पा त्वरेने गाठावा लागेल. ज्या कामाला इंग्रजीला शतके लागली ते काम मराठीसारख्या विकासाची निकड असलेल्या भाषांना काही दशकांतच तडीला न्यायचे आहे. त्यासाठी शब्द भाषेतून कोशात येण्या-ऐवजी, तो कोशातून भाषेत आणण्याच्या भाषाशास्त्रदृष्ट्या काहीशा अस्वाभाविक प्रक्रियेचा अवलंब करावा लागणार आहे. पण संक्रमण काळातील प्रगतीचा वेग टिकवायचा असेल तर ठराविक चाकोरी सोडून नव्या वाटा शोधाव्या लागतात, नवे प्रयोग करून पाहावे लागतात. विकासाच्या इतर क्षेत्रांत आपण असे प्रयोग करीतच आहोत. शासनव्यवहारासाठी आवश्यक तो शब्दसंग्रह व परिभाषा तयार करण्याचा प्रयत्न हा असाच एक प्रयोग आहे, असा दृष्टिकोन याबाबत ठेवणे आवश्यक आहे. पण या संक्रमण काळाचा एक विशेष असा की प्रगती इच्छिणारा समाजच प्रगतीचा वेग सांभाळू शकत नाही. तो रूढीला व परंपरांना चिकटून राहतो. भाषिक प्रयोगशीलतेच्या बाबतीत तर हे परंपरानुसारित्व विशेषच अनुभवास येते.[१] पण नव्या व निकडीच्या गरजा भागवण्याकरिता अशा प्रयोगशीलतेला अवसर दिला पाहिजे, आणि त्याकरता लोकांची मने अनुकूल करून घेतली पाहिजेत.

**परस्पर प्रभावाचे तत्त्व**

कोशातून शब्द भाषेत आणण्याचा हा प्रयोग ज्या विशिष्ट प्रयोजनां-साठी आहे त्या त्या ठिकाणी हे शब्द वापरू देणे हाच यातला मार्ग असू

१ "When there is a period of heightened activity and of rapid change there is always a constant battle between the need to preserve the traditions of language and the need to admit innovation, a constant conflict between conservation and creation in language."

—M. M. Lewis, *Language in Society*, pp. 58-59.

शकतो. शब्द हे शेवटी संकेतच आहेत. ते रूढ की नवे, सोपे की कठीण, हा येथे प्रश्न नसून ते वापरात येतात की नाही, हे पाहिले पाहिजे. शब्दांचा सोपेपणा किंवा रूढपणा हा त्या शब्दांचा अंगभूत धर्म नसून तो त्यांच्या वापराचा गुण आहे. यासंबंधात सामान्य जनतेच्या पातळीचाही उल्लेख करण्यात येतो. ही पातळी सामान्य जनतेच्या ग्रहणशक्तीची नसून व्यवहाराची आहे. लोकशाहीत जनतेची ही व्यवहाराची पातळी सतत वाढत असते. गेल्या दहा वर्षांत सामान्य जनतेचे ज्ञान—सामान्यज्ञान म्हणू या—कितीतरी वाढले आहे. सामान्य जनतेला साक्षर व शिक्षित करण्याचे प्रयत्न मोठ्या प्रमाणावर होत आहेत व होणार आहेत. महाराष्ट्रात मराठी ही राज्यकारभाराची भाषा झाली की नवे विषय, नवी माहिती या परिचित माध्यमातून सामान्य जनतेपर्यंत पोचणार आहे. तिच्या 'श्रुत' ज्ञानात व शब्दसंग्रहात आपोआप भर पडणार आहे. जनतेची भाषा म्हणजे अमुक इतका शब्दसंग्रह असे आपण धरून चालतो. पण याबाबतीत पूर्वीपेक्षा आज कितीतरी फरक पडला आहे. नवे ज्ञान, नवे शब्द ग्रहण करण्याची सामान्य जनतेची क्षमता कमी आहे, असे समजण्याचे वस्तुत: काही कारण नाही. कोशातून ती नवे शब्द शिकत नसली तरी व्यवहारातून शिकतेच. लोकशाहीत जनतेच्या भाषेचा शासनावर परिणाम होतो, तसाच शासनाच्या भाषेचा जनतेवरही परिणाम होतो. याला लोकशाहीतील भाषेच्या परस्पर प्रभावाचे तत्त्व म्हणता येईल.

**भाषाविकासासाठी परिभाषा**

महाराष्ट्रातील काय किंवा इतर राज्यातील काय, लोकशाही यशस्वी होण्यासाठी शासनव्यवहाराची भाषा तेथील प्रादेशिक भाषाच असावयास पाहिजे, हे आपण पाहिले. प्रशासनाबरोबरच शिक्षणाचे माध्यमही जनतेची भाषाच असणे जरूर आहे. लोकशाहीत शिक्षणाचे महत्त्व किती आहे हे विस्ताराने सांगण्याची गरज नाही. शिक्षित व सुजाण लोकमत हे जसे लोकशाहीचे खरे जीवनतत्त्व होय, तसेच

प्रशिक्षित व कार्यदक्ष कर्मचारीवर्ग म्हणजे तिची कर्तृत्वशक्ती म्हणता येईल. शिक्षणाची व प्रशासनाची माध्यमे लोकशाहीच्या दृष्टीने अशी परस्परपूरक म्हणता येतील. इंग्रजी राजवटीत या दोन्ही क्षेत्रांतून देशी भाषांचे उच्चाटन झाल्यामुळे त्यांचा सर्वांगीण विकास होऊ शकला नाही. इंग्रजी राज्यकर्त्यांनी एक प्रकारे जाणूनबुजून व पद्धतशीरपणे त्यांची कुचंबणा केली. या क्षेत्रांत त्यांचा पुन्हा प्रवेश झाला म्हणजे जनतेच्या व तिच्या भाषेच्या विकासाला सुयोग्य दिशा व गती मिळेल. शिक्षणाच्या व प्रशासनाच्या माध्यमांचा या दृष्टीने जोडीने विकास झाला पाहिजे. या दोन्ही ठिकाणी आतापर्यंत मराठीला महत्त्वाचे व सर्वव्यापी स्थान नव्हते. त्यामुळे तिचा या अंगांनी विकास होऊ शकला नाही. शिक्षणात माध्यमिक स्तरापर्यंत व अलीकडे काही प्रमाणात महाविद्यालयीन स्तरापर्यंत मराठीला प्रवेश मिळाला आहे. पण उच्च शिक्षणाच्या व संशोधनाच्या पातळीवर तिला स्थान नसल्यामुळे कला, विज्ञान, तंत्रशास्त्र, वैद्यक, व्यापार, कायदा इत्यादी ज्ञानाच्या विभिन्न शाखांत तिचा विकास होऊ शकला नाही. या विकासासाठी आवश्यक अशी परिपूर्ण परिभाषा आज मराठीत नाही. ही परिभाषा तयार करण्याचे प्रयत्न अधूनमधून झाले आहेत, आजही होत आहेत. पण त्यात एकरूपता व सुसंघटितपणा नाही. जी काही थोडी परिभाषा वापरात आहे तीही सर्वमान्य व सर्वत्र सारखी नाही.

## मराठीची प्रशासनिक परिभाषा

प्रशासनाची भाषा म्हणून मराठीचा विचार केला तर, महाराष्ट्रातील संस्थानी मुलखातील राज्यकारभाराचा अपवाद वगळता, गेल्या दीडशे वर्षांत तिचा वापर झालाच नाही. आपल्या राजवटीच्या प्रारंभी इंग्रजी राज्यकर्त्यांनी काही थोडे दिवस तिचा अंशतः उपयोग केला.[१] पण

[1] "These languages (Vernaculars), and not English, have been put by us in place of Persian in the administration of justice and in the intercourse between the Officers of the Government and the people."—*Sir Charles Wood's Despatch of 1854* (Quoted in *Official Language Commission's Report*, p. 25).

पेशवाईच्या काळात जी फार्शीमिश्रित मराठी होती तीच कोर्ट-कचेऱ्यांच्या कामासाठी त्यांनी उपयोगात आणली. त्या वापरात आपुलकी नव्हती, केवळ सोय होती. त्यामुळे प्रशासनाच्या दृष्टीने काही इंग्रजी शब्दांची भर सोडल्यास, शासनप्रयुक्त मराठी पेशवेकालात ज्या स्तरा-वर होती तेथेच राहिली आणि काही दिवसानंतर तर तिचे संपूर्णच उच्चाटन झाले. तालुका-जिल्हा पातळीवर अधूनमधून तिचा आजही आढळ होत असला तरी भाषेतील सामान्य शब्दसंग्रहाने हे काम भागण्या सारखे असल्यामुळे मराठी भाषेत पुरेशा शासनविषयक नवीन शब्दांची भर पडली नाही. राज्यकारभारविषयक परिभाषा शिवकाली ' राज्य-व्यवहार कोश ' तयार करून थोडीबहुत निर्माण करण्यात आली. शिव-कालापासून पेशवाईच्या अस्तापर्यंत मराठी ही शासनव्यवहाराची भाषा होती. पण तत्कालीन मराठीचे फार्शीप्रधान स्वरूप आज बहुतांशी पालटले असल्यामुळे ती पुनरुज्जीवित करण्याचा खटाटोप कोणी करणार नाही. कोल्हापूर, मीरज, सांगली इत्यादी मराठी संस्थानांत राज्यकारभार मराठीतून चालत असला तरी त्या मराठीचे वळण व शब्दसंग्रह या गोष्टी पेशवेकालीन मराठीच्या फार पुढे गेल्या होत्या असे म्हणता येत नाही. वडोदे संस्थानात ' श्रीसयाजीशासनशब्दकल्पतरु ' हा एक अनेकभाषी प्रशासन कोश तयार करण्यात आला होता. इंग्रजी प्रशासनिक शब्दांसाठी या कोशात संस्कृत, हिंदी, मराठी व गुजराती पर्याय दिले आहेत.

अलीकडच्या काळात शासनव्यवस्थेचे खूपच आधुनिकीकरण झाले व तिचा व्यापविस्तार वाढला. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर शासनव्यवस्थेची तीच परंपरा केंद्र सरकारने व राज्य सरकारांनी पुढे चालवली. आपण लोकशाही प्रणालीचा स्वीकार केल्यामुळे आता लोकभाषा हीच शासनव्यवहाराची भाषा असणे आवश्यक आहे. शासनव्यवहाराच्या कक्षा आज समग्र जीवनाइतक्या विस्तारल्या आहेत. कल्याणकारी राज्याचे ध्येय आपण स्वीकारल्यामुळे व विकेंद्रीकरणामुळे सारेच विषय कमीजास्त प्रमाणात आज प्रशासनात अंतर्भूत झाले आहेत. प्रशासनाची ही

अत्याधुनिक गरज भागवण्यासाठी आज दहावीस हजारांचा शब्द-संग्रहसुद्धा अपुराच पडेल. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर आजच्या गरजा ध्यानात घेऊन संविधानापुरती मराठी प्रशासनिक शब्दावली तयार करण्यात आली. ती संविधानाच्या मराठी भाषांतरात वापरली आहे. चौदा भाषांसाठी मान्य केलेल्या पारिभाषिक संज्ञा तीत स्वीकारल्या असल्यामुळे साहजिकच तिच्यात संस्कृत भाषेतील शब्दांचे प्रमाण अधिक आहे. पण संविधानातील परिभाषेविषयीच्या निर्देशक अनुच्छेदानुसार ही शब्दावली तयार झाली असल्यामुळे तिचे विशेष महत्त्व आहे. तिचे स्वरूप विशिष्ट विषयातील शब्दावलीपुरतेच मर्यादित असल्यामुळे प्रशासनविषयक शब्दसंग्रहातील एक उणीव तिने अंशतः दूर केली. त्यानंतर राज्यपुनर्रचनापूर्व मध्यप्रदेश शासनाने तयार केलेल्या 'प्रशासन शब्दकोशा'त सुमारे बारा हजार प्रशासन-विषयक इंग्रजी शब्दांचे मराठी पर्याय देण्यात आले होते. या कोशाची रचना हिंदी व मराठी पर्याय शक्यतोवर समान असावे या भूमिकेतून करण्यात आली असल्यामुळे त्याचा कल काहीसा संस्कृतकडे झुकणारा असणे साहजिकच होते. त्यातील बहुतांश मराठी संज्ञा संविधानाच्या चौदा भाषांना मान्य असलेल्या शब्दावलीतून घेण्यात आल्या होत्या.

हे प्रयत्न मराठीतील व्यापक आणि परिपूर्ण प्रशासनिक परिभाषा तयार करण्याच्या दृष्टीने मार्गदर्शक असले, तरी त्यामुळे आजच्या गरजा भागू शकत नाहीत. ही वस्तुस्थिती लक्षात घेऊन महाराष्ट्र सरकारने या कामासाठी भाषा सल्लागार मंडळाची नियुक्ती केली आणि त्याच्याकडे हे काम सोपवले.

### केंद्र सरकार व परिभाषा .

भारताच्या संविधानात हिंदी ही संघभाषा आणि राष्ट्रभाषा असावी असे ठरवण्यात आल्यामुळे एका स्वतंत्र राष्ट्राची भाषा म्हणून जगातील इतर पुढारलेल्या भाषांच्या बरोबरीने तिचा विकास घडवून आणणे आवश्यक होते. जगातील अन्य नवोदित राष्ट्रांनी

आपल्या भाषांचा या दृष्टीने विकास करून घेतला होता व आजही लहानमोठी स्वतंत्र राष्ट्रे तसा प्रयत्न करीत आहेत. इंग्रजी, फ्रेंच, जर्मन इत्यादी भाषा त्या त्या देशातील शास्त्रीय व तांत्रिक प्रगतीचा हात धरून सावकाश समृद्ध झाल्या होत्या. त्यांच्या प्रगतीच्या मागे दीर्घ परंपरा असून त्यामुळेच त्यांचे आंतरराष्ट्रीय महत्त्व सर्वमान्य आहे. जगातील सारे ज्ञानविज्ञान त्यांच्यात साठवले असल्यामुळे या भाषा ज्ञानाच्या प्रकाशाची गवाक्षेच मानली जातात. पहिल्या महायुद्धानंतर चीन, जपान, रशिया या देशांनी प्रगतीची भरधाव मजल गाठली. या प्रगतीशी समांतर असा आपापल्या भाषांचा विकास व्हावा म्हणून त्यांना तातडीचे व पद्धतशीर प्रयत्न करावे लागले.

जपानने तर याबाबतीत आश्चर्यकारक प्रगती करून घेतली आहे. तेथे शिक्षण खात्याच्या अंतर्गत विज्ञानविकासाच्या प्रयोजनासाठी एक मंडळ स्थापून त्याच्याद्वारे ज्ञानाच्या निरनिराळ्या शाखांतील परिभाषा तयार करून घेण्यात आली. जपानी भाषेतील असा नव्याने निर्माण झालेला शब्दसंग्रह कित्येक लक्षांचा आहे. चीननेही असेच एक राष्ट्रीय मध्यवर्ती मंडळ स्थापन करून आवश्यक ती परिभाषा तयार केली. तेथे निरनिराळ्या विषयांवरील संकल्पित ८० परिभाषाकोशांपैकी ४७ कोशांचे काम आतापर्यंत पूर्ण झाले आहे. रशियाने याबाबतीत केलेली प्रगती तर अभूतपूर्व आहे. त्या देशाने वैज्ञानिक प्रगतीच्या बाबतीत फार मोठी आघाडी मारली असून तिच्याशी समांतर असा रशियन भाषेचा विकास झाला आहे. आज रशियन भाषा इंग्रजीच्या बरोबरीने आंतरराष्ट्रीय भाषा गणली जाते. रशियात परिभाषानिर्मितीचे काम १९३८ पासून जोरात सुरू असून आजही ते चालू आहे. सध्या त्या भाषेत तयार झालेल्या कोशांची संख्या ५६ आहे. युरोपातील डेन्मार्क, स्वीडन, या छोट्या राष्ट्रांनीही १९४१ पासून परिभाषा मंडळे स्थापून याच धर्तीवर आपल्या भाषांचा विकास घडवून आणला.

दुसऱ्या महायुद्धानंतर स्वतंत्र झालेल्या राष्ट्रांपैकी इंडोनेशिया व इस्रायल या राष्ट्रांनी वरीलप्रमाणेच भाषाविकासाच्या योजना आखल्या आहेत. या देशांना तर स्वतंत्र राष्ट्रीय भाषा देखील नव्हत्या. इस्रायलने पुरातन हिब्रू भाषेचे आधुनिकीकरण करून तीच देशाची व्यवहारभाषा व राजभाषा ठरवली, तर इंडोनेशियाने 'बहासा इंडोनिसिया' ही नवीन भाषा विकसित केली. या दोन्ही भाषांत परिभाषानिर्मितीचे प्रयत्न त्यासाठी नेमलेल्या खास मंडळांद्वारे आज चालू आहेत.

भारत सरकारने संघभाषा असलेल्या हिंदीसाठी परिपूर्ण अशी शास्त्रीय व तांत्रिक आणि तिच्याच जोडीला प्रशासनिक परिभाषा तयार करण्याच्या कामी वरील देशांचे उदाहरण डोळ्यापुढे ठेवून सुरुवातीपासून लक्ष घातले. १९५०–५१ साली केंद्र शासनाने शास्त्रीय परिभाषा मंडळ स्थापन केले. १९६० साली या मंडळाची व्याप्ती वाढवून 'शास्त्रीय व तांत्रिक परिभाषा आयोगा'त त्याचे रूपांतर करण्यात आले. या आयोगाच्या मार्गदर्शनाखाली केंद्रीय हिंदी निदेशालयामार्फत आज हिंदीसाठी प्रशासनासकट सर्व शास्त्रीय व तांत्रिक विषयांवरील परिभाषा शास्त्रीय पद्धतीने व व्यापक प्रमाणावर तयार करण्यात येत आहे. या निदेशालयाद्वारे केंद्र सरकारने अलीकडेच प्रशासनविषयक परिभाषेचा एक मोठा कोश दोन खंडांत प्रसिद्ध केला आहे.

संविधानात हिंदीच्या विकासासंबंधी जे धोरण घालून दिले आहे त्यानुसार केंद्र सरकारच्या कोशातील ही परिभाषा तयार करण्यात येत आहे. भारताच्या समन्वित संस्कृतीला पोषक ठरेल व सर्व भाषांना होता होईल तो समानरूपाने वापरता येईल अशी सर्व विषयांतील परिभाषा निर्माण करण्याचे प्रयत्न वरील आयोगातर्फे करण्यात येत आहेत. भारत सरकारने नेमलेल्या भाषा आयोगाने शास्त्रीय, तांत्रिक व प्रशासनिक परिभाषा ही सर्व भाषांना शक्यतोवर समान असावी अशी शिफारस

केली होती.[१] आयोगाच्या शिफारशींची पुन्हा पाहणी करण्यासाठी नेमलेल्या संसदीय समितीनेही समान परिभाषेची ही शिफारस मान्य केली. संसदीय समितीच्या सूचनेनुसार राष्ट्रपतींनी सर्व अनुसूचित भाषांतील शास्त्रीय, तांत्रिक व प्रशासनिक परिभाषा होता होईतो एकरूप असावी असा आदेश एप्रिल १९६० मध्ये काढला. हा आदेश कार्यान्वित करण्यासाठी भारत सरकारने देशातील निरनिराळ्या प्रादेशिक भाषांत तयार होत असलेल्या परिभाषांत समन्वय निर्माण करावा व एकरूपता आणावी म्हणून सर्व राज्यांतील प्रतिनिधींची एक 'परिभाषा समन्वय समिती' स्थापन केली असून भारतातील सर्व भाषांसाठी एकरूप परिभाषा निर्माण करण्याचे काम नुकतेच या समितीने सुरू केले आहे.

महाराष्ट्र राज्यात मराठीसाठी जी प्रशासनिक परिभाषा तयार व्हावयाची आहे ती वरील धोरणानुसार भारत सरकारच्या प्रयत्नांशी विसंवादी नसावी. यापेक्षा वेगळ्या मार्गाने जाण्याचा व मराठीची संपूर्णपणे वेगळी परिभाषा तयार करण्याचा, राष्ट्रीय धोरणाशी विरोधी असा आग्रह कोणी धरणार नाही. यासाठी मराठीला आपला शब्दसंग्रह अजिबात बदलावा लागेल किंवा सर्वच रूढ शब्द टाकून द्यावे लागतील, असे नव्हे. तिला आपल्या प्रकृतीशी जुळतील असेच शब्द स्वीकारायचे आहेत. प्रत्येक भाषेला तेवढे स्वातंत्र्य अर्थात आहेच. पण शक्य होईल त्या मर्यादेपर्यंत व भाषा सामावून घेऊ शकेल त्या रीतीने ही नवीन परिभाषा आत्मसात करायची आहे. हे संपूर्ण परिवर्तन नसून ते केवळ समन्वयाचे धोरण आहे. या दृष्टीने संस्कृत भाषेतून घेतलेले पर्याय मराठी आत्मसात करू शकणार नाही, असे नाही. असे कित्येक नवे संस्कृत किंवा संस्कृतोत्पन्न शब्द मराठी आज ग्रहण करीत आहे व ते रूढ होत आहेत. असेच जे पारिभाषिक शब्द संघभाषा हिंदीत निश्चित करण्यात

[१] "For a successful solution of the problem of the languages in India, in our view, it is imperative that the same principle of identity should be employed to the maximum possible extent when building up these supplementary vocabularies for our languages."
--*Report of the Official Language Commission*, p. 61.

येत आहेत ते समन्वयासाठी मराठीने स्वीकारले तर त्यात हिंदीच्या अनुकरणाची किंवा आक्रमणाची भीती वाळगणे अनाठायी आहे. मराठीची मूळ प्रकृती यात बिघडेल असेही मानण्याचे कारण नाही. काही रूढ शब्द वापरातून गेल्याने भाषेच्या प्रकृतीला धोका पोचतो, असे नव्हे. जुने शब्द वापरातून जाणे व नवे शब्द रूढ होणे ही क्रिया तर भाषेच्या आवश्यकतेनुसार नित्य चालूच असते. ते भाषेच्या जिवंतपणाचे लक्षणच मानण्यात येते. रूढ शब्दांविषयी आत्मीयभाव निर्माण होतो तो वस्तुत: सवयीचा भाग असतो. शास्त्रीय परिभाषेची एक नवी घडण, एक नवा आविष्कार, भारतात आपण सहकार्याने घडवीत आहोत. अशाच दृष्टीने मराठीने या प्रयोगाकडे पाहिले पाहिजे. या नव्या बदलाशी सुसंवादी राहणे हे प्रतिगामित्व नसून पुरोगामित्वच ठरावे. कालमानानुसार नवे स्वीकारण्याची तयारी हीच पुरोगामित्वाची कसोटी नव्हे काय ?

भारत सरकारच्या या एकरूप परिभाषेच्या धोरणाचा अवलंब मराठीला शासनव्यवहाराच्या भाषेत शक्यतोवर करावा लागणार असल्यामुळे तिला सर्व भाषांना समान अशा काही संज्ञा स्वीकाराव्या लागतील. क्वचित थोडे वेगळे रूप व वळण घ्यावे लागेल. शासन-व्यवहारातील मराठीचे स्वरूप नित्याच्या मराठीहून काहीसे बदललेले भासेल. विशिष्ट व्यवहारानुरूप भाषेच्या स्वरूपात व शब्दसंग्रहात पडणारा थोडाफार फरक हा भाषेला मान्य होतो की नाही, सामान्य व्यवहाराची भाषा व प्रशासनिक भाषा ही एकरूप असावी काय किंवा असते काय, असे प्रश्न येथे निर्माण होतात. या प्रश्नांची चर्चा पुढील प्रकरणात केली आहे.

# शासनव्यवहाराची भाषा

**शासनव्यवहार** हा सुसंस्कृत मानवसमाजाच्या अनेकरूप व्यवहाराचाच एक भाग आहे. इतर अनेक कामांसाठी भाषेचा जसा आपण उपयोग करतो तसाच तो प्रशासनाच्या कामासाठीही करतो. समाज-व्यवहाराची अनेक अंगे व रूपे असतानाही तो व्यवहार करणारा समाज एकच आहे असा प्रत्यय आपणाला येत असतो. त्याचप्रमाणे या अनेकरूप व्यवहारासाठी वापरण्यात येणारी भाषा एकच असावी अशी समजूत सामान्यत: आपण मनात बाळगीत असतो. या समजुतीनेच राज्यकारभारासाठी वापरण्यात येणारी भाषा ही तदितर व्यवहाराच्या भाषेहून वेगळी नसावी, अशी आपली सर्व-साधारणपणे कल्पना झालेली असते. पण ही कल्पना भाषेच्या वास्तव स्वरूपास धरून आहे काय ? शासनव्यवहारातच नव्हे, तर इतर अनेक ठिकाणी वापरात येणारी भाषा ही एकच असते की व्यवहारागणिक तिच्या रूपात थोडाबहुत तरी बदल घडतो ? एका व्यवहारासाठी उपयोगी पडणारी भाषा त्याच स्वरूपात दुसऱ्या व्यवहारासाठी वापरता येते काय ? या व अशाच इतर प्रश्नांचा तात्त्विक आणि व्यावहारिक दृष्टीतून नीट विचार केल्यास सामान्य

व्यवहारातील मराठी भाषा संपूर्णपणे शासनव्यवहारासाठी उपयोगी पडेल किंवा नाही हे ठरवता यावे.

**भाषा : व्यवहाराचे एक साधन**

भाषा ही मानवी जीवनाचे एक अपरिहार्य अंग आहे. भाषेच्या द्वारे परस्पर विचारविनिमय शक्य होत असल्यामुळे समाजातील निरनिराळे लोक एकत्र येऊ शकतात. कोणताही समाज सुस्थिर राहू शकतो व प्रगती करू शकतो तो भाषेचा आश्रय घेऊनच. भाषेशिवाय समाजाची कल्पना करणे असंभवनीय आहे. सर्व तऱ्हेच्या सामाजिक संबंधांची उभारणी भाषेच्या माध्यमाचा उपयोग करूनच होऊ शकली आहे. कुटुंब, शेजार, वर्ग, व्यवसाय, राष्ट्र, धर्म असे अनेक संबंध मानवी समाजात निर्माण झाले व टिकून राहिले ते भाषेच्या आधारावरच. भाषेचे साधन उपयोगात आणून मनुष्य आपले सर्व व्यवहार चालवतो, समाजात आपले अस्तित्व टिकवून ठेवतो आणि ज्ञानाच्या व अनुभवाच्या विविध क्षेत्रांत स्वतः कार्य करू शकतो व इतरांशी सहकार्य करतो. भाषाशास्त्राने केलेली भाषेची व्याख्या तिच्या याच स्वरूपाचा बोध करून देते. मनुष्यप्राणी ज्यायोगे परस्परांशी विचारविनिमय व सहकार्य करू शकतो अशा कार्यकारणरहित व परंपरागत ध्वनिसंकेतांची व्यवस्था म्हणजे भाषा होय.[१] भाषा हे एक ध्वनिसंकेतरूप साधन आहे. हे संकेत त्यांच्या आशयाशी कार्यकारणभावाने संबद्ध नसून परंपरागत आहेत. या संकेतांच्या स्वरूपाचा विचार ही झाली भाषाव्यवस्थेची शास्त्रीय बाजू पण प्रस्तुत विवेचनात खरे महत्त्व आहे ते या संकेतांच्या सामाजिक अंगाला. हे संकेत आपण वापरतो ते व्यक्तीव्यक्तीतील आणि व्यक्ती व समाज यांच्यातील व्यवहार चालू राहावा व तो सुकर व्हावा म्हणून. हा सामाजिक व्यवहार देशकालपरिस्थितीप्रमाणे बदलत

---

[१] "Language is a system of arbitrary and conventional vocal symbols by means of which human beings communicate and co-operate with one another."
—Simeon Potter : *Language in the Modern World*, p. 208.

असतो. त्यामुळे ज्या भाषारूपी साधनाद्वारे तो करायचा त्या साधनाचे स्वरूपही बदलत असते. या दृष्टीने भाषेच्या सार्वकालिक व स्थिर अशा स्वरूपाची कल्पना करणे संभवनीय ठरत नाही. ऐतिहासिकदृष्ट्या पाहिले, तर निरनिराळ्या कालखंडात भाषेचे स्वरूप त्या त्या काळानुसार व परिस्थितीप्रमाणे बदलले असल्याचे स्पष्ट दिसते. भाषेची मूलभूत घटना, तिची ध्वनिप्रक्रिया व रूपप्रक्रिया, व्याकरणविशेष आणि थोड्याबहुत भाषिक परिपाटी या तशाच असल्या तरी शब्दसंग्रह, वाक्प्रचार, अभिव्यक्तीची धाटणी इत्यादी बाबतींत कितीतरी परिवर्तन घडून येते. मराठी भाषेचा यासंबंधीचा इतिहास आपण पाहिलाच आहे. भाषा ही एक प्रवाही व जिवंत व्यवहारसरणी आहे. तिच्यात सातत्य आहे, तेवढीच परिवर्तनशीलता आहे. ही परिवर्तनशीलता भाषेच्या गतिमानतेचे लक्षण होय. भाषेत गतिमानता नसली तर सामाजिकदृष्ट्या तिची उपयुक्तता कमी होत जाते व शेवटी ती केवळ एक मृतप्राय भाषा म्हणून उरते.

### लौकिक भाषा व तांत्रिक भाषा

ऐतिहासिकदृष्ट्या भाषा ही जशी सार्वकालिक व स्थिर नाही तसेच समकालीन व्यवहारातही तिचे रूप सार्वत्रिक व समान राहत नाही. याचे कारण मानवी व्यवहार हा जसा सतत गतिमान आहे तसाच तो अनेकरूप व विविध आहे. मानवी व्यवहारातील विविधता सामाजिक संबंधातील विविधतेमुळे निर्माण होते. कुटुंब, वर्ग, जाती, गट, व्यवसाय इत्यादी निरनिराळ्या संबंधात समाजातील व्यक्ती एकत्र येत असतात. या भिन्न भिन्न संबंधानुसार भाषेच्या वापरात फरक पडत जातो. ज्या ज्या व जेवढ्या प्रकारे सामाजिक संबंधाची कल्पना करता येऊ शकते, त्या त्या प्रकारात भाषेच्या स्वरूपाची व व्यवहाराची कल्पना करावी लागते. या प्रत्येक स्तरावर भाषेचे रूप बदलते. इतकेच नव्हे, तर एकच व्यक्ती वेगवेगळ्या वेळी, वेगवेगळ्या संबंधात जी भाषा वापरील तीही

एकसारखी असू शकत नाही. कुटुंबात निरनिराळ्या नात्यांनी वावरताना, कुटुंबाबाहेर शेजारी व मित्र म्हणून वागताना, विशिष्ट वर्गातील घटक म्हणून व्यवहार करताना किंवा आपले व्यावसायिक काम वा पेशा चालवताना, ती व्यक्ती त्या त्या प्रसंगानुरूप वेगवेगळी भाषा उपयोगात आणील. या भाषाव्यवहारातील शब्दसंग्रह वेगळा राहील; वाक्प्रचार, अर्थच्छटा व संदर्भ वेगळे राहतील. भाषेचे हे बहुरंगी रूप लक्षात घेतले तर भाषा एक असते, असे मुळी म्हणताच येणार नाही. याचा अर्थ समाजाच्या एका सामान्य पातळीवर सर्वांना वापरता येईल असे भाषारूपी साधन उपलब्ध नसते, असा नव्हे. अशी एक व्यवहारभाषा वा समाजभाषा असतेच. सर्वांच्या सामान्य गरजा, सामान्य घडामोडी, सामान्य परिचित वस्तू, सामान्य भावना इत्यादी गोष्टींना मूर्तस्वरूप देणाऱ्या या भाषेला ' लौकिक भाषा ' असे नाव देता येईल.[1] भाषा म्हटली की, सामान्यत: तिचे हे स्वरूप लक्षात येते. शिक्षित-अशिक्षित, शेतकरी-कामकरी या सर्वांना सहज समजणारी अशी ही भाषा असते. परंतु या भाषेच्या जोडीला समाजव्यवहारात भाषेचा आणखीही एक दुसरा प्रकार दृष्टीस पडतो. विशिष्ट वर्गापुरत्या मर्यादित असलेल्या व्यवहारासाठी वा व्यवसायासाठी वापरण्यात येणारी व वर्गवैशिष्ट्याचा छाप असलेली भाषा वरील सामान्य भाषेपेक्षा काहीशी वेगळी असते. " मर्यादित वर्गाच्या या विशिष्ट भाषेला ' तांत्रिक भाषा ' हे नाव " देता येईल.[2] या भाषेचे स्वरूप आणि तिची पातळी सामान्य भाषेपेक्षा वेगळी असते. ' विवक्षित कामासाठी समाजातील व्यक्ती एखाद्या गटात अथवा वर्गात ज्यावेळी संघटित होतात, तेव्हा सर्वसाधारण समाजाच्या भाषेहून वेगळी अशी भाषा प्रचारात येते.'[3] निरनिराळे व्यवसाय व व्यापार,

---

[1] डॉ. ना. गो. कालेलकर : भाषा आणि संस्कृति, पृ. ४२.

[2] डॉ. ना. गो. कालेलकर : भाषा आणि संस्कृति, पृ. ४३.

[3] " Whenever men are organised into groups for the purpose of some specific action, they tend to develope a language foreign in some measure to the language of the larger society in which they move. "

—M. M. Lewis : *Language in Society*, p. 48.

उद्योग व शिल्प, विज्ञान व तंत्रशास्त्र यांच्या निरनिराळ्या शाखा, वृत्तपत्रव्यवसाय, सेनादले, धर्मसंस्था, शिक्षणसंस्था, खेळ इत्यादी क्षेत्रांत त्यांचा वेगवेगळा शब्दसंग्रह उपयोगात येतो.[१] प्रशासन व्यवहाराचेही वरील सारखेच एक वेगळे पण व्यापक क्षेत्र आहे आणि त्यात समाविष्ट होणाऱ्या वेगवेगळ्या विषयांनुरूप त्याचा शब्दसंग्रहही वेगळा आहे. या प्रत्येक क्षेत्रातील भाषेचे एक वेगळे वळण असते. म्हणूनच सामान्य जनतेची भाषा किंवा समाजभाषा आणि तांत्रिक भाषा या दोन्ही एकरूप असू शकत नाहीत. सामान्य व्यवहाराच्या भाषेचे स्वरूप पुष्कळसे स्थिर व साचेबंद असते. ही भाषा " स्थिर संकेतांनी बनलेली, थिजलेल्या स्वरूपाची " असते. नित्याच्या मर्यादित व्यवहारापुरताच तिचा उपयोग असल्याने तिचा शब्दसंग्रह ठराविक व मर्यादित असतो. या शब्दांना निश्चित व काटेकोर अर्थ नेहमीच असेल, असे म्हणता येत नाही. संदर्भानुसार एकच शब्द निरनिराळ्या अर्थी वापरला जाऊ शकतो. सामान्य भाषेतील शब्दसंग्रहाच्या मर्यादित स्वरूपामुळे व संदिग्धतेमुळे व्यवसायविशिष्ट तांत्रिक भाषांना आपला वेगळा शब्दसंग्रह तयार करावा लागतो व नित्याच्या भाषेतील शब्दांनाही कधी कधी वेगळा व निश्चित अर्थ द्यावा लागतो. यातूनच त्या त्या व्यवसायातील वा क्षेत्रातील परिभाषा निर्माण होते. या विशिष्ट परिभाषेमुळे तांत्रिक भाषा व सामान्य व्यवहाराची समाजभाषा यांच्या स्वरूपांत फरक पडत जातो. या दोन प्रकारच्या भाषा हळूहळू वेगवेगळे रूप घेतात.

### आणखी एक वर्गीकरण

वरील वर्गीकरणाप्रमाणे भाषेचे आणखीही दुसऱ्या प्रकारे वर्गीकरण करता येण्यासारखे आहे. समाजभाषा आणि व्यवसायभाषा असा

---

[१] "Larger groupings bound together by the same interests—professions, trades and crafts, the various branches of science and technology, journalism, the Forces, the Church, academic institutions, games and sports, etc. etc.—all have their special vocabulary."

—Stephen Ullman : *Words and their Use*, p. 64.

प्रकारभेद करताना नित्य वापरातल्या बोलभाषेची ती विशिष्ट रूपे होत असे गृहीत धरले होते. पण ही ‘ बोली ’ लेखननिविष्ट झाली म्हणजे तिच्यावर विशिष्ट संस्कार घडतात, ती परिष्कृत होत जाते व तिला ‘ भाषा ’ म्हणून स्वतंत्र स्वरूप प्राप्त होते. तिला मिळणाऱ्या परंपरागत मान्यतेमुळे तिच्या ठिकाणी एक तऱ्हेची स्थिरता निर्माण होते. कलानिर्मितीचे माध्यम म्हणून व ज्ञानाच्या संचयसंवर्धनाचे नि प्रसाराचे साधन म्हणून तिचा उपयोग होऊ लागतो. मग ती केवळ बोलव्यवहारापुरती मर्यादित न राहता कला व विज्ञान यांना स्थायी स्वरूप देण्याचे कार्य करते व अशा रीतीने त्या त्या भाषिक समाजाच्या संस्कृतीविकासाचा निकष होऊन राहते.

या लेखननिविष्ट भाषेच्या वरील कार्यानुरूप कलात्मक भाषा किंवा साहित्याची भाषा आणि ज्ञानात्मक भाषा म्हणजेच शास्त्र-विज्ञानाची भाषा असे दोन परस्परभिन्न प्रकार अस्तित्वात येतात. सर्वसामान्य भाषिक व्यवहारासाठी उपयोगात येणाऱ्या समाजभाषेहून अथवा लौकिक भाषेहून लेखननिविष्ट भाषेचे हे दोन प्रकार वेगळे असतात. तांत्रिक भाषा म्हणून पहिल्या वर्गीकरणात जिचा उल्लेख केला आहे ती भाषा शास्त्रविज्ञानाच्या भाषेतच अंतर्भूत होते. नित्यव्यवहाराच्या समाजभाषेत आणि लेखन-निविष्ट भाषेच्या वरील दोन प्रकारांत दिसणाऱ्या वेगळेपणाचे एक कारण आहे. पहिल्या नित्यव्यवहाराच्या भाषेत समाजाला महत्त्व असते, तर कलात्मक किंवा ज्ञानात्मक भाषेत व्यक्तीला अथवा व्यक्तींच्या गटाला महत्त्व असते. समाजभाषा ही “ नेहमीच्या स्थिर व्यवहाराची, जीवनातल्या यांत्रिक नियमिततेने परत परत केल्या जाणाऱ्या गोष्टींची ” स्थितिशील भाषा असते. पण “ दुसऱ्या भाषेत व्यक्त होणाऱ्या अनुभवांसमोर साचेबंद भाषिक प्रयोग हात जोडून उभे नसतात. ते बनवावे लागतात, शोधून काढावे लाग-तात; कित्येकदा तर ते इतरांना समजतील की नाही, आवडतील की

नाही, मान्य होतील की नाही, याबद्दलही शंका असत. कारण ही भाषा गतिमान, नवे प्रयोग करणारी, पूर्वी व्यक्त न झालेले साकार करण्याचा प्रयत्न करणारी अशी असते. गतिमान जीवनाचे म्हणजे नवविचारांचे, सामाजिक घडामोडींचे, चाकोरीबाहेरून येणाऱ्या अनपेक्षित धक्क्यांचे, शास्त्रीय प्रगतीचे प्रतिबिंब आपणाला दिसते ते भाषेच्या. या नव्या परिवर्तित होणाऱ्या अवतारात. कदाचित व्याकरण बदलत नसेल, शब्दांचे तोंडवळेही परिचित वाटतील, पण शब्दांचा नवा उपयोग होईल. त्यांत पूर्वी न दिसलेल्या अर्थाच्या छटा दिसतील आणि अभिव्यक्तीचे एक नवे सामर्थ्य प्रत्ययाला येईल."[१]

कलात्मक वा साहित्यिक आणि शास्त्रीय व तांत्रिक भाषेचे सामान्य व्यवहारभाषेहून असलेले वैधर्म्य आपण पाहिले. प्रशासनाची भाषा ही व्यवसायभाषा म्हणून लिखित स्वरूपात तांत्रिक भाषेच्या सदरातच मोडते. लोकशाही प्रणालीच्या प्रशासनाची व्याप्ती किती वाढली आहे याचा मागेच उल्लेख आला आहे. आज शासनव्यवहाराच्या कक्षेत निरनिराळ्या विभागांशी संबंधित म्हणून कृषी, वैद्यक, शिल्प व वास्तुविद्या, विद्युत व अभियांत्रिकी, विधी व न्याय इत्यादी अनेक विषय येतात. या सर्वांचा संबंध शास्त्रीय व तांत्रिक ज्ञानाशी येतो. तेव्हा प्रशासनातील भाषेचे स्वरूप बऱ्याच मोठ्या प्रमाणात शास्त्रीय व तांत्रिक स्वरूपाचे असते. शास्त्रीय व तांत्रिक भाषेची सर्वच नव्हेत तरी पुष्कळशी लक्षणे शासनव्यवहाराच्या भाषेलाही लागू होतात. या दृष्टीने शास्त्रीय व तांत्रिक भाषेची वैशिष्टये काय आहेत, साहित्यिक वा कलात्मक भाषेहून, तसेच सामान्य व्यवहारभाषेहून, तिचे स्वरूप का व कसे वेगळे आहे हे पाहिल्यास प्रशासनात प्रयुक्त होणाऱ्या भाषेच्या स्वरूपाचा नीट बोध होईल आणि त्याबरोबरच सामान्य

---

[१] डॉ. ना. गो. कालेलकर : भाषा आणि संस्कृति, पृ. १२७.

जनतेची भाषा अथवा साहित्यिक भाषा शासनव्यवहारात वापरता येईल काय, या प्रश्नाचाही उलगडा होईल.

**समाजभाषेचे स्वरूप**

सामान्य व्यवहाराच्या पातळीवर वापरण्यात येणाऱ्या भाषेचे स्वरूप व उपयोग मर्यादित असतात, हे यापूर्वी आपण पाहिलेच आहे. ही भाषा व्यक्तिभाषा नसून समाजभाषा असल्यामुळे तिची एक ठराविक पातळी असते, व ती विशिष्ट देशकाल व समाजाची परिस्थिती यावर अवलंबून असते. समाज जितका अधिक सुसंस्कृत तितकी ही पातळी वरची असते. पण समाज कितीही सुसंस्कृत असला तरी त्याच्या नित्याच्या वापरातील भाषेला एक प्रकारची मर्यादा पडते. व्यक्तिसमूहाच्या सामान्य गरजा व सामान्य विचारभावना यापुरताच तिचा उपयोग असल्याने हे सामान्यत्व तिची मर्यादा होऊन बसते. सामान्य किंवा ठराविक आशयापलीकडे तिचा आवाका जाऊ शकत नाही; वेगळा किंवा विशेष आशय असला की ही भाषा थिटी पडते. आशयाप्रमाणेच तिची अभिव्यक्तीही सामान्य व साचेबंद असते, शब्दसंग्रह तोकडा असतो. रोजच्या जीवनातील सोपे व सामान्य अनुभव वा विचार व्यक्त करण्यासाठीच ती वापरण्यात येत असल्यामुळे एक प्रकारचा स्वभावसिद्ध सोपेपणा तिच्या ठिकाणी निर्माण होतो. हा सोपेपणा एका दृष्टीने नित्याच्या भाषेचा जसा गुण ठरतो तसाच दुसऱ्या अर्थी तिची मर्यादा व सामान्य पातळी दर्शवितो. ही पातळी व तदनुषंगिक सोपेपणा टिकवून ठेवण्याकडे या सामान्य भाषेचा कल असतो. ज्यावेळी वरच्या स्तरावरील विचारकल्पना किंवा नवी तथ्ये व अनुभव व्यक्त करण्याचा प्रसंग निर्माण होतो व त्यासाठी निराळ्या अभिव्यक्ती शोधाव्या लागतात अशा वेळीही या अभिव्यक्तींना सामान्य भाषेत प्रवेश मिळत नाही. शास्त्रीय व तांत्रिक परिभाषा सामान्य भाषेहून वेगळी पडते ती या कारणानेच.

सामाजिक मनाची रूढिप्रियता हेही या प्रवृत्तीचे एक कारण असू शकते. समाजभाषेवर रूढींचे फार मोठ्या प्रमाणात नियंत्रण असते. भाषेच्या मूळ स्वरूपाचा विचार करता ती एक रूढीच आहे, हे मान्य करावे लागते. तथापि, या रूढीचे नियंत्रण कोठे स्वीकारावे व त्याला कोठे मर्यादा घालाव्या, या विवेकातनच भाषेचा विकास होत असतो. समाजभाषेच्या वापराचे क्षेत्र मर्यादित असल्यामुळे तिला हा विवेक करण्याचे कारण नसते व ती रूढ प्रयोगांना चिकटून राहू शकते. परंतु नित्य विस्तारणाऱ्या शास्त्रीय व तांत्रिक ज्ञानाच्या क्षेत्रांत किंवा कलेच्या नवनवोन्मेषशाली स्फुरणात भाषिक प्रयोगाबाबत केवळ रूढीवर अवलंबून राहता येत नाही. येथे नवीन प्रयोग केले नाहीत तर प्रगतीचा मार्गच खुंटेल. सामान्य सामाजिक व्यवहाराच्या बाबतीत पाहिले तरी तोही अगदीच स्थितिशील आहे असे म्हणता येणार नाही. बदलत्या परिस्थितीप्रमाणे सामान्य व्यवहारालाही नव्या अनुभवांची दखल घ्यावी लागते व त्यासाठी नव्या अभिव्यक्तीची आवश्यकता भासते. पण अशा वेळीही नवीन शब्दांचा स्वीकार करण्याऐवजी, आहे त्याच शब्दसंग्रहाचा उपयोग करून घेण्याकडे व सोपेपणाचा सामान्य स्तर टिकविण्याकडे रूढिप्रिय सामाजिक मनाची प्रवृत्ती असते.

वरील प्रवृत्तीचा परिणाम सामान्य भाषेच्या शब्दसंग्रहावर ताण पडण्यात होतो. एकाच शब्दाला अनेक अर्थ द्यावे लागतात. शब्दांच्या अर्थच्छटा त्यामुळे वाढतात. ही एकापरी भाषेच्या विकासाची प्रक्रियाच असली तरी त्यामुळे भाषिक प्रयोगांत काही दोष निर्माण होतात. शब्दांच्या अर्थाला त्यामुळे नेमकेपणा राहत नाही. अर्थाचा निश्चितपणा जेथे आवश्यक असतो अशा शास्त्रविज्ञानादी क्षेत्रांत सामान्य भाषेतील शब्दांचा यामुळेच उपयोग होऊ शकत नाही. नेमकेपणाच्या अभावामुळे अशा शब्दांचा अर्थ बहुतांशी संदर्भावर अवलंबून असतो. संदर्भावलंबित्व हे अर्थप्रक्रियेतील एक मान्य तत्त्व असले तरी ते, अर्थनिश्चितीची हानी होईल येथपर्यंत,

ताणता येत नाही. अर्थाला नेमकेपणा नसल्यामुळे सामान्य भाषेतील शब्दांत संदिग्धार्थत्वाचा दोष निर्माण होतो. हा दोष दैनंदिन सामान्य व्यवहारात खपू शकला तरी शास्त्रीय–तांत्रिक क्षेत्रात आणि विधि–प्रशासनासारख्या व्यवहारात तो अडचणीचा ठरतो.

सामान्य जनतेची भाषा असलेल्या समाजभाषेचे स्वरूप आणि प्रवृत्ती काय आहेत, याची वरील सविस्तर विवेचनावरून कल्पना येऊ शकेल. ही भाषा शास्त्रीय व तांत्रिक विषयांच्या पातळीवर कशी उपयोगी पडू शकत नाही, याचाही विवेचनाच्या ओघात वर निर्देश केला आहे. शास्त्रीय किंवा तांत्रिक भाषेहून वेगळी म्हणून जिचे वर्गीकरण केले आहे त्या कलात्मक वा साहित्यिक भाषेचा यानंतर विचार करायचा आहे. वस्तुतः या दोन्ही भाषांची प्रयोजने वेगळी असल्यामुळे त्यांच्या स्वरूपात तफावत असणे साहजिकच आहे. साहित्यिक भाषेच्या कोणत्या लक्षणांमुळे शास्त्रीय वा तांत्रिक क्षेत्रात तिचा वापर होऊ शकत नाही ते आता थोडक्यात पाहू.

### साहित्याची भाषा

भाषेचा उपयोग सामान्यतः दोन प्रकारे होऊ शकतो. पहिल्या प्रकारात एखाद्या वस्तुसत्यासंबंधीचे प्रतिपादन करण्याचा किंवा माहिती देण्याचा उद्देश असतो, तर दुसऱ्या प्रकारात भावप्रकटीकरण हा हेतू असतो.[1] साहित्याची भाषा वरीलपैकी दुसऱ्या प्रकारात मोडते. व्यक्तीच्या मनातील भावसत्य कलात्मक रीतीने प्रकट करणे हे साहित्याच्या भाषेचे प्रयोजन आहे. शास्त्रविज्ञानाच्या क्षेत्रांतील वस्तुसत्याहून हे भावसत्य भिन्न असते. वस्तुसत्य हे व्यक्तिनिरपेक्ष असते, तर भावसत्य हे व्यक्तिसापेक्ष असते. विविध अनुभवसंवेदनांद्वारा बाह्य विश्वाचे व त्यातील घटनांचे एखाद्या संस्कारक्षम व्यक्तीला जे दर्शन घडते, त्यातील सत्याची जी प्रचीती येते, तेच तिचे भावसत्य. ते

---

[1] S. I. Hayakawa : *Language in Thought and Action.*

प्रकट करण्याच्या उत्कटतेतून साहित्यनिर्मिती होत असते. या निर्मितीतील आशय जसा एका व्यक्तीचा असतो, तसाच त्याचा आविष्कारही त्याच व्यक्तीचा असतो. यामुळेच साहित्याची भाषा ही व्यक्तिभाषा ठरते. तिच्यावर लेखकाच्या अथवा कवीच्या व्यक्तिमत्त्वाचा ठसा उमटलेला असतो. साहित्याच्या भाषेत शैलीला महत्त्व असते ते यामुळेच. शैलीच्या या महत्त्वामुळे साहित्य हे अभिव्यक्तिप्रधान असते असे म्हणावयास हरकत नाही. भाषेच्या मूळ शक्तीचा, तिच्या प्रभावीपणाचा प्रत्यय समाजभाषेत किंवा शास्त्रीय भाषेत जेवढा येत नाही तेवढा तो साहित्याच्या भाषेत येतो. शब्दांना साहित्याच्या भाषेत या दृष्टीने अतिशय महत्त्व असते. तेथे शब्द शास्त्रीय भाषेतल्याप्रमाणे केवळ वस्तूंचा वा कल्पनेचा वाचकच तेवढा नसतो, तर लेखकाच्या किंवा कवीच्या मनाच्या मुशीतून तो एक निराळेच रूप घेऊन येतो. त्याच्या अनुभूतीच्या अनेक सौंदर्यच्छटा त्यात मिसळलेल्या असतात. साहित्याच्या भाषेतील शब्दांना रूप, रंग, नाद असतो. साहित्यिक रचनेच्या आकृतिबंधात या शब्दांना त्यांचे नेमके स्थान असते. या गोष्टी लक्षात घेता साहित्याच्या भाषेत शब्दांची निवड व शब्दांची योजना महत्त्वाची असते. साहित्यिक आपला आशय व शैली यांना अनुरूप अशा पर्यायांतून योग्य तो शब्द निवडतो. शास्त्रीय भाषेत अशा निवडीस वाव नसतो. एक शब्द व त्याचा एकच अर्थ ठरलेला असतो, आणि तो कोठे वापरायचा हेही निश्चित असते. नित्याच्या समाजभाषेत शब्दांची निवड आणि योजना हेतुपूर्वक नसते. कोणताही पर्याय वापरला आणि तात्कालिक गरज भागली की पुरे असते. शब्दयोजना शिथिल असली पण अर्थबोध होत असला, तरी चालू शकते.

साहित्याच्या भाषेत शब्दांच्या निवडीमागे आशयघनतेइतकाच कलात्मकतेचा, सौंदर्याचा भाग असतो. काव्यात शब्द आणि अर्थ यांच्यात परस्परसौंदर्याची स्पर्धा असते, असे संस्कृत साहित्यशास्त्रात

म्हटले आहे ते याच अर्थी.[१] या दृष्टीनेच साहित्याच्या भाषेत नादसौंदर्याला, लयबद्धतेला स्थान असते. अर्थसौंदर्य निर्माण करण्यासाठी या भाषेत शब्दांच्या लक्षणा, व्यंजना यासारख्या शक्तींचा उपयोग करून घेण्यात येतो. वाच्यार्थापेक्षाही अनेक अर्थच्छटा व्यक्त करणारा ध्वन्यर्थ हा अशा अर्थसौंदर्यास पोषक ठरतो. म्हणून एकच अर्थ व्यक्त करणाऱ्या शब्दांपेक्षा विविध अर्थांची व्यंजना करणाऱ्या अनेकार्थक शब्दांना साहित्याच्या भाषेत अधिक मान असतो. याच्याच जोडीला नादसौंदर्य व उक्तिवैचित्र्य साधण्यासाठी एकाच शब्दाच्या अनेक पर्यायांचाही उपयोग या भाषेत आढळून येतो. म्हणजेच अनेकार्थक एकच शब्द व एकाच अर्थाचे अनेक शब्द साहित्याच्या भाषेत प्रयुक्त होतात. शास्त्रीय व तांत्रिक भाषेत अर्थाचा निश्चितपणा ही महत्त्वाची कसोटी असल्यामुळे अनेकार्थक शब्दांना या क्षेत्रात वाव नसतो. भाषेच्या कलात्मक व्यक्तिनिष्ठ उपयोगातून व शैलीच्या विविध प्रयोगांतून शब्दांना नवे अर्थ, नवे संदर्भ व नव्या अर्थच्छटा सतत प्राप्त होत असतात. शब्दांची अर्थवत्ता वाढत असते, पण निश्चितार्थता मात्र कमी होत असते. त्यामुळे शास्त्रीय व तांत्रिक क्षेत्रांत या शब्दांचा उपयोग टाळून नवी परिभाषा निर्माण करावी लागते.

साहित्याच्या भाषेची विशेष लक्षणे कोणती व त्यामुळे नित्य व्यवहाराच्या भाषेप्रमाणेच याही भाषेचा उपयोग शास्त्रीय व तांत्रिक क्षेत्रांत का होऊ शकत नाही, हे येथवर पाहिले. आता या दोन क्षेत्रांत व त्यांशी संबंधित किंवा तत्सदृश्य विषयांत वापरण्यात येणाऱ्या भाषेच्या वैशिष्ट्यांचा विचार करू.

### शास्त्रीय व तांत्रिक क्षेत्रांतील भाषा

भाषेचा उपयोग भावसत्य प्रकट करण्याकडे जसा होतो, तसाच बाह्य विश्वातील वस्तूंचे ज्ञान करून देण्याकडेही होतो. निरनिराळी

[१] "अनयोः शब्दार्थयोर्या काप्यलौकिकी चेतनचमत्कारकारितायाः कारणं अवस्थितिर्विचित्रैव विन्यासभंगी। कीदृशी, अन्यूनातिरिक्तत्वमनोहारिणी, परस्परस्पर्धित्वरमणीया।"—कुंतक : वक्रोक्तिजीवित (सं. डॉ. नगेंद्र, पृ. ६०).

शास्त्रे, विज्ञान, तंत्रज्ञान इत्यादी क्षेत्रांत भाषा वस्तुसत्याचे प्रतिपादन करण्याचे काम करीत असते. वस्तुसत्य हे व्यक्तिविशिष्ट नसते, सार्वत्रिक असते. हे सत्य एखाद्या व्यक्तीच्या भावनासंवेदनांतून प्रकट होत नसून, तिच्या अवलोकनचिंतनातून व अनुभवप्रयोगांतून ज्ञात होत असते. ते भावनारंजित असत नाही, ज्ञानात्मक असते. ते व्यक्तिबाह्य व वस्तुनिष्ठ असते. या सत्याचे प्रतिपादन करताना भाषेचा जो वापर होतो तोही वस्तुनिष्ठ असतो. व्यक्तीचा संबंध त्यात येत असला तरी त्यावर वस्तुनिष्ठतेची छाया पडलेली असते.

शास्त्रीय भाषेत शैलीला व भाषेच्या अलंकरणाला किंवा लालित्याला स्थान नसते. तार्किक संगती हेच या भाषेचे अलंकरण. ही तार्किक संगती सावण्यासाठी विचार व त्यांची अभिव्यक्ती स्पष्ट व नेमकी पाहिजे. म्हणूनच शास्त्रीय विषयांतील भाषेत स्पष्टार्थता व यथार्थता या गोष्टी आवश्यक मानल्या आहेत.[१] अर्थनिश्चितीस बाध येईल, त्यात संदिग्धता निर्माण होईल, किंवा इष्ट अर्थाहून अवांतर अर्थ प्रतीत होईल अशा तऱ्हेची शब्दयोजना या भाषेत चालू शकणार नाही. शब्दाचे अनेकार्थत्व हा साहित्याच्या भाषेचा गुण असेल ; पण शास्त्रीय भाषेत तो दोष ठरतो. ही भाषा सर्वार्थाने अभिधामल असते. शब्दाला एकच आणि निश्चित अर्थ असणे या भाषेत आवश्यक असल्यामुळे येथे वाच्यार्थच प्रधान असतो. साहित्याच्या क्षेत्रात आशयाइतकेच अभिव्यक्तीला महत्त्व असल्यामुळे भाषेची परिणामकारकता, तिचे सामर्थ्य व सौंदर्य या गोष्टींना अवसर असतो; पण शास्त्रीय व तांत्रिक विषयांत भाषेची कसोटी वेगळी असते. या भाषेत शब्द हा एखाद्या कल्पनेचा, वस्तूचा वा तत्त्वाचा अर्थ स्पष्ट करीत नाही ; त्यांचे तो केवळ प्रतीक असतो. शास्त्रीय क्षेत्रातील वस्तुसत्य हे प्रतीकात्मक रीतीने व सूत्राच्या स्वरूपात सांगितले जाते. त्यामुळे भाषेचा अनावश्यक विस्तार जसा कमी होतो

[१] "Of this language (language of science), there are two chief things to be said. It must be clear and it must be accurate."
—Wendell Johnson : *People in Quandaries*, p. 50.

तसाच आशयाला नेमकेपणा येतो. अर्थाचा नेमकेपणा निर्माण करणारी शास्त्रीय व तांत्रिक भाषेतील प्रतीकयोजना म्हणजे तिची परिभाषा होय. ही 'ःरिभाषा या क्षेत्रातील प्रक्रिया, प्रयोग व त्यांचे निष्कर्ष यांची द्योतक असते. नित्यव्यवहाराच्या व साहित्याच्या भाषेतील श‌ःहून हे पारिभाषिक शब्द वेगळे असतात. सामान्य लोकांच्या दृष्टीने ते दुर्बोध वाटणे साहजिक असले तरी अर्थाच्या सुनिश्चितपणासाठी ते वापरणे जरूर असते. दुर्बोधता हे काही परिभाषेचे लक्षण नव्हे; पण सोपेपणा व यथार्थता यांपैकी निवड करताना शास्त्रीय भाषेत यथार्थतेचाच स्वीकार करण्यात येतो. सामान्य भाषेतील शब्दांचा नेमकेपणाने उपयोग करण्यात येत नसल्यामुळे व साहित्याच्या भाषेत एकाच वेळी शब्दांच्या अनेक अर्थच्छटा प्रकट होत असल्यामुळे या भाषांतील शब्दांच्या अर्थाला अस्थिरता येते. शास्त्रीय भाषेतील परि-भाषेचा सर्वसामान्य वापर होत नाही. ती एका मर्यादित क्षेत्रात वापर-ण्यात येते. सामान्य उपयोगाच्या दृष्टीने ती काहीशी अपरिचित असते. यामुळे तिच्यातील शब्दांचा अर्थ स्थिर व निश्चित राहतो. पुष्कळदा सामान्य भाषेतील परिचित शब्दांचाही शास्त्रीय परिभाषेत समावेश करण्यात येतो. पण त्याप्रसंगी हे शब्द अनेकार्थवाचक असतील तर परिभाषा म्हणून त्यांचा एकच अर्थ मान्य करण्यात येतो.

ज्ञानविज्ञानाच्या निरनिराळ्या शाखांची आज जी झपाट्याने वाढ होत आहे तिच्यामुळे नित्यशः नवे विचार, नव्या कल्पना व्यक्त करण्यासाठी नवे नवे शब्द शोधावे लागत आहेत. सामान्य वा साहित्यिक भाषा ही गरज भागवू शकत नाही. भाषा एका जागी स्थिर राहिली, ती नवे भाषिक प्रयोग व नवे शब्द आत्मसात करू शकली नाही, तर या प्रगतीला वाट सापडणार नाही. या आवश्यकतेमुळेच भाषिक परंपरा, रूढी इत्यादी गोष्टींना फार महत्त्व न देता सुबोध-दुर्बोध, परिचित-अपरिचित असे अनेक नवे पारिभाषिक शब्द अस्तित्वात येत आहेत. शास्त्रीय व तांत्रिक भाषा परिभाषाश्रयी का बनते, याचा वरील विवेचनावरून उलगडा होईल.

शास्त्रीय व तांत्रिक भाषेचा स्वतंत्र शब्दसंग्रह जसा निर्माण होतो तशीच तिची घाटणी व व्याकरण या गोष्टीही वेगळ्या असू शकतात.[१] या भाषेत नेमकेपणा व तर्कसंगती कटाक्षाने पाळणे जरूर असते. त्यामुळे या भाषेचा थाट वर्णनात्मक व विस्तारशील असू शकत नाही. शास्त्रीय भाषेची प्रवृत्तीच मुळी संक्षेपाकडे असते. तिच्यातील शब्द स्पष्टीकरणात्मक नसून संकेतात्मक असतात. ते सुटसुटीत व संक्षिप्त असतात. या भाषेची एकंदर बांधणी आटोपशीर व एकजिनसी असते. नित्यव्यवहाराच्या किंवा साहि-त्याच्या भाषेहून काहीसा वेगळा शब्दसंग्रह व रचनेचा घाट, ठराविक परिभाषेचा वापर आणि त्यामागे असलेले विशिष्ट प्रयोजन या कारणांनी ही भाषा विशिष्टार्थक, परंपरानिष्ठ व काहीशी कृत्रिम स्वरूपाची होते.[२] युनेस्कोने शास्त्रीय व तांत्रिक अनुवाद व भाषिक समस्या यासंबंधी १९५७ साली जो अहवाल प्रसिद्ध केला आहे त्यात सर्वसामान्य भाषेहून शास्त्रीय व तांत्रिक भाषा कोणत्या बाबतीत वेगळी असते हे सांगताना पुढील गोष्टींचा निर्देश केला आहे :—(१) तांत्रिक व शास्त्रीय परिभाषा, (२) सामान्य भाषेतील शब्दांना देण्यात आलेला विशेष व पारिभाषिक अर्थ, (३) सामान्य भाषेशी तुलना करता काही विवक्षित महत्त्वाच्या शब्दांची पुनरावृत्ती, (४) शैलीचा व वाक्प्रचारांचा फार कमी प्रमाणातील आढळ व (५) काही विवक्षित व्याकरणरूपांचे तुलनात्मक महत्त्व व वारंवारता.[३]

**प्रशासनाची भाषा**

शासनव्यवहाराच्या भाषेचा समावेश शास्त्रीय व तांत्रिक भाषेत का करावयाचा, हे सुरुवातीस सांगितले आहे. वर निर्दिष्ट केलेली

[१] "A technical language could have its own vocabulary, possibly even its own grammar."
—Karl Vossler : *Spirit of Language in Civilization*, p. 160.

[२] "The so-called technical languages have a tendency towards the purposive, conventional and artificial."
—Karl Vossler : *Spirit of Language in Civilization*, p. 135.

[३] *Scientific and Technical Translating and other Aspects of Language Problem, (UNESCO—1957) : 2.2.8*, p. 33.

शास्त्रीय भाषेची बहुतेक सारी वैशिष्ट्ये प्रशासनाच्या भाषेतही दिसून येतात. सामान्य जनतेच्या भाषेचा अथवा साहित्याच्या भाषेचा ज्या कारणांसाठी शास्त्रीय व तांत्रिक क्षेत्रात उपयोग होऊ शकत नाही त्याचसाठी शासनव्यवहारातही त्या भाषा निरुपयोगी ठरतात. सामान्य व्यवहाराच्या गरजांना पुरी पडणारी भाषा, केवळ ती सर्वजनसुलभ आहे म्हणून राज्यकारभारातही वापरता येईल, असे नाही. आजचे प्रशासन सामान्य व्यवहाराइतके मर्यादित राहिलेले नाही. म्हणून सामान्य व्यवहाराची भाषा आजच्या अनेकमुखी व गुंतागुंतीच्या प्रशासनिक कार्याचा निर्वाह करू शकत नाही. शास्त्रीय, तांत्रिक व व्यावसायिक विषयांशी संबद्ध असल्यामुळे आजची प्रशासनाची भाषा ही परिभाषाप्रधान झाली आहे. मराठीपुरते बोलायचे झाले तर ही भाषा शेतकरी-कामकरी वर्गाच्या सामान्य भाषेहून किंवा ज्ञानेश्वर-तुकारामाच्या 'अमृताते पैजा' जिंकणाऱ्या साहित्यिक भाषेहून स्वाभाविकपणेच भिन्न असणार.

अशी भिन्नता असूनही प्रशासनाची भाषा सर्वसाधारण भाषा-प्रवाहापासून सर्वस्वी वेगळी पडत नाही. शास्त्रीय व तांत्रिक ज्ञान व तत्सदृश शिल्प आणि कला, व्यापार आणि उद्योग, विधि आणि प्रशासन इत्यादी शासनव्यवहारांशी संबंधित क्षेत्रांत प्रयुक्त होणाऱ्या भाषेच्या स्वरूपात जसे साम्य तशीच भिन्नताही आढळते. या निरनिराळ्या क्षेत्रांतील भाषा सर्वसामान्य भाषेहून अगदी वेगळ्या व स्वतंत्र आहेत, असा याचा अर्थ नाही. नदीच्या प्रवाहापासून कालवे काढावेत तसे त्यांचे स्वरूप असते. भाषेची मूळ प्रकृती कायम ठेवून त्या त्या विषयांतील परिभाषेच्या अंगाने तिचा झालेला विकास याच दृष्टीतून या भिन्न वाटणाऱ्या भाषाप्रकारांकडे पाहिले पाहिजे. या भाषाप्रकारांतील भिन्नता ही त्या त्या विषयांचा भाषेच्या स्वरूपावर होणारा विकासात्मक परिणाम होय. शब्द आणि त्यांचा अर्थ हे भाषेचे एकजीव झालेले घटक होत. त्यांना एकमेकांपासून विभक्त करता येत नाही. हे त्यांचे साहचर्य म्हणजेच भाषेचे

अंत:स्वरूप होय. सर्व क्षेत्रांतील भाषा एक प्रकारची असावी असे म्हणताना भाषेचे हे अंत:स्वरूप विचारात घेण्यात येत नाही. मराठी किंवा इतर प्रादेशिक भाषांना गेल्या दीडशे वर्षांत आपला सर्वतोमुखी विकास करून घेण्यास अवसर मिळाला नाही. वर निर्दिष्ट केलेल्या शास्त्रीय, तांत्रिक व विधिप्रशासनादी क्षेत्रांत इंग्रजीचा वापर अनेक शतके चालू आहे. इंग्रजी भाषेच्या मागे या क्षेत्रातील विकासाची एक सुस्थिर परंपरा आहे. प्रादेशिक भाषा या क्षेत्रांत अविकसित आहेत. या भाषांत सामान्य व साहित्यिक भाषाव्यवहाराची परंपराच अधिक प्रचलित असल्यामुळे वरील क्षेत्रांतील विभिन्न सरणींचा या भाषांना पुरेसा परिचय नाही. त्यामुळे सर्वच क्षेत्रांतील भाषा या परंपरेच्या चौकटीत बसाव्यात, असा याबाबतीत काही जणांचा दृष्टिकोन दिसून येतो. पण इंग्रजी भाषेचेच उदाहरण घेतले तर आपणाला काय आढळते ? तेथे साहित्याची भाषा तंत्रविज्ञानादींसाठी वापरण्यात येणाऱ्या भाषेहून निराळी आहे, विज्ञानाची भाषा कायद्याच्या भाषेहून वेगळी आहे आणि कायद्याची भाषा कार्यालयीन भाषेहून भिन्न आहे. दीर्घकाळ उपयोगामुळे या प्रत्येक क्षेत्रात इंग्रजीची शैली सुप्रतिष्ठित झाली आहे आणि तिचा स्तर निश्चित झाला आहे. या शैली लोकांना परिचित झाल्यामुळे त्यांच्या वेगळेपणाचे आज लोकांना आश्चर्य वाटत नाही. पण प्रादेशिक भाषांत हा प्रयोग आपण नव्यानेच करीत असल्यामुळे या भिन्न भिन्न भाषासरणींचा स्वीकार करणे अवघड वाटत आहे. सामान्य व्यवहाराच्या भाषेहून उपरिनिर्दिष्ट विधिविज्ञानादी क्षेत्रांतील भाषासरणी ही कशी वेगवेगळी असते, हे खाली दिलेल्या इंग्रजी भाषेतील चार उताऱ्यांवरून स्पष्ट होईल.

### १. शास्त्रविषयक

*Dry Dehiscent Fruit*—Usually manyseeded, such F.s open or split on maturity to liberate the seed. Most capsules dehisce

valvularly, the side walls (pericarp) splitting longitudinally, and breaking away in segments or valves. Splitting down the dorsal suturesis called loculicidal dehiscence ; down the ventral suture, septicidal dehiscence ; while if in either method the septa is broken across to leave the seeds as a free central column on the placenta, it is septifragal dehiscence. Some F.s on dehiscing, throw their seed (e.g. balsam, geranium), others dehisce by pores (e.g. papaver), other by teeth release of lid (e.g. anagallis). Dehiscent F.s may be capsules, follicles, legumes, siliquas, or pyxidiums which dehisce transversely.[१]

२. तंत्रविषयक

*Helix Angle*—If the base of a right angle triangle equals the lead of a screw thread and if the altitude equals the pitch circumference of the screw, then the angle between the hypotenuse and altitude of the triangle equals the helix angle of that screw thread at the pitch line ; hence, the tangent of the helix angle equals the lead of the thread divided by the pitch circumference (circumference at one-half the thread depth). It is evident from the foregoing that the helix angle of a screw thread is measured from a plane perpendicular to the screw axis and it is usually known as the lead angle.[२]

३. विधिविषयक

31-B. Without prejudice to the generality of the provisions contained in article 31-A, none of the Acts and Regulations specified in the Ninth Schedule nor any of the provisions thereof shall be deemed to be void, or ever to have become void, on the ground that such Act, Regulation or provision is inconsistent with, or takes away or abridges any of the rights conferred by any provisions of this Part, and notwithstanding

[१] *Everyman's Encyclopaedia, Vol. 5*, p. 547.
[२] *Engineering Encyclopaedia*, p. 640.

any judgment decree or order of any court or tribunal to the contrary, each of the said Acts and Regulations shall, subject to the power of any competent Legislature to repeal or amend it, continue in force.[१]

४. प्रशासनविषयक

In order to afford continuity of service to temporary Government servants, gazetted or non-gazetted, who contact Tuberculosis and undergo treatment in a recognised institution established for the treatment of the disease, and to enable them to return to their original posts after treatment, they may, in addition to leave on average pay or earned leave, as the case may be, and/or leave on medical certificate which may be admissible to them, be granted, in relaxation of Bombay Civil Services Rule 782 or Rule 14 (2) of the Revised Leave Rules, 1935 (Appendix XLIV-A of the Bombay Civil Services, Manual, Volume II), extraordinary leave upto a maximum period of twelve months on any one occasion, subject to the following conditions :—

(1) The post from which the Government servant proceeds on leave is likely to last till his return to duty ;

(2) The extraordinary leave shall be granted subject to the production of a certificate from the Medical Board, specifying the period for which the leave is recommended.[२]

वरील विषयांचा व तत्संबंधित भाषेचा आजच्या व्यापक स्वरूपाच्या राज्यकारभाराशी संबंध येतो. कृषी, वैद्यक इत्यादी शास्त्रीय विषय, वास्तुशास्त्र, अभियांत्रिकी यांसारखे तांत्रिक विषय, व्यापार, उद्योग व अर्थसांख्यिकी वगैरेंसारख्या विशिष्ट ज्ञानशाखा, कायदा, न्याय इत्यादी बाबी शासनाच्या निरनिराळ्या विभागांच्या कार्यांत या ना त्या प्रकारे अंतर्भूत आहेत. या विषयांची कमीजास्त माहिती व तद्‌विशिष्ट भाषेचा उपयोग सरकारी कामकाजात

[१] *The Constitution of India*, p. 17.

[२] *Hand book of General Circulars*, p. 307.

कर्मचारीवर्ग व तज्ञ यांच्याकडून अपेक्षित आहे. ही भाषा आणि परिभाषा वरील इंग्रजी उताऱ्यांत निर्दिष्ट केलेल्या भाषाप्रकारांच्या धर्तीवरच तयार होणार. सर्वसाधारण जनभाषेच्या पातळीवर तिला आणणे कसे शक्य होणार नाही व योग्य ठरणार नाही, हे निरनिराळ्या भाषाप्रकारां-संबंधी आतापर्यंत जे विवेचन केले त्यावरून स्पष्ट व्हावे.

**प्रशासनाची भाषा व जनता**

राज्यव्यवहाराच्या भाषेला जनभाषेच्या पातळीवर आणता येत नाही हे खरे असले तरी लोकशाही पद्धतीत शासनाचा व जनतेचा निकटचा संबंध असल्यामुळे या भाषेला जनतेच्या गरजा विचारात घेणे तितकेच जरुरीचे असते. भाषा हे अखेरीस परस्परव्यवहाराचे साधन आहे. तेव्हा शासनाचा जनतेशी जो व्यवहार व्हायचा तो तिला समजेल अशा भाषेतच झाला पाहिजे. या दृष्टीने प्रशासनिक भाषेचे दुहेरी स्वरूप अस्तित्वात येते. प्रशासनाची भाषा म्हणून तिची जी विशेष लक्षणे निर्धारित केली ते तिचे व्यवसायविशिष्ट मूळ स्वरूप हे एक, आणि दुसरे जनतासंपर्कासाठी असलेले तिचे सामान्य स्वरूप. हे दुसरे स्वरूप शासनव्यवहाराच्या भाषेचे वेगळे रूप नसतेच. ती असते शासनप्रयुक्त परिभाषेचा केवळ जरुरी-पुरता उपयोग असलेली सामान्य भाषा. शासनाच्या ज्या ज्या बाबींशी व अंगांशी जनतेचा प्रत्यक्ष संबंध येईल तेथे या सामान्य भाषेचा उपयोग करावा लागेल. शासनाशी प्रत्यक्ष संबंध असलेले जनतेचे प्रतिनिधी ज्या विधानसभेत एकत्र येतात तेथील चर्चा, सरकारद्वारा जनतेसाठी तयार करण्यात येणारे नियम, शासनाचा जनतेशी होणारा पत्रव्यवहार, जनतेच्या माहितीसाठी काढण्यात येणारी प्रसिद्धिपत्रके, सूचना व अन्य प्रसिद्धिसाहित्य, या आणि अशाच इतर ठिकाणी शक्यतोवर जनतेची पातळी लक्षात घेऊन सामान्य भाषेशी जुळत्या स्वरूपाची भाषा वापरावी लागेल. पण हा वापर करतानासुद्धा काही विशिष्ट मान्य परिभाषा स्वीकारावीच लागेल. तिच्याऐवजी अनेकार्थक व अनिश्चितार्थक रूढ प्रयोगांचा वापर केला तर त्यायोगे

प्रशासनिक भाषेची एकरूपता बिघडेल. ही एकरूपता बिघडू देता नये कारण प्रशासनिक भाषेला तिचे विशिष्ट प्रमाणभूत स्वरूप प्राप्त होते ते शासनव्यवहाराच्या गरजा लक्षात घेऊनच.

याच संदर्भात एका प्रचलित समजुतीचा विचार करणे जरूर आहे. राज्यव्यवहाराची भाषा ही प्रामुख्याने सामान्य लोकांसाठी आहे, अशी एक विचारसरणी पुढे मांडण्यात येते. भाषा हे व्यवहार-साधन आहे ही गोष्ट लक्षात घेता, राज्यव्यवहाराची भाषा ही प्रामुख्याने राज्यव्यवहारासाठीच असली पाहिजे. सामान्य लोकांचा व्यवहार व शासनाचा व्यवहार यांत जसा फरक आहे तसाच तो त्यांच्या साधनांतही असणारच. राज्यव्यवहाराची भाषा, तो व्यवहार सुकर व्हावा म्हणूनच आकारास येते. जनतेशी या व्यवहाराचा ज्या मर्यादेपर्यंत संबंध येणार त्या मर्यादेपर्यंत जनतेच्या गरजा या भाषेने अवश्य लक्षात घ्याव्या. परंतु त्याखेरीजच्या आपल्या अन्य गरजा तिला दुर्लक्षिता येणार नाहीत. वीज-निर्मितीच्या योजनेचा तपशील एखाद्या तज्ञाला शासनासाठी तयार करायचा आहे किंवा कायद्यासंबंधीच्या एखाद्या किचकट तांत्रिक बाबीचा संबंधित शासनविभागात विचार चालू आहे, अशा वेळी वापरात येणारी भाषा बाळबोध असली पाहिजे व ती सामान्य माणसाला समजली पाहिजे किंवा त्यासाठी सामान्य लोकांना परिचित अशाच शब्दांचा वापर केला पाहिजे, असा आग्रह कोणीच धरणार नाही. जनतेची भाषा हीच राजभाषा असावी अथवा सरकारी कामकाज लोकांच्या भाषेतून चालावे, याचा अर्थ विशिष्ट प्रादेशिक भाषेला राज्यकार-भारात स्थान मिळावे असा निश्चित होऊ शकेल. परंतु भाषेचे सामान्य स्वरूपच त्यासाठी वापरण्यात यावे असा आग्रह धरून चालणार नाही.

सामान्य जनतेची भाषा हीच शासनव्यवहाराची भाषा असावी, असे म्हणताना या भाषेची एक ठराविक स्थिर पातळी गृहीत धरण्यात येते. परंतु व्यवहारानुरूप ती पातळी वाढतही असते ही गोष्ट विसरून चालणार नाही. सध्याच्या प्रगतिशील समाजाच्या

गरजांनुरूप प्रत्येकाचे भाषाशिक्षण सतत चालू असते. वाढत्या व्यवहारानुरूप त्याच्या शब्दसंग्रहात सारखी भर पडत असते.[१] इतर व्यवहारांप्रमाणे राज्यव्यवहाराचाही भाषेवर परिणाम होतो. जनता व शासन यांच्या परस्परप्रभावाचे तत्त्व म्हणून याचा मागे एकदा उल्लेख केला आहे. या तत्त्वानुरूप जनतेच्या भाषेचा राज्यव्यवहाराच्या भाषेवर जसा परिणाम होतो, तसाच राज्यव्यवहाराच्या भाषेचा जनतेच्या सामान्य भाषेवरही परिणाम होतो. मोगल बादशाहीच्या काळात राजभाषा असलेल्या अरबी, फार्शी भाषांचा हिंदीवर जो परिणाम झाला त्यातून उर्दू ही नवी भाषा जन्मास आली. महाराष्ट्रातील मुसलमानी राजवटीच्या काळात फार्शीचा मराठीवर किती प्रभाव पडला व त्यामुळे तिचा शब्दसंग्रह किती बदलला, हे मागे पाहिलेच आहे. तीच गोष्ट इंग्रजी अंमलातही घडली. राज्यकारभाराच्या भाषेच्या निमित्ताने कितीतरी इंग्रजी शब्दांचा मराठीत अगदी ग्रामीण जीवनाच्या थरापर्यंत शिरकाव झाला. प्रशासनाच्या भाषेचा जनभाषेवर निश्चित परिणाम होतो व ही जनभाषा प्रशासनिक भाषेचे शब्द कळत नकळत सारखी आत्मसात करीत राहते. आजही सामान्य मराठीने शासन, प्रशासन, विधानसभा, संसद, विधेयक, अधिनियम, प्रशिक्षण, सचिवालय, केंद्र सरकार, आकाशवाणी यांसारखे कितीतरी शब्द सहज आत्मसात करून घेतलेले दिसतील.[२] हे लक्षात घेता राज्यकारभाराच्या भाषेतील अन्वर्थक परिभाषा रूढ होणार नाही या भ्रामक समजुतीने सामान्य भाषेतल्याखेरीज इतर शब्दांना मज्जाव करणे योग्य ठरणार नाही. उलट ही प्रमाणभूत परिभाषा आत्मसात करण्याचा जनतेने स्वतः होऊन प्रयत्न केला, तर जनभाषेचाही विकास होईल व राज्यकारभाराच्या भाषेलाही स्थिरता येईल.

---

[१] "In a modern society everyone is always learning language. The complexity of civilized life prolongs the period of linguistic initiation and also extends the need for this prolongation throughout the society."

—M. M. Lewis : *Language in Society*, p. 45.

[२] प्रशासनाच्या भाषेतील रूढ झालेले व वृत्तपत्रातून वापरात असलेले शब्द परिशिष्ट १ मध्ये पहा.

# शासनव्यवहार आणि मराठी भाषा

राज्यकारभाराच्या भाषेचे स्वरूप आजच्या पुढारलेल्या लोकशाही-प्रधान शासनव्यवस्थेत कसे असते, याची मागे जी चर्चा केली तिच्या अनुरोधाने आता मराठी भाषेचा विचार करू. इंग्रजी अमदानीत दीडशे वर्षे मराठीचा राज्यकारभाराशी वास्तविक अर्थी संबंध तुटला होता. शासनव्यवहाराच्या दृष्टीने पूर्णपणे विकसित अशा इंग्रजी भाषेच्या माध्यमाद्वारेच राज्यकारभार चालू होता. तालुका आणि जिल्हा स्तरांवरील पत्रव्यवहार मराठीत तुरळक चालू असला तरी त्याचे सामान्य भाषाव्यवहाराहून अधिक महत्त्व नव्हते. नाही म्हणावयास या काळात महाराष्ट्रातील छोटचा-मोठचा संस्थानात मराठीला राजभाषेचे स्थान होते व राज्यकारभारही बऱ्याच मोठचा प्रमाणावर मराठीतून चालू होता. शिवकालापासून पेशवाईचा अस्त होईपर्यंत दीडशे वर्षे मराठी भाषा शासनकार्यासाठी वापरण्यात येत होती. संस्थानी राजवटीतील मराठीच्या प्रशासनिक स्वरूपामागे ही परंपरा होती व तिचे अवशेष संस्थानी शासनप्रयुक्त मराठीत आढळून येतात. राज्यकारभाराच्या आजच्या गरजांनुरूप मराठीचे स्वरूप

काय असावे, हे पाहताना या परंपरेचाही विचार करणे जरूर आहे.

### शिवकालीन परंपरा

पूर्वेतिहासाचा मागोवा घेता या परंपरेचे सूत्र यादवकालापर्यंत जोडता येईल. त्यावेळी मराठीचा राज्यकारभाराच्या भाषेत वापर होत असे, हे उपलब्ध झालेल्या काही तत्कालीन मराठी शिलालेखांवरून व ताम्रपटांवरून दिसून येते. यादवांच्या राजवटीनंतर मुसलमानी अंमलात ही परंपरा खंडित झाली. त्यानंतर राज्यव्यवहाराची भाषा म्हणून मराठी भाषेचा उपयोग करण्याचा प्रथम प्रयत्न झाला तो छत्रपती शिवाजी महाराजांच्या शासनकाळात. यापूर्वीच्या दोन-तीन शतकांत महाराष्ट्र मुसलमानी अंमलाखाली होता व राज्य-व्यवहारात फार्शीचाच प्रामुख्याने वापर होत होता. मराठीचाही शासनव्यवहारासाठी प्रसंगविशेषी उपयोग होत असे. पण फार्शीच्या दीर्घकाळ संपर्काने तिच्या स्वरूपात फार मोठा बदल घडून आला होता. शासनाच्या भाषेवरच नव्हे, तर सामान्य व्यवहाराच्या भाषेवरही फार्शीचे कसे आक्रमण झाले होते, याचा मागे उल्लेख आलेलाच आहे. शासनविषयक परिभाषा तर बहुतांशाने फार्शीमय होतीच, परंतु एकूण लेख-नाची घाटणीही फार्शीच्या धर्तीवर होती. शिवाजी महाराजांच्या राज-वटीच्या आरंभी कार्यालयीन पत्रांची सुरुवात पुढीलप्रमाणे होत असे :

> "अज रख्तखाने राजश्री शिवाजीराजे दामदौलत हु (बजानीबु कारकुनानी हाल व इस्तकबाल देशमुखानि पा पुणे, बिदानद)"[१]

पत्रातील मराठी भाषेचे स्वरूप कसे असे, हे पुढील पत्रावरून दिसून येईल :

> "मसरुल अनाम राजश्री नारो भिकाजी सुभेदार व कारकून सरदेसमुखी सरकार महालहाय तलकोकन प्रती राजश्री शिवाजी

---

[१] शं. ना. जोशी : महाराष्ट्रेतिहासकालातील राज्यकारभाराचा अभ्यास, पृ. ३६.

राजे. सु।। तिसा सितैन अलफ. त्रिंबकजी नरस प्रभु हुजूर येऊन मालूम केले की, कसबे कल्याणचे कुलकर्ण व हुदेदारी आपली मिरास सालाबाद माहात कदम कारकीर्दी मलिकंबर वाजे कारकीर्दी दर कारकीर्दी चालत आलें असे, हाली मोगलाचे कमाविसीमधें देसमुख व देसपांडियानी कुसूर करून चालों देत नाही ........हाली तुम्ही देसमुख देसपांडियासी ताकीद करून त्रिंबक प्रभु मजकुराचे कुळकर्ण व हुदेदारी सालाबादप्रमाणे हुदेदारीचा मुशारा बाजे मिरासप्रमाणे रयतेनिसबतीने देत ते करणें. बोभाट येऊं न देणें. "[१]

स्वराज्यस्थापनेबरोबरच आपल्या भाषेचे व परंपरेचे महत्त्व ओळखून त्यांच्या प्रतिष्ठेसाठी शिवाजी महाराजांनी प्रयत्न केले. त्यांनी पत्रव्यवहारात रूढ असलेली मुसलमानी कालगणना बदलून राज्याभिषेक शक चालू केला. नवे अष्टप्रधान मंडळ स्थापन करून त्यांची संस्कृत पदनामे प्रचारात आणली. प्रधानमंडळांपैकी रघुनाथपंत हणमंते यांजकडून शासनव्यवहारात प्रचलित असलेल्या मुख्यतः फार्शी व काही मराठी शब्दांचे संस्कृत पर्याय देणारा 'राज्यव्यवहारकोश' तयार करवला. या कोशात मुख्यतः फार्शीतील व काही मराठीतील अशा सुमारे दीड हजार शब्दांसाठी मराठीत वापरता येतील असे सोपे संस्कृत पर्याय दिले आहेत. राज्यव्यवहाराची, त्यातील लेखनपद्धतीची आणि अधिकाऱ्यांच्या कामाची व त्यासंबंधीच्या नियमांची त्यांनी व्यवस्थित घडी घालून दिली. त्यानुसार पुढे लेखनपद्धती सांगणारी 'मेस्तके' व अधिकाऱ्यांच्या कामासंबंधीचे 'कानुजाबते' (नियमयाद्या) तयार करण्यात आले. याच आधारावर मराठीतील शासकीय लेखनपद्धतीला एक नियमित स्वरूप प्राप्त होऊन कार्यालयीन पत्रव्यवहाराच्या पद्धती सांगणारे 'लेखनकल्पतरू' सारखे ग्रंथ पुढील काळात तयार झाले. शिवाजी

---

[१] मराठ्यांच्या इतिहासाची साधने—खंड २०, पृ. ३०२.

महाराजांच्या या स्वभाषा प्रतिष्ठापनेच्या धोरणाने राज्यव्यवहाराच्या भाषेत एक नवी परंपरा सुरू झाली. शिवकालातीलच पूर्वी निर्दिष्ट केलेल्या मुसलमानी मायन्याशी राज्याभिषेक शकानंतर रूढ करण्यात आलेला पुढील मायना ताडून पाहता येण्याजोगा आहे :—

" स्वस्ति श्रीराज्याभिषेक शक ६ सिद्धचर्थी नाम संवत्सरे भाद्रपद बहुल पंचमी रविवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शिवछत्रपती स्वामी याणी...... "

याबरोबरच पूर्वीच्या पद्धतीप्रमाणे शिक्कामोर्तबासाठी 'मोर्तबशुद' असे पत्रसमाप्ती करताना जे लिहिण्यात येई, त्याजागी 'मर्यादेयं विराजते' अशी पत्रमर्यादा रूढ करण्यात आली व मोहरेऐवजी 'मुद्रा' हा शब्द प्रचलित करण्यात आला. शिवछत्रपतींच्या या प्रयत्नांनी मराठीच्या फार्शीकरणाची लाट थोपवून धरली व राज्यव्यवहारात मराठीची स्वतंत्र घाटणी प्रवर्तित केली. शिव-कालातील पूर्वोक्त सुरुवातीच्या पत्रातील फार्शीबहुल भाषेशी शिवाजी महाराजांच्याच एका पत्रातील, तसेच सुमारे ५० वर्षांनंतरच्या काळातील आणखी एका पत्रातील मराठीची तुलना केल्यास झालेले परिवर्तन सहज लक्षात येईल :—

" वृत्तवंत म्हणजे वतनदार हे येथील चिरस्थिर होत. आपणा-आपणात वतनभाऊपणा आहे. एकाच्या वतनावरी दुसरा उभा राहूं देणें ही भाऊपणाची नीती नव्हे. प्रसंगी मार खावा, बंदी पडावे (परंतु वृत्तीस दुसरा जडों देऊं नये) ही वृत्तवंताची नीती ".[१]

" स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४९ शुभकृत नाम संवत्सरे भाद्रपद शुध त्रयोदसी मंदवार क्षत्रियकुलावतंस श्रीराजा छत्रपतीस्वामी याणी समस्तराजकार्यधुरंधर......राजश्री कान्होजी आंग्रे सरखेल यांसी आज्ञा केली ऐसीजे राजश्री नारो कृष्ण उपनाम जोशी हे स्वामीच्या राज्यातील पुरातन सेवक या राज्यांत निस्टेने सेवा केली

[१] शिवचरित्र साहित्य—खंड ३, ले. ६११.

त्याउपर सेवा सोडून आपला काल सार्थक व्हावा याकरितां स्नानसंध्या करून ईश्वरभजनीं लागले. यांची योगक्षेमाची अनुकूलता करून दिधल्यानें स्वामीस व स्वामीच्या राज्यास श्रेयस्कर याकरिता विशालगडचे मुक्कामीं....कसबा मुरूड ता। पंचनदी प्रा। दाभोळ पैकी दाभोली लारी च्यारसें पुत्रपौत्रीं वृत्ती पूर्वी राजश्री शिवाजी राजे दाजी याणी दिल्ही......"[१]

शिवकालीन राज्यव्यवहारातील मराठीचा विस्तृत व सोदाहरण परामर्ष घेण्याचे कारण हे की, इंग्रजी अंमलातही संस्थानी राज्य-कारभारात चालू असलेल्या या परंपरेचे मूळ व तिची प्रेरणा लक्षात यावी. ही परंपरा स्वभाषाभिमानाने प्रेरित झाली होती, हे तर निर्विवाद आहे. दुसरी गोष्ट अशी की, शासनव्यवहारातील भाषेचे स्वरूप सामान्य भाषेहून वेगळे असते, तिची एक वेगळी धाटणी असते व तिची परिभाषा आणि धाटणी कोश व अन्य ग्रंथ तयार करून निश्चित करावी लागते, याची जाणीव या परंपराप्रवर्तकांना होती.

**पेशवेकाल**

शिवाजी महाराजांनी अवलंबिलेले हे भाषाविषयक धोरण पूर्णत्वास नेण्याइतकी उसंत व सवड त्यांना स्वत:ला मिळाली नाही. त्यामुळे एका विशिष्ट अवस्थेपुढे हे धोरण प्रगत होऊ शकले नाही. त्या-नंतरच्या शाहू छत्रपतींच्या आणि पुढे पेशव्यांच्याही काळात स्वराज्य व स्वभाषा यांच्याबद्दलचा सुरुवातीचा उत्साह ओसरला व मराठीवरची फार्शीची पकड शिवकालात जी थोडी ढिलावली ती या काळात तशीच राहिली. पेशव्यांच्या चौफेर मुलुखगिरीच्या काळात भाषेकडे लक्ष देण्यास राज्यकर्त्यांना फुरसत नव्हती. शिवाय, सतत सान्नि-ध्याने फारशी शब्दांचा परकेपणा लक्षात न येण्याइतके ते

---

[१] मराठ्यांच्या इतिहासाची साधने—खंड २०, पृ. ४१५.

शब्द लोकांच्या अंगवळणी पडले. पेशवेकालीन पत्रव्यवहार पाहता राजदरबार, घरव्यवहार, बाजारहाट, सैन्यमुकाबला वगैरे हरेक क्षेत्रात फार्शमिय मराठीच वापरली जात होती, असे दिसून येईल. अर्थात शिवशाहीत भाषेसंबंधी जे थोडेबहुत प्रयत्न झाले ते अगदीच निरर्थक ठरले असे नव्हे. राज्यकारभारातील भाषेला लागलेले मराठी वळण कायम राहिले व फार्शी शब्दांच्या अनिर्बंध आयातीस आळा बसला. रूढ झालेला फार्शी शब्दसंग्रह बदलला नाही, याचे कारण 'राज्यव्यवहारकोशा' प्रमाणे कोशनिर्मितीस पुढे कोणी प्रोत्साहन दिले नाही. एवढेच काय, पण सदर कोशातील शब्द रूढ करण्याचा जाणीवपूर्वक प्रयत्नही पुढील राजवटीत करण्यात आला नाही.

पेशवेकालात शासनप्रयुक्त मराठीवरील फार्शीचा प्रभाव कमी होऊ शकला नाही, याचे आणखीही एक कारण असू शकते. मुलुखगिरी, स्वाऱ्या, मोहिमा यांच्या जोडीलाच या काळात मराठी सत्तेच्या व पर्यायाने मराठी भाषेच्या राजकारणाचा व्याप खूपच वाढला होता. मनसुबे, मसलती, तह, वाटाघाटी, वकिली या गोष्टींना राजकारणात अधिक महत्त्व आले होते. निजाम, हैदरअली या शेजारील मुसलमानी राजवटीबरोबर पेशव्यांचा जसा संबंध आला, तसाच पुढे तो दिल्लीच्या मध्यवर्ती साम्राज्यसत्तेशीही येत गेला. या कारणाने मराठीचा फार्शीशी संपर्क वाढत गेला. नामधारी असली, तरी दिल्लीची पातशाहत सार्वभौम मानली जात असे. मध्यवर्ती शासनाच्या भाषेचा इतर राज्यांच्या भाषांवर राजकारणाच्या निमित्ताने होणारा परिणाम अपरिहार्य असतो. मराठीच्या बाबतीतही हेच घडले असावे. त्यामुळे शिवकालात मराठीने घेतलेले देशी व संस्कृतानुसारी वळण पेशवेकालात सुटले नसले, तरी तिला संस्कृत-फार्शीच्या संकराचे स्वरूप याकाळी प्राप्त झाले होते. अशा संकर भाषेची नमुनेवजा पुढील काही उदाहरणे पहावी :—

"राज्याभिवृद्धीविषयी बहुत श्रम करून आपली नाम्ना करून घेतली... स्वामी तुम्हावरी कृपाळू होऊन नूतन इनाम कुलबाब

कुलकानु हालीपटी व पेस्तरपटी जलतरुपाषाणनिधिनिक्षेपसहित पडिले पान सुभाप्रांत तारळे हा गाव देहे १ येकरास इनाम अजरामरामत सर्वमान्य करून दिल्हा. "[1]

"तदन्वये आमचे पुतणे जाणून तुमचे ऊर्जित करून खासगत कबिलियाचे बेगमीस..........तपे मजकूरची हकलाजिमा व इनामगांव व जकाईत व बिरवा जो सरदेशमुखीचा अंमल आपले स्वाधीन करून घेऊन यांपैकीं जो आकार होईल त्याचा श्री स्वामीस दाहिजा देऊन बाकी ऐवज सुखरूप अनुभवणे."[2]

### संस्थानी राजवट

पेशव्यांची सत्ता जाऊन त्या जागी इंग्रजांचा अंमल आल्यानंतर महाराष्ट्रातील कोल्हापूर, सांगली, मिरज, भोर, जत, सावंतवाडी इत्यादी जी लहानमोठी संस्थाने त्यांची मांडलिक म्हणून नांदू लागली त्यांनी आपला कारभार मराठीतून चालू ठेवला. शासनव्यवहाराची भाषा म्हणून पेशवेकालीन मराठीचा कित्ता त्यांच्यापुढे होता. ती भाषाच त्यांनी स्वीकारली. शिवाय, या संस्थानी शासनातील वजईसंबंधीची, सरंजामाची, नगदी कामाबाबतची वगैरे खाती पेशवाईतल्याप्रमाणे पुढे चालू राहिल्यामुळे त्यातील कामकाजाच्या पद्धती व पत्रव्यवहाराच्या रीती यांत पेशवेकालीन परंपराच त्यांनी स्वीकारली. त्यामुळे संस्थानी राज्यकारभारात प्रयुक्त होणाऱ्या मराठीसाठी मोडी लिपीचा वापर जसा चालू राहिला, तसाच प्रशासनविषयक शब्दसंग्रहही पूर्वीप्रमाणे फार्शी-संस्कृत मिश्रितच कायम राहिला. संस्थानी मराठीत इजाफा, इजमायली, इतलाख, इस्तमेळ, जमीनबाब, रयतावा, कीर्दसार, कर्दा, अस्सल, तालीक, कदीम, जदीद, फेरिस्त, जाब्ता, सादिलवार, तसलमात, तक्षीम, इन्साफ, फैसला, हुकुमनामा, कौलनामा, कब्जेपट्टी, जातमुचलका, जामीनकतबा, दफाता, रुजुवात,

[1] पंतअमात्य बावडा दप्तर: क्र. १००.
[2] पेशवे दप्तर: भाग ३१, ले. ९९ (बहिरजीराव घोरपड्यांचे नारो महादेव यांस पत्र).

रूबरू, रदकर्ज, हक्कदार, बोजेदार, वजईदार, सदरअमीन, सरसुभे, तबदिली, दिगरादिगरी, आबदारखाना, खलबतखाना, मुकरर करणे, हुजूर येणे, पुरसिस करणे यासारखे फार्शी शब्द जसे आढळतात, तसेच आज्ञापत्र, विनंतीपत्र, क्रयपत्र, प्रमाणप्रत्यंतर, निधिनिक्षेपसहित, निदेशसमक्ष, अधिकारनिक्षेप, पराकाष्ठा, क्रमबद्ध वारस, वृत्तिच्छेद, कृताकृत, अपहार, आक्षेप, उपसर्ग, संपादकाचा नष्टांश, उत्पन्नाची, स्वत्वनिवृत्ति, भोग्यवर्ष, दयेचा राजाधिकार, योगक्षेम, स्थळसीमा, चतु:सीमा, श्रेष्ठाधिकारी, दिनावधी, अभिप्राय, विदित करणे, श्रुत करणे असे संस्कृत प्रयोगही थेट पेशवेकालीन मराठीप्रमाणे जोडीनेच वापरलले आढळून येतात. पेशवाईत लिहिलेल्या कबालेपत्रातील, " .....सदरहू २ हजार रु।। तुमचें नावें रदकर्ज खर्च लिहून हें कबालेपत्र तुम्हास भोगवटियास करून दिल्हें असे तरी सदरहू जाग्यात तुम्ही पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने सुखरूप नांदावें, "[१] ही भाषा दीडशे वर्षानंतर संस्थानी राजवटीत दिलेल्या खरेदीपत्रातही, "चतु:सीमेतील जागा दगडमाती तदंगभूत वस्तुसहित भोगवटयास करून दिली तरी तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरा सुखरूप पाहिजे तशी वहिवाट करावी, "[२] अशीच वापरलेली दिसून येते. संस्थानी दप्तरांत अलीकडेपर्यंत आढळून येणारे "काम दप्तरी बिनतजवीज पडून राहिले ते पूर्तता करून पाठवावे" ; "फौजदार यांचे नावावर तसलमात असलेली रकम जी बाजे इनामात राहिली ती कोणते खुतात ठेवावी" ; "सनदेची तालीक घेऊन असल परतोन देणे" ; "अपीलेंट हा वहिवाटदार नसून केवळ कर्दा आहे," हे भाषाप्रयोग थेट पेशवेकालीन भाषाप्रयोगांची आठवण करून देतात.

ही संस्थाने इंग्रजी राजसत्तेची मांडलिक असल्यामुळे इंग्रजी शासनव्यवस्थेचा त्यांच्याशी सतत संबंध होता. या शासनव्यवस्थेतील बऱ्याचशा बाबी कमीजास्त प्रमाणात प्रत्येक संस्थानातील राज्य-

[१] शं. ना. जोशी : मराठेकालीन समाजदर्शन, पृ. १३५ (कबालेपत्र इ. स. १८०१ फे. २).

[२] जत संस्थान दप्तर : दिवाण कचेरी कागदपत्र (खरेदीखत इ. स. १९३८).

कारभारात अंतर्भूत झालेल्या होत्या. त्यामुळे या सरमिसळ शासन-व्यवस्थेसाठी प्रयुक्त होणाऱ्या मराठी भाषेवर फार्शी इतकाच इंग्रजी भाषेचाही प्रभाव पडला होता. कोर्टकामें, कचेरीव्यवस्था, जमीनमहसूल व नोंदणीची कामे, हिशेबखाते इत्यादी बाबतीत इंग्रजी व्यवस्थेनुसार चालू असलेल्या कामांसाठी जेथे पेशवेकालीन फार्शी व संस्कृत परिभाषा उपलब्ध झाली ती या संस्थानी मराठीने वापरली. जेथे ती नव्हती त्याबाबतीत इंग्रजी परिभाषा जशीच्या तशीच घेतली. सर्वसाधारण मराठी धाटणीची विसंगत असणाऱ्या पेशवेकालीन उर्दू-फार्शी शब्दांसाठी मराठी वा तिच्या प्रकृतीशी जुळते संस्कृत पर्याय शोधण्याचा जसा प्रयत्न करण्यात आला नाही, तसाच प्रकार इंग्रजी शब्दांबद्दलही झाला. हे शब्द कधी जसेच्या तसेच, कधी विकृत करून, कधी त्यांची संकरसामासिक रूपे करून, तर कधी त्यांना मराठी रूपप्रक्रियेत बसवून वापरण्यात आले. समन्स, वारंट, डिक्री, प्रोसेस फी, वाटरवर्क्स, इंजिनियरिंग, मेडिकल, डिसचार्ज, सुपरसीड, सस्पेंड, प्रोव्हिजनल, डिटेल्ड, प्रोबेशन, अलाउन्स, ट्रस्ट, चार्जशीट, ॲक्विझिशन, कांपेंसेशन, ॲडज्युडिकेशन, स्टँडिंग ऑर्डर, मीटिंग, पेन्शन, ऑडिटर, हे आणि असेच कितीतरी शब्द आहेत तसेच या मराठी भाषेत प्रयुक्त करण्यात आले. कित्येक ठिकाणी आक्ट, ग्याझिट, एक्स्ट्राट, अभिस्त्राक्ट, इष्टमेट, माजिस्त्रेत, एक्स्त्रादिशन, कमेट करणे, स्टांप रूळी, कमेटी, रिकार्ड, रिपेरी अशी त्यांची रूपे विकृत करण्यात आली. काही प्रसंगी वॉरंटबजावणी, बजेटमंजूर, वुईलपत्र, बॉडीखबरदार, पोझिशनचढ, हेडकारकून, आक्टिंग मामलत अशी संकरसामासिक रूपे तयार झाली. जमेल तेथे समन्साची प्रोसेस फी, ऑफीस ऑवरानंतर, पेन्शनीत काढणे, राऊंडीस येणे, लिष्टास ठेवणे, प्रोसिडिंगे तयार करणे, अशा रीतीने त्यांना मराठी प्रत्ययप्रक्रियाही लावण्यात आली. याचा परिणाम पेशवेकाली जसा फार्शी-मराठीचा संकर झाला, तसाच इंग्रजी-मराठीचा संकर निर्माण होण्यात व मराठीला एक धेडगुजरी रूप येण्यात

झाला. अशा प्रकारच्या मासलेवाईक मराठीचे पुढील नमुने पहावे :—

"......मदत देण्याच्या बाबतींत सदर्न मराठा कंट्रीतील नेटिव्ह संस्थानचे दरम्यान रिसीप्रासिटी होण्याच्या निमित्ताने......."[१]

"....स्केलमुळें बजेटवर ताण पडतो. बजेट वाढविण्याची आवश्यकता पडेल तेथें रकमेचें स्पेशल संक्शन मंजूर आहे असे समजावे."[२]

"...........मेडिकल तपासणीनंतर अनफिट जाहल्याने ऑफिस ऑर्डरनंतर नोकरीतून मोकळे करून पेन्शनीत काढलें."[३]

"....लॉ लायब्ररीकरिता कायद्याचीं नवीन बुकें घेतलीं तीं लायब्ररीचे लिष्टास दाखल करावीं."[४]

संकर मराठीचे स्वरूप केवळ संस्थानी राज्यकारभारातील मराठी भाषेतच दिसून येत होते, किंवा ती भाषा सर्वत्र व सर्वकाळ अशीच वापरण्यात येत होती, असा याचा अर्थ नाही. इंग्रजी अंमलाखालील प्रदेशांत राज्यकारभाराची भाषा इंग्रजी असली तरी जनतेशी संबंध येणाऱ्या बाबींत म्हणजे विधिमंडळातील बिले व कायदे, सूचना, प्रसिद्धिपत्रके व अशाच इतर बाबतीत इंग्रजीचा मराठी अनुवाद करण्यात येत असे. तसेच, मराठी वृत्तपत्रांतूनही शासनविषयक पुष्कळ मजकूर येत असे. वरील सरकारी अनुवादांतून व वृत्तपत्रीय लिखाणातून शासनविषयक मराठीला एक वेगळा आकार येत होता व तत्संबंधी शब्दसंग्रह तयार होत होता. या भाषेचा संस्थानी प्रशासनिक मराठीवर परिणाम होणे साहजिक होते. त्यामुळे सुरुवातीस या भाषेत फार्शी शब्दांचा व इंग्रजी शब्दांचा जो प्रमाणाबाहेर वापर होता तो हळूहळू कमी होत गेला, व तिच्यात आणि संस्थानाबाहेरील मराठीत बहुतांशी एकरूपता निर्माण झाली.

[१] सांगली ग्याझिट : ७ डिसेंबर १८९४.
[२] मिरज सिनियर स्टेट गॅझेट : इ. स. १९४४.
[३] मिरज सिनियर स्टेट गॅझेट : इ. स. १९४४.
[४] दिवाण ऑफिस दप्तर, संस्थान जत : ऑक्टोबर १९४०.

संस्थानी राज्यकारभारातील मराठीचा सुरुवातीस जो एक वेगळा थाट होता, त्याचे प्रशासनिक मराठीच्या जुन्या परंपरेशी सांधेजोड म्हणून महत्त्व होते. ती परंपरा आजच्या गरजांच्या व प्रवृत्तींच्या दृष्टीने कालविसंगत ठरेल. ही संस्थाने महाराष्ट्रात विलीन झाल्या-नंतर लोकशाही पद्धतीनुसार तेथे चालू असलेल्या शासनव्यवहारात मराठीचा वापर करताना आजही "मेहेरबान मामलेदार साहेब यांचे हुजूरास", "हुजूर हुकुमाप्रमाणे", "तालुके हुजुरास रिपोर्ट", "मेहेरबानास जाहीर व्हावे", अशी लेखनसरणी रूढ आहे. ही पद्धती अर्थातच आज स्वीकार्य ठरणार नाही. असे असले तरी या परंपराप्राप्त प्रशासनिक भाषेतून मराठी सामावून घेऊ शकेल असे फार्सीतील जुन्या काळापासून रूढ असलेले काही अन्वर्थक शब्द, तसेच संस्कृतवर आधारलेले काही अर्थवाही पर्याय, काही शुद्ध मराठी वळणाचे शब्द व कार्यालयीन वाक्प्रयोग मराठी भाषेची शासनोपयोगी घडण करताना अवश्य स्वीकारता येण्यासारखे आहेत. असे काही शब्द व वाक्प्रयोग स्वीकारण्यातही आले आहेत. यासंबंधात उदाहरण द्यावयाचे झाल्यास 'राजपत्र' या शब्दाचे देता येईल. राज्यव्यव-हारकोशात आढळणारा 'राजपत्रक' हा शब्द जत संस्थानात 'राजपत्र' या स्वरूपात 'गॅझेट' या अर्थी इ. स. १९३५ पूर्वीपासून रूढ करण्यात आला होता. त्या संस्थानातील सरकारी गॅझेट 'जत राजपत्र' या शीर्षकाखाली वर्षानुवर्षे प्रसिद्ध होत असे. भारतीय संविधानाची शब्दावली तयार होण्यापूर्वी कित्येक वर्षे हा शब्द मराठी भाषेत निदान संस्थानी मराठीपुरता रूढ होता. परंतु महाराष्ट्र शासनाने पदनाम कोशात हा शब्द स्वीकारला त्यावेळी हा शब्द नव्याने तयार करण्यात आला या समजुतीने काही टीकाकारांनी 'पत्री' सरकारची आठवण देण्यासाठी कदाचित ही शब्दयोजना केली असावी, अशी शंका प्रकट केली ! 'पत्री' सरकारची चळवळ सदरहू शब्द प्रचारात आल्यानंतर सात वर्षांनी झाली, हा कालानुक्रम येथे लक्षात घेण्यासारखा आहे ! शासनव्यवहारासाठी

नवी परिभाषा तयार करताना जुन्यानव्या अशा अनेक साधनस्रोतांचा शोध घ्यावा लागेल. या कामी मराठीतील आजचा 'रूढ' म्हणण्यात येणारा शब्दसंग्रह काही झाले तरी अपुरा पडेल. टीकाकारांनी वरीलप्रमाणे केवळ रूढतेची कसोटी लावली तर मराठीचा पारिभाषिक अंगाने विकास होणे प्राय: असंभवनीय ठरेल.

**इंग्रजी शासनकाल**

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर मराठी संस्थाने भारतात विलीन झाल्यामुळे तेथे राजभाषेची वस्त्रे मराठीला उतरून ठेवावी लागली व महाराष्ट्रातील इतर प्रदेशांप्रमाणे तेथील राज्यकारभारही इंग्रजीतून होऊ लागला. अशा रीतीने सुमारे तीनशे वर्षे अव्याहत चालू असलेली राज्यकारभारातील मराठीच्या वापराची परंपरा पूर्णत: खंडित झाली. इंग्रजी सत्ता स्थापन झाल्यानंतर संस्थानी शासनाचा अपवाद सोडल्यास महाराष्ट्रातील उर्वरित प्रदेशात राज्यकारभाराची भाषा म्हणून इंग्रजीचाच सतत वापर होत होता. इंग्रजी अंमलाखालील पुढारलेल्या व विकासशील शासनव्यवहारात मराठीला स्थान असते तर तिच्या प्रशासनिक स्वरुपाचा सर्वार्थाने विकास झाला असता. संस्थानांतील काहीशा प्रतिगामी व मर्यादित शासनव्यवहारात मराठीची अशी वाढ होऊ शकली नाही. व्यापक, व्यवस्थाबद्ध व अद्यावत शासनव्यवहार पेलू शकेल इतकी क्षमता संस्थानी मराठीला प्राप्त झाली नव्हती. इंग्रजी राजभाषा असल्यामुळे संस्थानांव्यतिरिक्तच्या भागात शासनाशी मराठीचा अजिबात संबंध नव्हता, असे मात्र झाले नाही. वर एकदा उल्लेख केल्याप्रमाणे जनतेशी संबंधित बाबींत इंग्रजीच्या जोडीनेच मराठीचाही उपयोग करणे भाग पडे. त्यामुळे बिलांची, कायद्यांची, सूचनाप्रसिद्धिपत्रांची व प्रचारसाहित्याची मराठी भाषांतरे सरकारी स्तरावर होत. नगरपालिका व जिल्हा लोकल-बोर्ड यांसारख्या स्थानिक संस्थांच्या कारभारात कमीजास्त प्रमाणावर मराठीचा वापर होई. या मार्गाने मराठीच्या प्रशासनविषयक

शब्दसंग्रहात थोडीबहुत भर पडत होती. परंतु शासनव्यवहाराच्या सर्व क्षेत्रांत व सर्व अंगोपांगांत इंग्रजी प्रयुक्त होत असल्यामुळे तिचे स्वरूप जसे विविध अंगांनी विकसित झाले होते, त्याप्रकारे मराठीच्या विकासाला वाव नव्हता. शासनव्यवहारातील भाषेच्या स्वरूपाचा यापूर्वी जो विचार करण्यात आला आहे, त्यावरून ही भाषा परिभाषाश्रयी असते हे स्पष्ट झाले आहे. सर्व प्रकारच्या राज्यकारभारविषयक गरजा भागवू शकेल अशी परिपूर्ण व पद्धतशीर परिभाषा व सुघटित शैली मराठीला प्राप्त करून देणे, इंग्रजी राजवटीतील तिच्या मर्यादित व्यवहारामुळे शक्य नव्हते, व त्यावेळच्या राज्यकर्त्यांना त्याची गरजही नव्हती.

इंग्रजी मुलखातील प्रशासनिक मराठीने संस्थानी मराठीप्रमाणे एखादी परंपरा आपली म्हटली नव्हती, की शासनव्यवहाराच्या दृष्टीने तिचा अशा परंपरेशी संबंधही नव्हता. त्यामुळे या मराठीचे स्वरूप व परिभाषा गरजेनुसार यदृच्छया तयार होत होती. पूर्वीपासून उर्दू-फार्शीचा शासनाशी अधिक संबंध आल्यामुळे आरंभी बराच काळ तिच्यात अशा शब्दांचे प्रमाण नजरेत भरण्याइतके होते. कोर्टकचेऱ्यांशी संबंधित फार्शीप्रधान अशी परिभाषा उपलब्ध होती. पण इतर विषयांच्या बाबतीत परिभाषा हाताशी नसल्याने इंग्रजी शब्द संस्थानी मराठीतल्याप्रमाणे तसेच वा विकृत स्वरूपात वापरण्यात येऊ लागले. संस्थानांतील प्रशासनिक मराठीचे स्वरूप स्पष्ट करताना भाषिक संकराची जी उदाहरणे दिली आहेत त्यांच्याशी तुलना करता येण्याजोगी पुढील उदाहरणे पहावी :

> "जर कोणताही मनुष्य......या आक्टान्वये लैसंस दिलेल्या एखाद्या मनुष्याच्या टेलिग्राफ आफिसाचे सिग्नल रूमात... परवानगीवाचून शिरेल तर त्यास पराकाष्ठा ५०० रु. पर्यंत दंड होईल."[१]

---

[१] सन १८८५ चा हिंदुस्थानातील टेलिग्राफसंबंधी आक्ट : पृ. १०.

" ग्रेटर मुंबई आक्टाच्या कलम २८ अन्वये हुकुमत चालविणाऱ्या मुंबईच्या स्मॉल कॉज कोर्टाने केलेल्या हुकुमनाम्याविरुद्ध केलेले अपील हे, सदरहू कोर्टाच्या दोन जज्जांच्या बेंचापुढे चालेल. "[१]

शासनव्यवहारातील मराठीचा वापर संस्थानी मुलाखातल्याप्रमाणे परंपरेच्या चौकटीत बंदिस्त नसल्यामुळे येथे तिचा विकास स्वतंत्रपणे होत गेला. सामान्य जनतेशी संबंधित बाबींपुरताच प्रशासनिक मराठीचा उपयोग होत होता व म्हणून तिला समजतील असे पर्याय निवडणे आवश्यक होते. या बाबतीत मराठी वृत्तपत्रांनी व नियतकालिकांनी महत्त्वाची कामगिरी बजावली. इंग्रजी शब्दांसाठी अनेक सोपे व सुलभ प्रतिशब्द मराठी वृत्तपत्रांतून रूढ होत होते. परंतु वृत्तपत्रांचे काम घाईगर्दीचे असल्यामुळे हे पर्याय नेहमीच अन्वर्थक, नेमके व शास्त्रीय कसोटीवर परिभाषा म्हणता येतील असे नव्हते. पुष्कळदा गरज भागवण्यासाठी इंग्रजी शब्दही जसेच्या तसेच स्वीकारण्यात येत असत. याचा परिणाम अनेक इंग्रजी शब्द मराठीत रूढ होण्यात झाला. परिभाषेच्या दृष्टीने विचार करता ही प्रवृत्ती अनिष्टच म्हणावी लागेल. आजही ही प्रवृत्ती थोडीबहुत आढळून येते.[२]

विवक्षित परिस्थिती व विषय यांच्या अनुरोधाने शासकीय स्तरावर होणारा मराठी भाषेचा प्रयोग, वृत्तपत्रीय लिखाण, शासनाशी संबंधित कायदा व इतर विषय यांजवरील ग्रंथ इत्यादी निरनिराळ्या मार्गांनी इंग्रजी अंमलात शासनव्यवहारातील मराठीची परिभाषा तयार होत होती व तिला प्रशासकीय क्षेत्रात पूर्वीच्या परंपरेहून वेगळा असा एक आकार येत होता. पण तिची ही घाटणी व परिभाषा शास्त्रीय दृष्टीने व लोकशाही व्यवहारानुसार तिचे जे स्वरूप अपेक्षित आहे त्याच्याशी जुळणारे होतेच, असे म्हणता येत नाही. शासनव्यवहाराच्या गरजांच्या दृष्टीने ती अपरिपूर्ण

---

[१] सन १९४७ चा मुंबईचा आक्ट नं. ५७ वा: पृ. २७.
[२] परिशिष्ट ३ पहा.

होती तिच्यात उणिवा होत्या. वृत्तपत्रादिकांतून प्रयुक्त होणाऱ्या शब्दांनी तात्पुरती गरज भागली असली व इंग्रजी शब्दांचे कित्येक चांगले पर्याय मराठीस मिळाले असले, तरी परिभाषेसाठी लागणारी अन्वर्थकता, काटेकोरपणा त्यांच्यात नव्हता. या पर्यायात एकरूपता नव्हती. एकाच कल्पनेकरता एकाहून अधिक पर्याय वापरण्यात येत. 'बजेट' हा शब्द घेतला तर काही ठिकाणी त्यासाठी 'अंदाज-पत्रक' हा पर्याय वापरीत, तर कुठे 'अर्थसंकल्प' म्हणत. कधी कधी 'बजेट' हा इंग्रजी शब्दच उपयोगात येई. निरनिराळ्या वृत्तपत्रातच नव्हे, तर एकाच वृत्तपत्रातही एका कल्पनेसाठी एकाधिक पर्याय प्रयुक्त झालेले दिसत. म्हणजेच शासनव्यवहारात परिभाषा म्हणून शब्दांना जी प्रमाणभूतता व एकरूपता पाहिजे ती या पर्यायात नाही. परिभाषेप्रमाणेच विषयानुरूप ठराविक व निश्चित अभिव्यक्ती व तिच्यातून निर्माण होणारा विशिष्ट आकारबंध या गोष्टी वरील भाषेत दिसून येत नाहीत. मागे उल्लेखिलेल्या समाजभाषेहून वा सामान्य भाषेहून तिचे स्वरूप फारसे वेगळे नाही. संस्थानी कारभारातील मराठी ही आज कालानुरूप नसेल, पण तिच्यात प्रशासनिक भाषेची बरीचशी लक्षणे होती. ती फार्शी-प्रधान असली, तरी सामान्य भाषेहून वेगळी अशी तिची एकरूप व निश्चित परिभाषा होती ; वेगळा असा अभिव्यक्तीचा बंदिस्तपणा व घाट होता. पेशवेकालीन कारभाराच्या भाषेबद्दलही हेच म्हणता येईल. त्या काळातील राजकीय पत्रव्यवहार व सामान्य पत्रव्यवहार पाहिला, तर त्यात हा वेगळेपणा सहज दिसून येतो. समाजभाषेहून प्रशासनाची भाषा वेगळी असते, हे संस्थानी काळापर्यंत टिकून असलेल्या मराठीच्या जुन्या प्रशासनिक परंपरेवरूनही सिद्ध होते.

### स्वातंत्र्योत्तर काळ

इंग्रजी अंमलात काय किंवा स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या कालात काय, मराठीला खऱ्या अर्थी प्रशासनिक स्वरूप प्राप्त झालेले दिसत नाही.

मराठीचा शासनकार्यातील वापर स्वातंत्र्योत्तर काळात वाढला असला तरी इंग्रजीऐवजी राजभाषा म्हणून तिचा उपयोग करण्यात आलेला नाही. शासनव्यवहाराची भाषा म्हणून तिच्या ज्या उणिवा वर सांगितल्या त्या आजही तशाच आहेत. जुनी परंपरा आज निरुपयोगी ठरली असली तरी नवी परंपरा निर्माण व्हावयाची आहे. अशा परंपरेचा मूळ आधार जी प्रमाणभूत परिभाषा तीच आज उपलब्ध नाही. इंग्रजी धर्तीची शासनव्यवस्था स्वीकारल्यानंतर तिच्यातील व्यवहार-कल्पनांसाठी प्रतिशब्द हाताशी नसल्याने संस्थानी कारभारातील मराठीला किंवा इंग्रजी अमदानीतील मराठीला जी अडचण भासली व त्यामुळे ज्या संकर पद्धतीचा प्रयोग त्यांना करावा लागला तीच अडचण, अन्यथा समृद्ध असूनही मान्य व निश्चित परिभाषा ठरली नसल्याने, आजच्या मराठीबावत कायम आहे. परिणामतः इंग्रजी-मराठीचा संकर प्रयोग आजही तिला भरपूर प्रमाणात करावा लागत आहे.

संस्थानी किंवा इंग्रजी अंमलातील प्रशासनिक मराठीचे १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात किंवा त्यानंतरदेखील जे संकर स्वरूप होते ते आजही बरेचसे तसेच राहिले आहे, हे खालील उदाहरणांवरून दिसून येईल :—

१. "दि बी. ई. एस. टी. अंडरटेकिंग इलेक्ट्रिसिटी टॅरिफ्स्च्या सुधारणेसंबंधातील दरपत्रक—

एनर्जीसाठी चार्जेस :—प्रत्येक युनिटमागे ८ न. पै. अधिक वर्षाच्या सेकंड प्रिव्हीयस क्वार्टरमध्ये अंडरटेकिंगने खरेदी केलेल्या फ्युएल ॲडजस्टमेंट चार्जेसच्या १˙१ पटीच्या दराने." [१]

२. "नॅशनल कॅडेट कोअरच्या इन्स्ट्रक्शनल स्टाफमध्ये शार्ट सर्व्हिस एन्गेजमेंटवर एक्ससर्व्हिसमेन सैन्यामध्ये पुन्हा भरती होऊं शकतात." [२]

[१] महाराष्ट्र टाईम्स : ७ मे १९६३, जाहिरात (बी. इ. एस्. टी. अंडरटेकिंग).
[२] महाराष्ट्र टाईम्स : १५ मे १९६३, एक्स-सर्व्हिसमेनची पुनर्नोकरी.

३. "......मेडिकल कॉलेज येथे न्यूरो सायकिअॅट्रीमधील रीडरची जागा, कायमची, गॅझेटेड व नॉनपेन्शनेबल, १ वर्षाचा प्रोबेशन पीरिएड." [१]

४. "टेंडरसोबत जोडलेल्या ले-आऊट प्लॅनला अनुरूप असे प्लॅन्टचे स्वत: केलेले डिझाइनसुद्धा टेंडरर्सनी सादर करण्यास हरकत नाही....या कामामध्ये इंटरेस्ट असलेल्या भारतातील विविध देशांच्या ट्रेड कमिशनर्सना कॉम्प्लिमेंटरी कॉपिज् देण्यात येतील." [२]

मुसलमानी राजवटीत फार्शी राजभाषेच्या दीर्घकालीन वापरामुळे राज्यकारभाराच्या क्षेत्रात मराठी-फार्शीचा जो संकर निर्माण झाला त्याचीच पुनरावृत्ती इंग्रजीच्या बाबतीत होणे हे कसे शक्य आहे, हे वरील उदाहरणांवरून दिसून येईल. मराठी आज एक विकसित व पुढारलेली भाषा असून प्रशासनेतर विषयांच्या बाबतीत तिने आपली मूळ प्रकृती कायम ठेवली आहे. प्रशासनाच्या क्षेत्रात योग्य वेळी तिची परिभाषा तयार झाली नाही, तर प्रमाणाबाहेर इंग्रजी शब्द रूढ होऊन तिचा तोल बिघडेल व तिचेच स्वरूप विकृत होईल. मराठी आज राजभाषा होण्याच्या मार्गावर आहे. अशा वेळी तर वरील प्रवृत्तीला आळा बसेल याबाबत विशेषच जागरूक राहिले पाहिजे. ही परिभाषा आजवर यदृच्छया तयार झाली तशीच होऊ दिल्यास तसेच यासंबंधात रूढतेचा अथवा सामान्य भाषेशी एकरूपतेचा आग्रह धरल्यास, प्रशासनिक भाषेचे जे विषयविशिष्ट शास्त्रीय स्वरुप आहे ते तिला प्राप्त होणार नाही. शासन व्यवहाराच्या भाषेची एक नवी परंपरा मराठीत रूढ व्हायची असल्यामुळे त्यासाठी शासनाच्या सर्व गरजा लक्षात घेऊन शास्त्रीय दृष्टीने योजनापूर्वक व पद्धतशीर प्रयत्न झाले पाहिजेत.

अशा तऱ्हेचे एकदोन प्रयत्न मराठीत झाले आहेत. पहिला उल्लेखनीय प्रयत्न संविधानाच्या मराठी भाषांतराचा होय. स्वतंत्र

---

[१] महाराष्ट्र टाईम्स : १८ मे १९६३, जाहिरात (पब्लिक सर्व्हिस कमिशन).
[२] महाराष्ट्र टाईम्स : ३० मे १९६३, टेंडर नोटीस (मुंबई महानगरपालिका).

भारताच्या संविधानात देशातील चौदा भाषा यथावकाश राजभाषा व्हाव्यात अशी तरतूद होती. या भाषा संघराज्याच्या भाषा अथवा राष्ट्रीय भाषा म्हणून मान्य करण्यात आल्या होत्या. या भाषांतून संविधानाचे अधिकृत भाषांतर करण्यासाठी त्या सर्वांना वापरता येईल अशी संविधानापुरती एकरूप परिभाषा तयार करण्यात आली. ही परिभाषा भारतातील चौदा भाषांतील तज्ज्ञांनी एका खास परिषदेत चर्चा करून मान्य केली आणि तीच प्रादेशिक भाषांतील अनुवादात वापरण्यात यावी, असेही ठरवण्यात आले. भारतीय भाषांचा समान उगमस्त्रोत असलेल्या संस्कृत भाषेचा आधार, ही परिभाषा निर्माण करण्यासाठी काही प्रमाणात घेणे अर्थातच जरूर होते. संस्कृतच्या आश्रयामुळे एकरूपता तर साधता आलीच, पण नवशब्दनिर्मितीला तिच्या समृद्धीचा हातभार लागला. कायद्यासारख्या तांत्रिक बाबतीतील परिभाषा अत्यंत काटेकोरपणे, अर्थाच्या नेमकेपणाचे व त्यातील सूक्ष्म भेदांचे अवधान बाळगून तयार करावयास हवी. तसेच, आशयात कोणतीही संदिग्धता राहणार नाही व तार्किक संगतीस बाध येणार नाही, अशी या भाषेची बांधणीही हवी. सामान्य भाषेतल्याप्रमाणे अस्पष्टार्थ शब्दप्रयोग अथवा सैल रचना कायद्याच्या भाषेत चालू शकणार नाही. भारतातील चौदा भाषांना समान अशी उपरोक्त एकरूप परिभाषा उपयोगात आणून व कायद्यासारख्या विषयात विशेषत्वाने आवश्यक अशा संश्लिष्ट सरणीचा वापर करून नामवंत भाषातज्ज्ञांनी संविधानाचे हे मराठी भाषांतर केले होते.

संविधानाच्या या मराठी भाषांतराद्वारे राज्यकारभारातील भाषेचा शास्त्रीय कसोटीवर उतरू शकणारा एक नवा आदर्श मराठीत प्रथमच समोर ठेवण्यात आला. शासनप्रयुक्त मराठीच्या जुन्या परंपरेशी नाते सांगणारी फार्शी परिभाषा वा अभिव्यक्ती यात नव्हती. इंग्रजी शब्द आहेत तसेच ठेवून, संकर मराठीच्या वापराची जी एक नवी प्रवृत्ती रूढ होऊ पहात होती तीही येथे नव्हती. प्रादेशिक वैशिष्टयांवर भर न देता भारतातील सर्व भाषांना

समान रूपाने आपली म्हणता येईल अशी प्रशासनिक भाषेची एक नवी भारतीय परंपरा या भाषांतरात आढळून येत होती. या परंपरेतील संस्कृतचे वळण मराठीला अगदीच नवीन आहे, असे म्हणता येत नाही. शिवाजी महाराजांच्या राज्यकाळात राजभाषा म्हणून मराठीच्या स्वरूपात त्यांनी बदल घडवून आणला त्यावेळी फार्शी ऐवजी संस्कृतनिष्ठ परिभाषा तयार करण्यात आली व त्यांपैकी कित्येक शब्द अगदी परवापर्यंत संस्थानी मराठीत रूढ होते. नित्यव्यवहाराच्या भाषेहून प्रशासनाच्या भाषेला जो वेगळेपणा व बोज असावा लागतो तो संस्कृत वळणामुळे या नव्या शैलीला प्राप्त झाला होता. नव्याने वापरात येणारी ही परिभाषा सुरुवातीस अपरिचित वाटणारच ; पण अर्थवत्तेच्या दृष्टीने ती निर्दोष होती. यापूर्वीच्या विधिविषयक भाषेत रूढ म्हणून सुबोध वाटणारे शब्द असतील, पण ते सामान्य व्यवहारातही वापरले जात असल्यामुळे त्यांच्या अर्थच्छटा अन्यक्षेत्रव्यापी व म्हणूनच निश्चित नव्हत्या. सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे आतापर्यंत भाषेचा समतोल बिघडण्यास कारणीभूत झालेली परिभाषेची मुख्य अडचण कशी सोडवता येईल, हे या संविधानाच्या भाषांतराद्वारे दाखवून देण्यात आले होते. ही नवी परंपरा पूर्वीहून कशी व कोणत्या बाबतीत वेगळी होती हे पूर्वीच्या पद्धतीच्या व या नव्या शैलीच्या पुढील काही उदाहरणांवरून स्पष्ट होईल :

"कलमें १६, १७, १७-अ, १८, १९ आणि कलम २४ चे पोट-कलम (४), कलम २५ व कलम ४० ची पोट-कलमे (१) व (२) यांअन्वयेचे अपराध हे कॉग्निझेबल अपराध असतील आणि ते, प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट व फर्स्ट क्लास मॅजिस्ट्रेट यांच्या कोर्टाच्या दर्जापेक्षा कमी दर्जाच्या कोर्टाकडून इन्साफ केला जाण्याजोगे असणार नाहीत . . . . . . जेव्हा या आक्टान्वयेचा अपराध करणारा इसम एखादी कंपनी किंवा दुसरी संस्थापित संस्था किंवा इसमांची असोसिएशन किंवा एखादी पेढी असेल तेव्हा तिचा प्रत्येक डायरेक्टर, मॅनेजर, सेक्रेटरी, एजंट

किंवा इतर अंमलदार किंवा तिच्या व्यवस्थेशी संबंध असलेला इसम हा, अपराध त्याच्या माहितीवाचून किंवा त्याच्या संमतीवाचून करण्यात आला असे त्याने शाबीत केल्याखेरीज, अशा अपराधाबद्दल दोषी म्हणून समजण्यात येईल." [1]

"या भागाच्या पूर्वगामी उपबंधात काहीही असले तरी, जेथे सेनाविधि प्रवृत्त होता अशा भारताच्या राज्यक्षेत्राच्या आतील कोणत्याही क्षेत्रात बंदोबस्ताचे प्रतिपालन अथवा पुन:स्थापन या-संबंधात त्याने केलेल्या कोणत्याही कार्याचे बाबतीत संघाच्या किंवा राज्याच्या सेवेत असलेल्या कोणत्याही व्यक्तीस अथवा अन्य कोणत्याही व्यक्तीस संसद विधिद्वारा निस्तारण देऊ शकेल अथवा अशा क्षेत्रात सेनाविधिअनुसार दिलेला कोणताही दण्डादेश, केलेली शिक्षा, आदेशित जप्ती अथवा केलेले अन्य कार्य यांस मान्यता देऊ शकेल." [2]

"पूर्वोक्तास अधीन राहून, प्रथम अनुसूचीचा भाग [ख] यात उल्लेखिलेल्या प्रत्येक राज्याचे सरकार, या संविधानाच्या प्रारंभापासून खंड (१) यात निर्देशिलेल्याहून अन्य सर्व संपत्ती व मत्ता यांच्या आणि सर्व अधिकार, दायित्वे व आभार, ते कोणत्याही संविदेने वा अन्यथा उत्पन्न झाले असले तरी, त्याच्या संबंधात तत्स्थानी भारतीय राज्याच्या सरकारचे उत्तराधिकारी होईल." [3]

संविधानाच्या भाषांतरातील वरील उताऱ्यांचा लक्षणीय विशेष असा की, त्यात पूर्वीच्या प्रशासनिक मराठीत आढळून येणारे परिभाषेचे परावलंबित्त्व दिसून येत नाही. संविधानपूर्व भाषेच्या उपरोल्लिखित उताऱ्यात 'कॉग्निझेबल', 'आक्ट', 'कोर्ट', 'असोसिएशन' वगैरे संज्ञा किंवा 'मॅजिस्ट्रेट', 'डायरेक्टर', 'सेक्रेटरी', 'मॅनेजर' वगैरे पदनामे, इंग्रजीत आहेत तशीच वापरण्यात आली आहेत. या इंग्रजी शब्दांचे मराठी पर्याय उपलब्ध नव्हते किंवा ते तयार

---

[1] सन १९४७ चा मुबईचा आक्ट नंबर ५७ वा : पृ. ३५–३६.

[2] भारताचे संविधान (मराठी) : पृ. १६.

[3] भारताचे संविधान (मराठी) : पृ. १०४.

होऊ शकत नव्हते, असे म्हणता येणार नाही. परंतु दीर्घकालीन परावलंबित्वाचा परिणाम भाषेवर, विशेषेकरून परकीय शासनाशी संबंध येणाऱ्या कारभारविषयक भाषेवर होणे साहजिक होते. स्वातंत्र्योत्तर कालात ज्या नव्या जाणिवा निर्माण झाल्या, जो नवीन दृष्टिकोन वाढीस लागला, त्यांच्यायोगे अन्य क्षेत्रांतल्याप्रमाणे भाषेच्या व्यवहारातला हा परावलंबीपणा टाकून देण्याची गरज भासू लागली. त्या दृष्टीनेच राज्यकारभाराचे माध्यम म्हणून इंग्रजीऐवजी देशी भाषांचा उपयोग करण्यात यावा, अशी संविधानात तरतूद करण्यात आली. देशी भाषांचा शासनव्यवहारासाठी सरसकट व पद्धतशीर वापर न झाल्याने प्रशासनिक भाषा म्हणून त्यांचे स्वरूप अजून निश्चित झाले नव्हते. राज्यकारभाराच्या भाषेचा एक वेगळा घाट असतो, तिची एक विशिष्ट परिभाषा असते, याची जाणीव भारताच्या संविधानाची केंद्र सरकारकडून देशी भाषांतून भाषांतरे करण्यात आली, त्यावेळी प्रथमतः झाली. भारतीय भाषांची इतर क्षेत्रांत प्रगती झाली असली तरी त्यांचा राज्यकारभारात उपयोग होत नसल्याने स्वतंत्र अशी प्रशासनविषयक परिभाषा त्यांपैकी कोणत्याही भाषेत सिद्ध नव्हती. हाताशी होता तो जुजबी उपयोगासाठी लागणारा कामचलाऊ शब्दसंग्रह , व तोही बऱ्याच अंशी इंग्रजीतून जशाचा तसाच उचललेला. स्वतंत्र राष्ट्र म्हणून इतर सर्व क्षेत्रांत भारताचा आत्मप्रत्यय वाढत असताना भाषेच्या क्षेत्रातही परकीय भाषेचा हा पांगुळगाडा बाजूस सारणे आवश्यक होते. साहित्य, तत्त्वज्ञान, वैद्यक, गणित इत्यादी ज्ञानविज्ञानाच्या शाखांत पूर्वीपासून सर्व देशी भाषांतून वापरण्यात येणारी भारतीय परिभाषा उपलब्ध होती. तशीच भारतीय परिभाषा शासनव्यवहारासाठीही तयार करता येणे व ती वापरात आणणे शक्य होते. याच भूमिकेतून निरनिराळ्या भाषांतील तज्ज्ञ भाषापंडितांनी संविधानाची एकरूप परिभाषा तयार केली. संविधानाच्या मराठी

भाषांतराने शासनव्यवहाराच्या भाषेची एक नवी परंपरा निर्माण झाली, असे जे वर म्हटले आहे ते, प्रशासनाचे तंत्रविशिष्ट स्वरूप लक्षात घेऊन तयार करण्यात आलेल्या व परकीय प्रभावापासून मुक्त असलेल्या स्वतंत्र भारतीय परिभाषेचा त्यात वापर करण्यात आला आहे त्यास अनुलक्षूनच.

संविधानाचे मराठी भाषांतर हा मराठी भाषेच्या शासनोपयोगी घडणीचा एक शास्त्रीय व पद्धतशीर प्रयत्न असला तरी तो केवळ मार्गदर्शक स्वरूपाचा होता. त्याची व्याप्ती विधिविषयक भाषा व परिभाषा यांपुरतीच मर्यादित होती. शासनव्यवहाराची अनेक अंगोपांगे या परिभाषेत अंतर्भूत नव्हती. याशिवाय, प्रत्यक्ष राज्यकारभारात मराठीचा तोवर वापर सुरू न झाल्याने संविधानाची ही भाषा केवळ ग्रंथगत आदर्श म्हणूनच राहिली होती.

### मध्यप्रदेशाची राजभाषा—मराठी

राज्यकारभाराच्या भाषेच्या घडणीचा व वापराचा योजनापूर्वक आणि व्यापक प्रमाणावर झालेला यानंतरचा महत्त्वाचा प्रयोग राज्यपुनर्रचनापूर्व मध्यप्रदेश राज्यात करण्यात आला. संविधानाने घटक राज्यांसाठी घालून दिलेले भाषाविषयक धोरण कार्यान्वित करण्याच्या बाबतीत हे राज्य अग्रेसर ठरले. संविधान प्रवृत्त झाल्यानंतर एका वर्षाच्या अवधीतच या द्विभाषिक राज्याने हिंदी व मराठी या आपल्या प्रादेशिक भाषा विधिद्वारा राजभाषा म्हणून घोषित केल्या. शासनव्यवहारांच्या दृष्टीने या भाषांचा विकास व्हावा व प्रत्यक्ष राज्यकारभारात त्यांचा वापर करता यावा याची तयारी करण्यासाठी स्वतंत्र भाषा विभागाची तेथे निर्मिती करण्यात आली. हिंदी व मराठी या दोन्ही भाषांतील भाषातज्ज्ञांची एक समिती नेमून या भाषांसाठी राज्यकारभारविषयक परिभाषेचा अधिकृत असा ‘प्रशासन शब्दकोश’ तयार करवण्यात आला. ही सर्व सिद्धता झाल्यानंतर या राज्याने आपला सर्व शासनव्यवहार हिंदी

व मराठी या भाषांतून चालू केला. अशा रीतीने या राज्यात ग्रामपंचायतीपासून तो थेट सचिवालयापर्यंत सर्व स्तरावरील राज्यकारभारात, केंद्रीय सरकारशी संबंध येणारे काही विषय वगळता इतर सर्व विषयाबाबत या दोन भाषांचा समानरूपाने व अनिवार्यपणे वापर होऊ लागला. भाषाविषयातील आपल्या कृतिशील व साक्षेपी धोरणाने हे राज्य भारतात मार्गदर्शक ठरले व येथे अवलंबण्यात आलेल्या कार्यपद्धतीचा आदर्श ठेवून त्याच धर्तीवर इतर काही राज्यांनीही आपल्या भाषिक योजनांची आखणी केली. भाषा आयोगाने या राज्यास भेट दिली त्यावेळी, राज्य-कारभारात हिंदी-मराठीचा वापर करण्याच्या बाबतीत या राज्याने आखलेले धोरण व पार पाडलेला कार्यक्रम योजनाबद्ध असल्याचा व यशस्वी झाल्याचा त्यांनी निर्वाळा दिला.

मराठी भाषेपुरता विचार करता, १९५३ सालापासून राज्य पुनर्रचना होईपर्यंत सुमारे तीन वर्षांहून अधिक काळ मध्यप्रदेशात मराठी ही राजभाषापदी आरूढ होती व या राज्याच्या मराठी भाषिक प्रदेशातील शासनव्यवहार हा मुख्यत्त्वेकरून मराठीतूनच होत होता. मराठी संस्थानांचा अपवाद वगळता पूर्वीच्या इंग्रजी अंमलाखालील व इंग्रजी भाषेच्या अधिपत्याखालील प्रदेशात दीडशे वर्षांनंतर राज्यकारभारासाठी प्रथमतः मराठीचा वापर करण्यात आला तो या राज्यातच. इंग्रजी धर्तीच्या शासन-व्यवहारासाठी मराठीचा उपयोग इतक्या व्यापक प्रमाणावर आजवर करण्यात आला नव्हता. या दृष्टीने मराठीच्या अभिव्यक्ति-क्षमतेची वाढ करणे जरूर होते. हे उद्दिष्ट समोर ठेवून तेथे पद्धत-शीर प्रयत्न करण्यात आले. मुख्य अडचण होती ती राज्यकार-भारात नित्यशः लागणाऱ्या परिभाषेची. 'प्रशासन शब्दकोशा' द्वारे ही अडचण दूर करण्यात आली. ही परिभाषा तयार करताना चौदा भाषांच्या समितीने संविधानाच्या बाबतीत जे धोरण ठेवले होते त्याचाच अवलंब करण्यात आला. भारतीय परिभाषेशी

जुळणारे आणि मराठी भाषेच्या प्रकृतीशी सुसंगत ठरतील असे पर्याय स्वीकारण्यात आले. संविधानाच्या मराठी अनुवादासाठी निश्चित करण्यात आलेली परिभाषा या कोशात जशीच्या तशीच समाविष्ट करण्यात आली. याबरोबरच मध्यप्रदेश राज्याच्या विशिष्ट परिस्थितीनुसार पर्यायांबाबत आणखी एका धोरणाचा अवलंब करणे आवश्यक होते. या राज्यात मराठी व हिंदी या दोन्ही भाषांचा जोडीने राज्यकारभारात उपयोग होत होता. शासनातील मराठी व हिंदी भाषाव्यवहार दोन्ही भाषिकांना कळणे आवश्यक होते. यासाठी दोन्ही भाषांतील पर्याय शक्य-तोवर समान ठेवण्याचा 'प्रशासन शब्दकोशा' त प्रयत्न करण्यात आला. त्यामुळे या कोशातील मराठी परिभाषा काही अंशी संस्कृताश्रयी झाली आहे. तरीपण मराठी पर्याय देताना या कोशात हिंदीशी जुळल्या शब्दांबरोबर शक्य तेथे मराठीतील रूढ शब्दही देण्यात आले आहेत.

प्रशासनिक भाषा म्हणून मराठीचा उपयोग करायचा म्हणजे केवळ परिभाषा कोश तयार करूनच भागण्यासारखे नव्हते. शासन-प्रयुक्त भाषेची एक विशेष घडण असते, विशिष्ट वाक्प्रयोग असतात. परिभाषेप्रमाणेच या वाक्प्रयोगांचेही निश्चित व प्रमाणभूत स्वरूप ठरविणे प्रशासनिक भाषेच्या एकरूपतेच्या दृष्टीने जरूर असते. अशा वाक्प्रयोगांचा व वाक्यांशांचा त्यांच्या मराठी रूपांसह केलेला संग्रह 'प्रशासन शब्दावली' च्या चार पुस्तिकांतून त्या राज्यातील भाषा विभागाद्वारा तयार करण्यात आला. हे वाक्प्रयोग व कोशातील पारिभाषिक शब्द, प्रशासनविषयाच्या विशिष्ट स्वरूपामुळे सामान्य व्यवहाराच्या भाषेहून काही अंशी वेगळे होते. मराठीची प्रकृती व सौष्ठव सांभाळून प्रशासनिक भाषा कशी लिहावी, हे दाखवून देण्याच्या दृष्टीने कार्यालयीन टिप्पणी, मसुदे, आदेश इत्यादिकांच्या नमुन्यांची 'मार्गदर्शिका' नावाची एक पुस्तिकाही प्रकाशित करण्यात आली. राज्यकारभाराची भाषा म्हणून मराठीचा वापर व विकास करण्याच्या दृष्टीने मध्यप्रदेश राज्यात करण्यात

आलेल्या वरील पद्धतशीर प्रयत्नांचा हा आढावा, शासनप्रयुक्त मराठीचे स्वरूप व पुढील विकासाची दिशा ठरविताना उद्बोधक ठरावा.

मध्यप्रदेश राज्यात दोन तीन वर्षे राज्यकारभाराची भाषा म्हणून मराठीचा झालेला हा उपयोग प्रारंभिक व म्हणूनच प्रायोगिक स्वरूपाचा होता. परंतु संविधानाच्या भाषांतराने निर्देशित केलेला भारतीय परिभाषेचा वापर व प्रशासनिक भाषेच्या तंत्रविशिष्ट स्वरूपाची जाण या प्रयोगामागे असल्यामुळे या भाषाप्रकाराच्या तेथील विकासाची दिशा निश्चित व सुस्पष्ट होती. मध्यप्रदेशातील शासनप्रयुक्त मराठीत काही उणिवा असतीलही ; परंतु स्वातंत्र्योत्तर भारतीय परिस्थितीच्या व्यापक संदर्भात आणि आधुनिक शासनव्यवहाराच्या सर्वस्पर्शी गरजा लक्षात घेता राज्यकारभारातील मराठीचा तोंडवळा कसा राहील, सामान्य व्यवहारभाषेशी तिचे साधर्म्य आणि वैधर्म्य कसे आणि किती राहील, याची कल्पना मध्यप्रदेश शासनाच्या मराठी राजभाषेच्या प्रयोगावरून निश्चितपणे यावी.

संविधानाची ' पारिभाषिक शब्दावली ' आणि तिच्यामागील तत्त्व व पद्धती यांचे अनुसरण करून तयार करण्यात आलेला मध्यप्रदेश शासनाचा ' प्रशासन शब्दकोश ' यांनी प्रशासनिक परिभाषेची उणीव जशी काही प्रमाणात भरून काढली, तसेच राज्यकारभाराच्या भाषेला नवे वळणही दिले. शासनव्यवहाराच्या कामी शास्त्रीय व व्यवहारिक दृष्ट्या ही भाषा उपयोगी ठरल्यामुळे तिची ही नवी परंपरा मराठी भाषिक प्रदेशात मान्यता पावली व स्थीर होऊ लागली. राज्यपुनर्रचनेनंतर जुन्या द्विभाषिक मुंबई राज्यात व नंतरच्या महाराष्ट्र राज्यात वापरण्यात येणाऱ्या शासनप्रयुक्त मराठी भाषेवरसुद्धा या नव्या परंपरेचा स्पष्ट ठसा उमटलेला दिसून येतो. द्विभाषिक मुंबई राज्यात शासनाद्वारे विधिविषयक अनुवादासाठी जी प्रमाणभूत परिभाषा ठरविण्यात आली, किंवा अगदी अलीकडे महाराष्ट्र विधानमंडळाच्या सदस्य समितीने जी ' संसदीय शब्दावली ' तयार केली त्या दोहोंतील परिभाषा या नव्या परंपरेचे अनुसरण

करणारी आहे. या परिभाषेचा उपयोग करून प्रशासनिक मराठीचे जे रूप सिद्ध होते ते संविधानाच्या मराठी अनुवादातील नव्या वळणाच्या भाषेशी किती जुळणारे आहे, हे पुढील दोन उताऱ्यां-वरून सहज स्पष्ट होईल.

१. "ज्याअर्थी, महाराष्ट्र राज्याच्या विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहांचे अधिवेशन चालू नाही, त्याअर्थी आता भारताच्या संविधानाचा अनुच्छेद २१३, खंड (१) अन्वये मिळालेले अधिकार चालवून महाराष्ट्राचे राज्यपाल याद्वारे पुढील अध्यादेश करून तो प्रख्यापित करीत आहेत :—

. . . महानगरपालिकेने उक्त अधिनियम अंमलात आणल्यानंतर . . अशा इमारती व जमिनी यांच्या करयोग्य मूल्याच्या शेकडा पाच टक्क्यांहून अधिक होणार नाही इतक्या रकमेने वाढ करणे विधि-संमत ठरेल . . . या परिच्छेदाच्या पूर्वगामी उपबंधान्वये जी कोणतीही वाढ करावयाची असेल अशी कोणतीही वाढ करण्यास बाध येणार नाही." [१]

२. "प्रभारी मंत्री : महोदय, लोकाभिप्राय अजमावण्याकरिता परिसृत केलेले विधानसभा/परिषद विधेयक क्रमांक . . . . . . . . . . . . . . . (विधेयक) पुढील सदस्यांच्या चिकित्सा समितीकडे दिनांक . . . . . . . च्या आत प्रतिवृत्त सादर करण्याचा अनुदेश देऊन विचारार्थ पाठवावे असा मी आपल्या अनुमतीने प्रस्ताव मांडतो." [२]

## काही निष्कर्ष

शिवकालात राजभाषा म्हणून प्रतिष्ठा प्राप्त झाल्यापासून संविधा-नोत्तर कालातील हे नवे वळण मिळेपर्यंत आजतागायतच्या सुमारे तीनशे वर्षांच्या कालावधीत राज्यकारभारातील मराठीची जी वाटचाल झाली तिचा धावता आढावा वर घेतला आहे. या तीन

[१] *Maharashtra Government Gazette, January 31st, 1963, Part VIII,* pp. 87-88.

[२] मराठी संसदीय शब्दावली आणि वाक्यसंहिता : पृ. ३४.

शतकांतील तिची स्थित्यंतरे व बदलत्या परंपरा यांचा वस्तुनिष्ठ दृष्टीने विचार करता कोणते निष्कर्ष निघू शकतात, हे पाहू.

१. या शासनप्रयुक्त भाषेची तत्कालीन इतिहासक्रमाशी व राजकीय परिस्थितीशी अन्य भाषाप्रकारांहून अधिक निकट अशी सांगड असून या गोष्टीचा तिच्यावरील प्रभाव प्रत्यक्ष व सुस्पष्ट दिसतो.

२. परकीय शासनाच्या संपर्काने या भाषेचा सामान्य भाषेशी असलेला समतोल ढळतो आणि ती अधिक लवकर व मोठ्या प्रमाणावर संकरप्रवृत्त होते.

३. राजकीय व सांस्कृतिक ध्येयवादाने या भाषेच्या रूढ स्वरुपात परिवर्तन घडून येऊ शकते.

४. सामान्य लोकभाषेहून व साहित्यिक भाषेहून तिचे स्वरूप जसे वेगळे, तशाच तिच्या परंपरा व वळणे वेगळी असल्याचे दृष्टोत्पत्तीस येते.

५. शासनव्यवहाराचे स्वरूप व गरजा यांनुसार तिच्या शब्दसंग्रहात व परिभाषेत फरक पडत असल्याचे आढळून येते. हा शब्दसंग्रह व्यावहारिक व वाङ्मयीन भाषेहून पुष्कळसा स्वतंत्र व वेगळा असतो.

६. या भाषेचे स्वरूप व धाटणी नित्य व्यवहाराच्या शब्दापेक्षा तिच्यातील परिभाषेवर अधिक अवलंबून असतात.

७. शासनसत्ता कोशादी ग्रंथाद्वारे व राज्यकारभारातील वापराद्वारे या भाषेचे व तिच्यातील परिभाषेचे नियमन करू शकते.

८. केंद्रीय शासनाच्या भाषेचा राज्यभाषेवरील परिणाम काही अंशी अनिवार्य असतो.

९. कालप्रवृत्तीशी अनुरूप अशा नव्या परंपरेचा ती स्वीकार करू शकते.

शासनप्रयुक्त मराठीच्या इतिहासक्रमाचा एक पुढील टप्पा म्हणूनच उद्याच्या प्रशासनिक मराठीचे स्वरूप ठरणार आहे. तेव्हा वरील

निष्कर्ष जमेस धरून तिची घडण झाली पाहिजे. आज तिने जे नवे वळण घेतले आहे ते या इतिहासक्रमाशी सुसंगत असेच आहे. कालप्रवृत्ती आणि व्यापक भारतीय संदर्भ ती दुर्लक्षित करू शकत नाही. देशाच्या सर्वव्यापी ध्येयधोरणाच्या प्रभावापासून तिला अलिप्त राहता येणार नाही. या दृष्टीने सामान्य लोकभाषेच्या अथवा साहित्यिक भाषेच्या प्रा देशिक परंपरेशी सर्वतोपरी एकरूपता राखणे तिला शक्य होणार नाही. इतिहासावरून निष्पन्न होणारे व शास्त्रीय कसोटीवर उतरू शकणारे तिचे स्वरूप शासनव्यवहाराच्या गरजांना प्राधान्य देणारे आहे. त्यामुळे केवळ सामान्य व्यवहार भाषेच्या व वाङ्मयीन भाषेच्या शब्दसंग्रहावर तिचे काम भागणार नाही. पूर्वीसारखीच तिला आपली वेगळी परिभाषा निश्चित करावी लागेल. राज्यकारभाराचे आजचे विस्तारलेले क्षेत्र लक्षात घेता तिचे स्वरूप पूर्वीहून अधिक परिभाषाश्रयी व लोकाभिमुख होईल. ही परिभाषा प्रशासनाइतकीच तंत्रविज्ञानादी विषयांशी संबंधित असल्यामुळे ती निश्चित करताना शास्त्रीय पद्धतीचा अवलंब करावा लागेल व त्याबरोबरच तिची एकरूपताही संभाळावी लागेल. या दृष्टीने समान अशी भारतीय स्वरुपाची परिभाषा विकसित झाल्यास प्रसंगी आणखी नवे वळण स्वीकारून तिला ती आत्मसात करावी लागेल.

राजभाषा म्हणून मराठीचा विकास व्हावयाचा तो वरील दिशेनेच होईल. ही दिशा सूचित करणारा इतिहासक्रम या प्रकरणात पाहिला. त्याआधीच्या प्रकरणात या विकासाचा सद्य:कालीन संदर्भ व त्यामागे असलेली प्रशासनिक भाषेच्या शास्त्रीय स्वरुपाची बैठक या गोष्टी स्पष्ट केल्या. प्रशासनिक भाषेचा विकास म्हणजे मुख्यत: तिच्या परिभाषेचा विकास होय. या परिभाषेचे स्वरूप काय व तिच्या विकासाची प्रक्रिया कोणती, हे पुढील प्रकरणात पाहावयाचे आहे.

# प्रशासनिक परिभाषेचा विकास

•

**शासनकार्यासाठी** वापरण्यात येणाऱ्या भाषेचे स्वरूप व लक्षणे कोणती, व्यापक समाजव्यवहारासाठी वापरण्यात येणाऱ्या वेगवेगळ्या भाषाप्रकारांपैकी तिचा प्रकार कोणता, या प्रश्नांची सविस्तर चर्चा मागील एका प्रकरणात केलीच आहे. त्यावरून निष्पन्न होणारे तिचे स्वरूप, समाजाच्या एका सामान्य पातळीवर सर्वांना वापरता येईल अशा जनभाषेहून किंवा कलात्मक प्रयोजनांसाठी उपयोगात येणाऱ्या साहित्यिक भाषेहून वेगळे असते, हे आपण पाहिले. राज्यकारभार हा एक व्यवसायविशेष असल्यामुळे व त्याच्या आजच्या संकीर्ण व बहुविध स्वरुपांनुसार अनेक शास्त्रीय व तांत्रिक बाबींशी तो संबंधित असल्यामुळे, त्यात प्रयुक्त होणारी भाषा शास्त्रीय व तांत्रिक स्वरूपाची असणार हे उघडच आहे. या भाषाप्रकाराची लक्षणे सांगताना, ही शास्त्रीय भाषा परिभाषाश्रयी असते, याचाही उल्लेख येऊन गेला आहे. शास्त्रीय भाषेचे अपरिहार्य अंग असलेली ही परिभाषा म्हणजे काय व शास्त्रीय स्वरुपाशी जुळत्या प्रशासनिक भाषेतील परिभाषेचा

विकास करावयाचा तो कोणत्या तत्त्वावर व कशा प्रक्रियेने, याचा पुढे विचार केला आहे.

**परिभाषा म्हणजे काय ?**

सामान्य व्यवहाराच्या गरजा भागविण्यासाठी नित्यपरिचित व मर्यादित स्वरूपाचा शब्दसंग्रह पुरा पडतो. परंतु निरनिराळ्या व्यवसायांच्या किंवा शास्त्रतंत्रादी ज्ञानाच्या गरजा सामान्य व्यवहाराहून वेगळ्या असतात. समाजाच्या या व्यवसायविशिष्ट व ज्ञानविशिष्ट गरजा भागविण्यासाठी, त्यांचा विशेष आशय व्यक्त करण्यासाठी, सामान्य शब्दांहून पुष्कळदा वेगळा व स्वतंत्र असा शब्दसंग्रह तयार करावा लागतो. बहुधा नवीन शब्द तयार करून किंवा नित्याच्या भाषेतील शब्दांना कधी एकच निश्चित तर कधी नेहमीहून वेगळा अर्थ देऊन हा शब्दसंग्रह निर्माण करण्यात येतो. या शब्दांचा अर्थ-हा, त्या त्या विशिष्ट क्षेत्रातील व्यवहारसिद्ध वा प्रयोगसिद्ध अनुभव व तथ्ये व्यक्त करीत असतो. एकच विवक्षित अनुभव वा तथ्य व्यक्त होईल, त्याहून वेगळा वा त्याच्याच जोडीला दुसरा निष्कर्ष निघणार नाही व अर्थात अनिश्चितता किंवा संदेह निर्माण होणार नाही, अशा तऱ्हेची ही एकार्थवाचक शब्दयोजना असते. अशा रीतीने एखाद्या विशेष ज्ञानाच्या क्षेत्रात निश्चित व एकाच अर्थी प्रयुक्त होणारा व व्याख्यांच्या द्वारा व्यक्त होऊ शकणाऱ्या कल्पनेचे ध्वनिरूप प्रतीक असणारा शब्द म्हणजे पारिभाषिक शब्द होय.

मुख्यत्त्वेकरून शास्त्र, विज्ञान, तंत्र, कायदा, व्यवसाय इत्यादी क्षेत्रांत वापरण्यात येणारे शब्द शुद्ध पारिभाषिक शब्द होत. डेमॉक्रसी, सिलॉजिझम, व्हिटॅमिन, मायक्रॉस्कोप, ॲफिडेव्हिट, एस्टॉपेल, इन्शुअरन्स, ॲक्शन इत्यादी शब्द हे अशा तऱ्हेचे शुद्ध पारिभाषिक शब्द असून त्या त्या विशिष्ट क्षेत्रात एकाच व निश्चित अर्थाने त्यांचा वापर होतो. सामान्य व्यवहाराच्या गरजांशी व

तद्वाचक शब्दसंग्रहाशी वरील पारिभाषिक शब्दांचा संबंध येत नाही. विवक्षित क्षेत्राखेरीज अन्यत्र ते उपयोगात येत नाहीत.

वरील पारिभाषिक शब्दांसारखे विशिष्ट क्षेत्रात व विशेष अर्थी उपयोगात येणारे परंतु सामान्य व पारिभाषिक अशा दोन्ही अर्थी प्रयुक्त होणारे शब्द हे अर्धपारिभाषिक शब्द होत. वर्क, सेल, लिमिटेशन, ऑपरेशन, ब्रीफ, नोटीस, ड्राफ्ट इत्यादी शब्द सामान्य व्यवहारात जसे वापरण्यात येतात तसेच ते शास्त्रव्यवसायादी क्षेत्रांतही व्यवहृत होतात. पण पारिभाषिक अर्थी त्यांना त्या त्या क्षेत्रात विशेष व एकच अर्थ देण्यात येत असतो. त्यांचे पारिभाषिक स्वरूप व्याख्या, संदर्भ, प्रयोग इत्यादी गोष्टींनी निश्चित होते.

पारिभाषिक व अर्धपारिभाषिक शब्दांच्या जोडीला शास्त्रीय व तांत्रिक भाषेत प्रयुक्त होणारे काही सामान्य शब्द आहेत. हे शब्द सामान्य व्यवहारात व शास्त्रविज्ञानादी क्षेत्रांत समान अर्थाने वापरले जातात. मात्र शास्त्रविज्ञानादी विषयांच्या संदर्भात त्यांचा उपयोग पारिभाषिक शब्दांसारखाच होतो. प्लॅन्ट, सीड, लाइट, हीट, डिमान्ड, सप्लाय्य वगैरे शब्द या सदरात येतात. कधी कधी नेहमीचा अर्थ न बदलताही हे सामान्य शब्द संहित रूपाने एकाच निश्चित अर्थी पारिभाषिक शब्द म्हणून वापरले जाऊ शकतात. अर्थशास्त्रातील 'मार्जिनल डिमांड' किंवा विधिविषयक संदर्भात 'शो कॉज नोटीस' अशी या प्रकाराची उदाहरणे सांगता येतील.

वरील विभिन्न पारिभाषिक शब्दप्रकारांचा विचार करता एक गोष्ट प्रामुख्याने लक्षात येते आणि ती म्हणजे या शब्दांच्या अर्थाला काटेकोरपणा असतो. शास्त्रीय भाषेच्या संबंधात या काटेकोरपणाला महत्त्व देण्याचे कारण असे की, शास्त्र व तंत्रज्ञानादिकांच्या क्षेत्रांत परिभाषा हीच विचाराचे साधन असून तिच्या वापरातील चूक ही विचार-प्रक्रियेतील चूक ठरू शकते. नेहमीच्या व्यवहारात एखाद्या शब्दाचा

वापर करताना त्याचा अर्थ ऐकणाराला रेखीवपणे समजेल अशी काळजी घेण्याची तेवढी आवश्यकता असतेच असे नाही. शास्त्रव्यवसायादी क्षेत्रांत मात्र वापरलेल्या शब्दांचा अर्थ ठाम व निश्चित स्वरुपातच ग्रहण केला जावा, अशी अपेक्षा असते. दैनंदिन व्यवहारात सामान्य स्वरुपाची जी भाषा उपयोगात आणली जाते ती अर्थाचा हा नेमकेपणा पूर्णतः व्यक्त करू शकत नसल्यामुळे शास्त्रीय भाषेला तिची वेगळी परिभाषा असणे आवश्यक ठरते. शास्त्रीय विषयांत परिभाषेचे महत्त्व किती असते, हे 'चेम्बर्स टेक्निकल डिक्शनरी'च्या प्रस्तावनेत पारिभाषिक शब्दांची व्याख्या करताना स्पष्ट केले आहे. "ज्ञानविज्ञानाच्या क्षेत्रांतील विद्वान आणि तज्ज्ञ व्यक्तींना पारिभाषिक शब्दांचे महत्त्व विशेष असते. पारिभाषिक शब्दांच्या साहाय्यानेच अशा विशेषज्ञांना व तंत्रज्ञांना आपल्या कल्पना नेमकेपणाने शब्दबद्ध करता येतात. अशा परिभाषेच्या अभावी त्यांच्या मानसिक प्रक्रियेत अडचण येईल."

अशा रीतीने परिभाषा ही शास्त्र, तंत्र, व्यवसाय इत्यादि विशेष व्यवहारातच मुख्यत्त्वाने उपयोगात येत असून सामान्य व्यवहाराशी व त्यात प्रयुक्त होणाऱ्या भाषेशी तिचा फारसा संबंध नसतो. राज्यव्यवहाराची पारिभाषा हीसुद्धा वरीलप्रमाणेच विशिष्ट प्रकारच्या व्यवहारासाठी व त्याशी संबंधित लोकांसाठीच प्रामुख्याने असते. परंतु आजच्या प्रशासनविषयक भाषेच्या स्वरुपाची नीट समज नसल्याकारणाने "राज्यकारभार, कायदा व व्यापारविषयक परिभाषा मात्र सामान्य लोकांसाठीच असते" अशी विधाने करण्यात येतात व त्या मतांचा विद्वानांकडून पाठ पुरावा करण्यात येतो. परिभाषेची वर जी व्याख्या दिली आहे ती समजून घेतली, तर परिभाषा ही प्रामुख्याने विशिष्ट व्यक्तीं-साठी असून सामान्य व्यवहाराहून वेगळ्या अशा व्यवहारासाठी त्यांनीच ती तयार केलेली असते, हे लक्षात येईल. या दृष्टीने 'सामान्य

लोकांची प्रचलित परिभाषा' हा शब्दप्रयोग मर्यादित अर्थीच घेतला पाहिजे'; त्याविषयी गैरवाजवी आग्रह धरून चालणार नाही.

समाजातील छोटेमोठे व्यवसाय घेतले तरी त्यासाठी लागणारा शब्दसंग्रह त्या व्यवसायांच्या गरजांनुसार सामान्य भाषेहून वेगळा निर्माण होतो. ही त्या त्या व्यवसायातील परिभाषाच असते. याच दृष्टीने नित्याच्या व्यवहाराहून वेगळ्या अशा शास्त्रीय-तांत्रिक स्वरुपाच्या व्यवहारात वावरणाऱ्या लोकांनाही परिभाषेची आवश्यकता भासते. व्यक्त करावयाच्या कल्पना व विचार, या परिभाषेद्वारे ते निश्चित व विशेष स्वरुपात मांडू शकतात. शास्त्रीय भाषेचे यर्थार्थता व स्पष्टार्थता हे जे दोन विशेष मागे सांगितले आहेत ते या परिभाषेमुळेच तिच्या ठिकाणी निर्माण होतात. परिभाषा हे, शास्त्र व भाषा या दोहोंनाही उपकारक ठरणारे माध्यम आहे. या माध्यमामुळे अभिव्यक्तिसाधन म्हणून भाषेला जसा निश्चितपणा येतो, तसाच शास्त्रविज्ञानाच्या आशयालाही नेमकेपणा येतो. भाषा जशी विकसित होते तशीच शास्त्रविज्ञानाचीही प्रगती होते.[१] परिभाषेचे हे कार्य पाहता कोणत्याही व्यवहारासाठी ती किती जबाबदारीने निश्चित केली पाहिजे याचे महत्त्व ध्यानी यावे.

## परिभाषेची लक्षणे

आजच्या प्रगतिशील जगात मानवी जीवनातील हरेक क्षेत्राचा विकास नि विस्तार होत आहे व त्यांच्या बरोबरीने भाषेलाही पावले टाकावी लागत आहेत. तांत्रिक स्वरूप असलेल्या प्रत्येक व्यवहारात भाषेला वेगळेपणा आला आहे, तिने आपला निराळा प्रपंच थाटला आहे. भाषेचा हा वेगळा प्रपंच म्हणजेच त्या त्या

---

[१] "The development of Scientific Terminology must be viewed as a dynamic process which has an impact on, and which in its turn is influenced by, the growth and progress of science and language."

—Dr. D. S. Kothari : *The Problem of Scientific and Technical Terminology*, p. 7.

व्यवहारातील परिभाषा होय. प्रत्येक विकासशील समाजाला आपल्या निरनिराळ्या क्षेत्रांतील प्रगतीच्या अनुरोधाने आपली भाषा व परिभाषा आज वाढवावी लागत आहे. ही परिभाषा यदृच्छया सावकाश वाढेल म्हणून थांवतो म्हटले तर सभोवतालच्या प्रगतीचा वेग लक्षात घेता ते शक्य नाही. यासाठी सर्वत्र परिभाषेचा विकास घडवून आणण्याचे योजनाबद्ध प्रयत्न होत आहेत. परिभाषानिर्मितीचेही आता शास्त्र झाले असून परिभाषेची लक्षणे कोणती व ती सुयोग्य रीतीने तयार व्हायची तर त्याची पद्धती कोणती याचा युनेस्को-सारख्या जागतिक संघटनेने विचार केला आहे. तांत्रिक अनुवाद व भाषाविषयक प्रश्नांसंबंधी या संस्थेने जे प्रतिवेदन तयार केले आहे त्यात, प्रोफेसर ऑगस्टिनो सेव्हेरिनो यांनी परिभाषा तयार करताना तिच्या विशिष्ट स्वरुपाचा व लक्षणांचा निर्देश केला आहे.[1] मराठीत आज प्रशासनाच्याच नव्हे, तर शैक्षणिक व शास्त्रीय-तांत्रिक विषयांच्या परिभाषेचा विकास करायचा आहे. त्या दृष्टीने त्यांनी निर्दिष्ट केलेली परिभाषेची लक्षणे या कामी खचित मार्गदर्शक ठरतील. ही लक्षणे क्रमशः अशी :

१. **एकार्थता**—परिभाषेच्या स्वरूपाचा विचार करताना आशय वा अर्थ निश्चितपणे व्यक्त करणे हेच परिभाषेचे प्रयोजन असते, हे तिच्या व्याख्यागत लक्षणावरून आपण पाहिले. अर्थ-निश्चितीच्या दृष्टीने शास्त्रीय वा तांत्रिक क्षेत्रात आणि त्याच स्वरुपाच्या विधी वा अन्य प्रशासनिक विषयात प्रत्येक पारि-भाषिक शब्दाला त्याचा स्वतंत्र व वेगळा अर्थ पाहिजे. म्हणजेच एक शब्द व त्याचा एकच अर्थ हे तत्त्व सांभाळले पाहिजे. शब्दाचा एकाहून अधिक अर्थी प्रयोग होत असला तर आशया-बाबत संभ्रम निर्माण होऊ शकतो. या क्षेत्रात कधी कधी सामान्य भाषाव्यवहारातील शब्द रूढीने प्रचलित झालेला असला तरी तेथेही त्याचा एकच निश्चित व पारिभाषिक अर्थ ठरवण्यात

[1] *Scientific and Technical Translating and other Aspects of Language Problem (UNESCO—1957) : 7-1-13,* p. 213.

आलेला असतो व तो शब्द केवळ त्याच अर्थी प्रयुक्त होतो. सामान्य भाषेप्रमाणे त्याचा अर्थ संदर्भावलंबी असत नाही; म्हणजे शब्दाचे एकाधिक अर्थ संमत असून संदर्भानुसार त्यांपैकी एक अर्थ ग्रहण करायचा अशी परिस्थिती नसते. शास्त्रविज्ञानादी विषयांत त्यांतील मूळ प्रवृत्ती नि पद्धतीनुसार जो नेमकेपणा असतो तोच त्यांच्या भाषेतही येणे साहजिक व आवश्यक आहे. शास्त्रीय स्वरुपाच्या भाषेत यथार्थता येण्याच्या दृष्टीने परिभाषेत एका शब्दाला एकच अर्थ असावा, असे 'सायन्स' या अमेरिकन नियतकालिकाचे संपादक डॉ. रोलर यांनीही सांगितले आहे.

२. **स्पष्टार्थता.**—परिभाषा ही आशय स्पष्ट करणारी असावी. पारिभाषिक शब्दाचा अर्थ जसा निश्चित असावा तसाच तो ज्या वस्तूचा वा विचाराचा वाचक असेल त्याची स्पष्ट कल्पना देणारा असावा. मात्र परिभाषा स्पष्टार्थक असावी याचा अर्थ ती स्पष्टीकरणात्मक असावीच, असा नव्हे. तशी ती असेल तर परिभाषा-लक्षणाच्या दृष्टीने सामान्यत: तो दोषच गणला जाईल. शब्दांच्या द्वारा जी कल्पना व्यक्त व्हायची तिच्या वैशिष्टयाचा बोध झाला की पुरे. शब्दांना संकेताने अर्थ येतो हे खरे असले तरी ते पुष्कळसे रूढ व प्रचलित शब्दांच्या बाबतीतच म्हणता येईल. परंतु नव्याने जेव्हा शब्द तयार करायचा त्यावेळी शक्य तोवर तो अन्वर्थक असावा असाच प्रयत्न करण्यात येतो. शास्त्रीय विषयांत प्रत्येक गोष्टीचा सूक्ष्म विचार असतो. एक कल्पना दुसरीशी सदृश असते, अर्थाच्या दृष्टीने अतिनिकट असते. अशा वेळी प्रत्येक कल्पनेची सूक्ष्मता, प्रत्येकीची वेगळी अर्थच्छटा व्यक्त होईल, असा विशेषार्थदर्शक म्हणजेच स्पष्टार्थक शब्द ठरविणे जरूर असते. सामान्य व्यवहाराच्या बाबतीत, अर्थ सरासरी, ढोबळ मानाने व्यक्त झाला तरी चालू शकते. पण शास्त्रतंत्रादींच्या क्षेत्रांत अर्थ नेमका व स्पष्ट ध्यानी आला पाहिजे. शब्द एकार्थक असला आणि त्याच्याच जोडीला तो स्पष्टार्थक असला

म्हणजे आशयाबाबत कोणतीही संदिग्धता राहू शकत नाही. प्रशासनापुरते बोलायचे तर विधिव्यवहारात अशी असंदिग्ध परिभाषा नसल्यास किती गोंधळ उडेल हे सांगायला नको.

३. **एकरूपता**—शास्त्रीय किंवा तांत्रिक क्षेत्रात परस्परांशी संबद्ध असे अनेक विषय समाविष्ट झालेले असतात. एका विषयातील कल्पना तशीच दुसरीकडे संदर्भानुरोधाने येऊ शकते. अशा वेळी त्या त्या विषयाच्या अशा विवक्षित कल्पनेत फरक नसेल तर दोन्हीकडील परिभाषा एकरूपच असणे केव्हाही योग्यच. त्यामुळे विषय निराळे असले तरी समान कल्पनांच्या अभिव्यक्तीत विसंवाद प्रत्यायास येणार नाही आणि निरनिराळ्या ज्ञानशाखांत आशय आणि अभिव्यक्ती यांच्या बाबतीत एक प्रकारचा समन्वय, एक तऱ्हेची व्यापक व्यवस्था निर्माण होईल. ही एकरूपता साधित शब्दांच्याही बाबतीत असू शकेल.

४. **सघनता**—पारिभाषिक शब्दांत सघनता ही शास्त्रीय भाषेच्या एकूण आटोपशीर स्वरुपामुळे येते. शास्त्रीय वा व्यावसायिक भाषेची प्रकृती साहित्यिक किंवा सामान्य व्यवहारातील भाषेसारखी वर्णनात्मक किंवा विस्तारशील नसते. या भाषेतील विचार तर्कबद्ध व मांडणी आटोपशीर असते. त्यामुळे तिच्यातील अभिव्यक्ती ही विवक्षित कल्पनेचे स्पष्टीकरण करणारी असत नाही, तर त्यातील मुख्यार्थ तेवढाच संकेतरूपाने सांगते. ज्ञानकोशकारांनी आपल्या 'विज्ञानेतिहास' खंडात परिभाषेविषयी लिहिताना हा फरक पुढीलप्रमाणे स्पष्ट करून दाखवला आहे—"सामान्य जनांसाठी विषय समजावून द्यावयाचा झाल्यास तो आटोपशीर नसला तरी सुबोध असावा लागतो. शास्त्रीय लेखन विशिष्ट लोकांकरिताच असल्याने ते सुबोध नसले तरी आटोपशीर व व्यवस्थित असावे लागते. पाणी उष्ण करणे व ती वाफ निराळ्या भांड्यात धरून थंड करणे हे सामान्य जनांसाठी ठीक, तर हीच

कल्पना शास्त्रविषयात केवळ 'उर्ध्वपातन' या एकाच शब्दाने व्यक्त करणे योग्य."[१]

५. **अल्पाक्षरता**--सघनता हे परिभाषेचे जसे आशया-संबंधीचे लक्षण, तसेच अल्पाक्षरता अभिव्यक्तिसंबंधीचे लक्षण म्हणून सांगता येईल. शास्त्रीय विचार अथवा भाषा यांची प्रवृत्ती संक्षेपाकडे असते. पारिभाषिक शब्द बव्हंशी प्रतीकात्मक असतात, आणि काही व्याख्यात्मक असले तर संक्षिप्त असतात त्यामुळे अल्पाक्षरता सहजच निर्माण होते. शिवाय अल्पाक्षरतेची आणखी एका प्रकारे आवश्यकता असते. शास्त्रीय विषयांत विविध कल्पना व विचार लक्षात ठेवण्याची, तसेच लेखनात त्यांचा वारंवार वापर करण्याची गरज भासते. अशा प्रसंगी अल्पाक्षर परिभाषा फार उपयोगी पडते. आपल्याकडील पूर्वीच्या व्याकरणवेदांतादी शास्त्रांत विषय जसा सूत्रात्मक रीतीने मांडीत तशाच त्यातील पारिभाषिक संज्ञाही सुटसुटीत असत. 'लघ्वर्थंही संज्ञाकरणम्' म्हणजे संक्षेपाच्या हेतूनेच संज्ञा तयार करण्यात येतात, असे पतंजलीने यासंबंधात जे सांगितले आहे ते या अल्पाक्षरतेला अनुलक्षूनच.

६. **सातत्य**--शास्त्रीय वा तांत्रिक विषयांत अभिव्यक्तीची जी एक परंपरा निर्माण होत असते तिच्याशी दुवा कायम ठेवणे हाही परिभाषानिर्मितीच्या संबंधात एक महत्त्वाचा विचार असतो. दीर्घकाळ प्रयोगाने स्थिरावलेल्या आणि अर्थदृष्ट्या अपुऱ्या पण परंपरेने मान्य झालेल्या रूढ शब्दांचा स्वीकार करणे हे कधी कधी आवश्यक असते. याचा अर्थ सर्वच बऱ्यावाईट रूढ शब्दांना मान्यता देणे असा मात्र होत नाही. या लक्षणाचा स्वीकार करताना याच्याच जोडीने इतरही जी लक्षणे सांगितली आहेत त्यांचा विवेक करून मगच कोणता रूढ शब्द घ्यावा हे ठरवावे लागेल. शिवाय, यात खरे महत्त्व आहे ते परंपरेला. असा

[१] डॉ. श्री. व्यं. केतकर : ज्ञानकोश--खंड ५ (विज्ञानेतिहास), पृ. २०.

एखादा शब्द स्वीकारला नाही, तर पूर्वीचे संचित ज्ञान बाद ठरेल, किंवा दीर्घकाळची परंपरा खंडित होईल आणि नव्याजुन्याचा सांधा जोडता येणार नाही, असे असेल तरच तो रूढ प्रयोग नव्या व्यवस्थेत सामावून घेणे आवश्यक ठरेल.

एखादा पारिभाषिक शब्द नव्याने तयार करतानाही हा परंपरेच्या सातत्याचा मुद्दा लक्षात घेतला पाहिजे. आजच्या गरजांतून निर्माण झालेली व नवीन ज्ञानाशी संबंधित असलेली एखादी कल्पना आपल्या पूर्वीच्या सांस्कृतिक परंपरेत व्यक्त झालेली असेल तर त्या परंपरेशी दुवा जोडण्याच्या दृष्टीने नवीन शब्दाऐवजी त्या जुन्या शब्दाचे पुनरुज्जीवन करणे हे योग्यच ठरेल.

७. **संगती**—पुष्कळदा पारिभाषिक शब्दाचा केवळ सुट्या स्वरुपात विचार करता येत नाही. एखाद्या शब्दाचा स्पष्ट व निश्चित अर्थ ठरवताना सजातीय व समानार्थक शब्दांची व त्यांच्या अर्थांची निश्चिती करावी लागते. कधी कधी शब्दांची एक परंपरा वा कुल असते. पारिभाषिक संज्ञांचे असे कुल निश्चित करताना भिन्न भिन्न अर्थच्छटा नेटकेपणे दाखवाव्या लागतात. अशा वेळी त्यांच्यात संगती राखणे आवश्यक ठरते. कधी कधी जोड स्वरुपाच्या पारिभाषिक शब्दातील एखादी अंशसंज्ञा दुसऱ्या शब्दाशी संलग्न झालेली असते. अशा दोन शब्दांतल्या समान अर्थाच्या अंशसंज्ञा वेगळ्या व विसंगत असल्यास अर्थनिश्चितीस बाधा पोचेल. शब्दांची रूपे ठरवताना कधी एखाद्या विवक्षित प्रक्रियेचा अवलंब करावा लागतो. समान अर्थाबाबत अशा प्रक्रियेत संगती राखली नाही तर तेही अर्थहानिकारक होईल.

८. **शब्दसौष्ठव**—शास्त्रीय स्वरुपाच्या पारिभाषिक संज्ञांच्या संबंधात हा विचार साहित्याइतका महत्त्वाचा नसला तरी हे शब्द नित्य लिहिले वाचले जाणार असल्याने ते उच्चार-सुलभ असावे. त्यात सौष्ठव, माधुर्य, श्रवणसुभगता ही आणता आली नाही तरी ते कठोर, खडबडीत, कर्णकट नसावेत.

९. **अर्थवत्ता**---विवक्षित आशय व्यक्त करताना कधी कधी एकाहून अधिक पर्याय सुचू शकतात. अशा वेळी ते पर्याय सारखेच समर्पक असूनही त्यांपैकी एखादा शब्द अधिक प्रभावीपणे अर्थ व्यक्त करू शकतो. त्या शब्दाच्या ठिकाणी आशय व अभिव्यक्तीचा एक परिणामकारक लय, एक समतोल साधलेला असतो अशी अर्थवत्ता असलेला शब्द हा प्रचलनाच्या दृष्टीने अधिक योग्य असून चटकन रूढ होऊ शकतो.

## परिभाषा आणि सोपेपणा

परिभाषेची वरील लक्षणे ही तज्ज्ञसंमत असून परिभाषानिर्मितीचे कामी त्यांचा उपयोग व्हावा या उद्देशाने युनेस्कोने ती अपल्या प्रतिवेदनात समाविष्ट केली आहेत. शास्त्रीय परिभाषेसंबंधीची सविस्तर चर्चा टी. एच. सॅव्हरी या इंग्रजी ग्रंथकारानेही The Language of Science या आपल्या पुस्तकात केली आहे. विशेषत: अशी परिभाषा सोपी, सुबोध व सामान्य व्यवहारातल्या शब्दसंग्रहातीलच असावी, या वारंवार पुढे मांडण्यात येणाऱ्या मताचा परामर्ष घेऊन त्याने जे निष्कर्ष काढले आहेत, ते प्रस्तुत संदर्भात उपयुक्त ठरतील. हे निष्कर्ष असे :

"शास्त्रीय परिभाषेत Life, Force, Work, Power, Salt वगैरे सामान्य व्यवहारातील शब्दांचा प्रवेश झाला तो शास्त्रीय व तांत्रिक व्यवहार ज्याकाळी फारसा प्रगत झाला नव्हता अशा वेळी. परंतु इंग्रजीतील शास्त्रीय विषयांवरील वाङ्मयाची पुनर्रचना करणे यदाकदाचित शक्य झाले, तर या सामान्य शब्दांच्या जागी बहुधा वेगळे शब्द वापरण्यात येतील.

"यासंबंधी एक व्यावहारिक दृष्टांत देता येण्यासारखा आहे. पुष्कळसे लोक आपल्या सायकलीसारख्या वाहनांची साफसफाई करण्यासाठी जुने टूथब्रश वापरतात. म्हणून सायकली दुरुस्त करण्याच्या अवजारांत टूथब्रशचा आपण हमखास समावेश

करतो असे नाही. शास्त्रीय वाङ्मयात रूढ असलेल्या सामान्य शब्दांबाबत हीच गोष्ट लागू आहे.

"वाङ्मयीन भाषेत सोप्या व सुटसुटीत शब्दांचा वापर होतो तसाच तो शास्त्रीय भाषेतही करण्यात यावा, असा आग्रह धरणे योग्य होणार नाही. कारण, शास्त्रीय क्षेत्रात ही गोष्ट बहुधा कोणालाच साध्य होणार नाही. असे सोपे, सरळ शब्द अन्वर्थक व स्पष्ट असतातच असे नाही आणि अन्वर्थकता व स्पष्टार्थता या तर शास्त्रीय भाषेच्या प्राथमिक गरजा होत.

"दुसरी गोष्ट, सामान्य शब्दांहून भिन्न शब्दांचा शास्त्रीय विषयांसाठी उपयोग केल्यामुळे सामान्य व पारिभाषिक शब्दांचे क्षेत्र अनायासे परस्परवर्जित होते व त्यांचे वेगळेपण टिकून राहते.

"तिसरी गोष्ट, हे शब्द अपरिचित असल्यामुळे इतर क्षेत्रांतील शब्दांच्या साहचर्यामुळे त्यांचा अर्थ बदलत नाही. या शब्दांच्या अर्थाला स्थिरता प्राप्त होते. म्हणूनच शास्त्रीय स्वरुपाच्या इंग्रजी भाषेत ग्रीक, लॅटीन शब्दांचा जो भरपूर वापर आहे त्याबद्दल इंग्रजी भाषिकांनी कृतज्ञ राहिले पाहिजे."[१]

स्पष्टार्थता म्हणून ज्या लक्षणाचा युनेस्कोप्रणीत यादीत उल्लेख आहे तो विवक्षित क्षेत्रातील व्यक्तींना पारिभाषिक शब्दातली कल्पना स्पष्ट व्हावी एवढ्यापुरताच मर्यादित आहे. सामान्य व्यवहारातले शब्द वापरल्यामुळे परिभाषा स्पष्टार्थक न होता प्रसंगी ती गोंधळात पाडणारी होईल. उलट, शास्त्रीय-तांत्रिक क्षेत्रांत वावरणाऱ्या व्यक्तींना सामान्य लोकांच्या दृष्टीने दुर्बोध वाटणारा शब्द हाच सोपा वाटेल. सोपेपणाची कल्पना ही सरतेशेवटी सापेक्षच असते. परिस्थिती,

---

[१] भाषा (केंद्रीय हिन्दी निदेशालयाचे त्रैमासिक): वर्ष १—अंक २, पृष्ठ २५ व २६ वर आलेल्या हिंदी अनुवादाचे मराठी भाषांतर.

व्यवहारक्षेत्र व अभिप्रेत कल्पना यांवरच शब्दांचा सोपेपणा वा कठीणपणा, सुबोधता किंवा दुर्बोधता अवलंबून असतात. मुळातील कल्पना जर गुंतागुंतीची व कठीण असेल तर त्यासाठी सोपा शब्द वापरता येणार नाही आणि वापरला तरी तो अन्वर्थक ठरणार नाही. तेव्हा तांत्रिक वा शास्त्रीय परिभाषेच्या बाबतीत (यात प्रशासनिक परिभाषाही आली) ज्यांच्यासाठी ती तयार करण्यात येणार आहे व जे ती वापरणार आहेत त्यांच्या दृष्टीनेच तिचा सोपेपणा ठरू शकतो. अर्थात जेथे सोप्या शब्दांचा वापर करूनही अन्वर्थकता राखता येते तेथे ती मुद्दाम कठीण वा दुर्बोध करणे केव्हाही योग्य होणार नाही. पण सोपे शब्द म्हणजे सामान्य व्यवहारातलेच शब्द, असे समीकरण शास्त्रीय विषयांबाबत बरोबर ठरू शकेल असे नाही. नित्य वापरातला व रूढ नसणारा एखादा नव्याने तयार करण्यात आलेला शब्द सुबोध, सहज कळणारा असू शकतो. रूढता म्हणजेच केवळ सोपेपणा असे निदान शास्त्रीय विषयांबाबत म्हणता येणार नाही. अशा अर्थीही सोपेपणा ठेवता आला तर अवश्य ठेवावा. पण या सुबोधपणाचा क्रम पारिभाषिक शब्दांच्या लक्षणांबाबत लावायचा तर तो शेवटी लागेल. असे शब्द 'सुबोध, सुटसुटीत व समर्पक' असावेत असे म्हणण्यात येते. पण परिभाषेच्या वास्तविक लक्षणांनुसार आधी समर्पक, नंतर सुटसुटीत व शेवटी सुबोध असाच त्याबाबत क्रम लावावा लागेल.

**भाषा, परिभाषा आणि सामान्य जनता**

शास्त्र, तंत्रज्ञान व विज्ञान किंवा राज्यकारभार यांसारख्या विषयांशी विशिष्ट वर्गाचाच संबंध येत असला अथवा सामान्य व्यवहाराहून त्यांचे क्षेत्र निराळे पडत असले तरी सामान्य जनतेशी या विषयांची संपूर्ण फारकत झालेली असते, असा याचा अर्थ नव्हे. सोयीनुसार वेगवेगळ्या विभागांत वाटणी झाली असली तरी ही सर्व एका व्यापक मानवी जीवनाची अंगे होत. या दृष्टीनेच समाजातील सामान्य माणसाचा

या सर्व गोष्टींशी कमीजास्त प्रमाणात संबंध येतो. लोकशाही समाज-घटनेनुसार व स्वातंत्र्योत्तर सामूहिक प्रगतीच्या धोरणानुसार तर हा संबंध दिवसेंदिवस अधिक वाढत जाणार. त्यामुळे या वेगवेगळ्या क्षेत्रांतील व व्यवहारांतील विषय सामान्य माणसाला समजणे आवश्यक ठरणार आहे. सामान्य माणसाच्या भाषेद्वारेच हे सर्व विषय त्याला समजले पाहिजेत, असे प्रतिपादन यासंबंधात करण्यात येते. येथे प्रश्न असा निर्माण होतो की, सामान्य माणसाची मर्यादित व्यवहाराची भाषा हे सर्व अनेकविध विषय सामावून घेऊ शकते काय? इतर प्रगत देशांतील स्थिती पाहता त्यांच्या भाषांचा आवाका वाढला आहे. वरील नाना तऱ्हेच्या विषयांतील विशेष शब्द सामान्य माणसाच्या भाषेपर्यंत जाऊन पोहोचले आहेत. पण हे शक्य झाले आहे ते तेथील सामान्य माणसाचा बौद्धिक आवाका वाढला, त्याची सांस्कृतिक पातळी उंचावली म्हणून त्या देशांतील शास्त्रीय-तांत्रिक स्वरूपाची भाषा सामान्य माणसाच्या पातळीपर्यंत आली असे तेथे घडले नसून भाषेच्या विकसित पातळीपर्यंत सामान्य माणूस पोचला. भारतातही साक्षरता, शिक्षणप्रसार या मार्गे सामान्य माणसाचा वरील अनेकविध विषयांशी येणारा संबंध वाढला की त्याची आजची भाषा आहे त्याच जागी राहणार नाही. सामान्य भाषेहून वेगळी झालेली परिभाषा ही आज विशिष्ट क्षेत्रांतील विशिष्ट लोकांसाठीच आहे, तशी ती राहणार नाही. ती सामान्य माणसाच्या भाषेत बरीचशी सामावू शकेल. सामान्य माणसाची भाषा, ही परिभाषा आत्मसात करीत नाही असे नाही. माया, ब्रह्म, सगुण, निर्गुण, प्रारब्ध, संचित ही अध्यात्मातील परिभाषा व इंधन, उदक इत्यादी लौकिक व्यवहारातील शब्द शतकानुशतके खेड्यांपाड्यांतील निरक्षर जनतेत रुळल्याचे आपण पाहतो. समाजाच्या भौतिक संस्कृतीचा विकास झाला, ती सामान्य माणसापर्यंत पोचली की सामान्य माणसाची भाषा शास्त्रीय व तांत्रिक विषयांची परिभाषा जशीच्या तशीच स्वीका-रील. आज भारताची संस्कृती अनेक अंगांनी प्रगत होत असता भारतीय भाषांची वाढ रोखून धरणे इष्ट होणार नाही. भाषेची पातळी

खाली आणून ती सोपी करायची, की तिला एका विकसित स्तरावर पोचवायचे, याचा निर्णय घेणे फारसे कठीण असू नये.

या संदर्भात बोरिस क्ल्युएव या रशियन लेखकाने रशियातील याच समस्येबद्दल प्रकट केलेले विचार उद्बोधक ठरतील. कोणते शब्द परिभाषेत स्वीकारावेत किंवा स्वीकारू नयेत, याची सामान्य जनतेने विचिकित्सा करण्याची परिस्थिती आज रशियात अस्तित्त्वात असून, विज्ञान ही सामान्य माणसाच्या आवाक्यातली गोष्ट झाल्यानंतरच हे शक्य झाले आहे. तेथे आइन्स्टीनच्या सापेक्षतावादावरील पुस्तकाच्या सामान्य जनतेसाठी प्रकाशित झालेल्या आवृत्तीच्या एका दिवसात एक लक्ष प्रती खपल्या. वरील लेखकाच्या मते, " भाषा सोपी की कठीण, हे ठरते तें सामान्य जनतेच्या पातळीनुसार. प्रश्न आहे तो भाषेला अर्धशिक्षितांच्या, अशिक्षितांच्या पातळीपर्यंत आणून ती सोपी करण्यात यावी, वा साक्षरतेचा स्तरच इतका वाढवावा की सामान्य जनता सामाजिक संबंध, विज्ञान आणि तंत्र यांच्यातील सूक्ष्म गोष्टी सहज समजू शकेल. रशियात साक्षर-तेची पातळी उंचावून हे साध्य करण्यात आले आहे. ' सिन्कोफेसोट्रोन ', ' सायबरनेटिक्स ' हे शब्द रशियातला सामान्य मजूर व शेतकरीही समजू शकतो. " [१]

**परिभाषेचा प्रश्न**

परिभाषेच्या बाबतीत सामान्य माणसाला समजतील अशा सोप्या व रूढ शब्दांचाच केवळ आग्रह धरता येत नाही, हे वर पाहिले. भाषा सामान्य व्यवहारभाषेच्या स्तरावरच राहिली, परिभाषेच्या बाबतीत तिच्या प्रयोगशीलतेला व स्वतंत्र विकासाला वाव मिळाला नाही, तर तिची अभिव्यक्तिक्षमता वाढणार नाही. भाषा सर्वप्रकारे समृद्ध व्हायची असेल आणि तिचा समतोल विकास घडून यायचा असेल, तर केवळ व्यावहारिक व कलासाहित्यादी अंगांनी ती परिपुष्ट होणे

---

[१] बोरिस क्ल्युएव : धर्मयुग, २१ एप्रिल १९६३, पृ. ७ व १८.

पुरेसे ठरणार नाही; ज्ञानविज्ञानाच्या व तंत्रव्यवसायादिकांच्या गरजाही तिला भागवता आल्या पाहिजेत. "ज्ञानगंगेचा प्रवाह अखंड चालू ठेवण्याची आणि समाजजीवन प्रगमनशील बनविण्याची कामगिरी" भाषेला योग्य प्रकारे पार पाडता यावी म्हणून शास्त्रीय, तांत्रिक व अन्य क्षेत्रांत परिभाषेच्या रूपाने 'नवे संकेत, नवे प्रयोग व नवे संदर्भ' शोधून काढावे लागतील. समाजभाषेतील साचेबंद अभिव्यक्तीवर व ठराविक शब्दसंग्रहावर तिला विसंबून राहता येणार नाही. जगातील सर्वच प्रगत भाषांनी परिभाषेच्या रूपाने आपल्या शब्दभांडारात अमाप भर टाकली आहे. राजकीय बाबतीत सत्तास्पर्धेतून निर्माण होणारा निर्घृण वैरभाव असेल, सामाजिक बाबतीत वंशवर्चस्वाच्या पोटी जन्म घेणारा ओंगळवाणा भेदाभेद असू शकेल, पण ज्ञानविज्ञानाच्या क्षेत्रात सारा मानवसमाज एक आहे. हे ऐक्य वाढीस लावण्याचे साधन भाषा होत. जगातील निरनिराळ्या भाषांनी या कामी सहकार्य केले आहे; आपले ज्ञानभांडार एकमेकींसाठी खुले केले आहे. ही देवाण-घेवाण शक्य व्हावी म्हणून सर्वच भाषांना बरोबरीने वाटचाल करावी लागेल व त्यासाठी ज्या भाषा मागे पडल्या आहेत त्यांना त्वरेने प्रगती करून घ्यावी लागेल. शास्त्र, विज्ञान, तंत्रज्ञान या सर्व क्षेत्रांतील सामाईक धन आत्मसात करण्यासाठी त्यांना आपले शब्दभांडार वाढवावे लागेल; अनेकविध विषयांतील परिभाषा नव्याने तयार करावी लागेल.

परिभाषा ही भाषेला पडणारी भरच असल्याने परिभाषाविकास म्हणजे एकापरी भाषेचा विकासच होय. भाषेचा नैसर्गिक विकास ज्या क्रमाने होतो, म्हणजे तिच्या सामान्य शब्दसंग्रहाची वाढ, आधी व्यवहार व मग त्यासाठी शब्द अशी सावकाश वापरातून बदलत, स्थिरावत जशी होत असते तसाच परिभाषेचा विकास व्हावा असा एक दृष्टिकोन आहे. "नित्याच्या व्यवहाराची भाषा शब्दाकरिता कधी अडून बसत नसते, वेळेच्या दडपणाखाली जो शब्द सुचेल तो घेऊन ती व्यवहार चालू ठेवते. यातूनच हळूहळू परिभाषा निर्माण होत असते. .......... कोश पुढे ठेवून वाङ्मय निर्माण करण्याचा प्रयत्न झाला तर ते वाङ्मय

रूक्ष व बोजड झाल्याशिवाय राहणार नाही. समर्पक शब्द सुचतात ते विवेचनाच्या ओघात सुचतात." [१] या मतानुसार निरनिराळ्या विषयांवरील ग्रंथनिर्मिती झाल्यानंतर त्यातून हळूहळू परिभाषा तयार व्हावी. त्यासाठी वेगळी घडपड करण्याची आवश्यकता नाही.

सामान्य दृष्टचा ही विचारसरणी बरोबर असली तरी गरज आणि अनुभव या गोष्टीही ध्यानात घेतल्या पाहिजेत. त्याबरोबरच सामान्य भाषेच्या व परिभाषेच्या स्वरुपात असलेला फरकही लक्षात बागवला पाहिजे. परिभाषानिर्मितीची प्रक्रिया व परंपरा या वेगळ्या असू शकतात आणि आहेत. शास्त्रीय भाषेत सामान्य लोकांच्या वापरातून व व्यवहारातून काही शब्द आले आहेत. 'ऑक्सिजन' सारखी चुकीचा अर्थ व्यक्त करणारी परिभाषा रूढही झाली आहे. पण म्हणून ही प्रक्रिया सर्वमान्य ठरली नाही. विशिष्ट काळी प्रचारात असलेली परिभाषा बदलून शास्त्रशुद्ध पायावर लेव्हॉजिए, फॅरॅडे आणि लिनिअस यांनी तयार केलेली अनुक्रमे रसायनशास्त्र, पदार्थविज्ञानशास्त्र आणि जीवशास्त्र यांतील परिभाषा नव्याने रूढ झाली. याचा अर्थ असा की, भाषाविकासाचा नैसर्गिक क्रम शास्त्रीय परिभाषेबाबत लागू होतोच असे नाही. कोशाच्या पद्धतीवर नियोजित धोरणानुसार शास्त्रीय परिभाषा तयार होऊन ती वापरात येऊ शकते. लिनिअसने आपल्या System Nature या ग्रंथात 'द्विनाम पद्धती' चा अवलंब करून प्राणिशास्त्र व वनस्पतिशास्त्र यांची परिभाषा संपूर्णतः नव्याने तयार केली. तसेच लेव्हॉजिए यानेही आपल्या सहकारी शास्त्रज्ञांच्या मदतीने रसायनशास्त्रातील परिभाषेची पुनर्रचना करून ती प्रचारात आणली. शास्त्रीय व तत्सदृश अन्य विषयांबाबत तरी कोशांद्वारे शब्द भाषेत येऊ शकतात, हे दिसून येईल.

कधी कधी विशिष्ट परिस्थितीनुसार गरज म्हणून शब्द भाषेतून कोशात येण्याऐवजी ते कोशातून भाषेत येऊ शकतात. या शतकाच्या सुरुवाती-

---

[१] द. के. केळकर : विचारतरंग, पृ. १०२–१०३.

नंतर जपान, रशिया यांसारखे देश नव्या उमेदीने प्रगतीच्या मार्गावर पुढे सरसावले. इतर विज्ञानसंपन्न राष्ट्रांच्या बरोबरीने त्यांनी आपला भौतिक उत्कर्ष करून घेतला. इंग्रजी, फ्रेंच, जर्मन या प्रगत भाषांतील सारे ज्ञानभांडार त्यांनी आपल्या भाषांत आणले व त्यांचा पारिभाषिक व अन्य शब्दसंग्रह थोड्याच अवधीत लक्षावधी शब्दांनी वाढवला. त्यानंतरही जी जी म्हणून राष्ट्रे स्वतंत्र झाली त्या सर्वांनी याच गरजेतून आपापल्या अप्रगत भाषांत अनेक विषयांवरील कोश निर्माण करून अशीच पारिभाषिक शब्दांची भर घातली. निरनिराळ्या राष्ट्रांतील यासंबंधीच्या प्रयत्नांची सविस्तर माहिती यापूर्वी एका प्रकरणात सांगितलीच आहे.

एखाद्या राष्ट्रात शिक्षणाला अथवा संस्कृतीला नवीन वळण मिळते, अथवा शास्त्रीय वा तांत्रिक वाङ्मयाची वाढ करण्याची गरज भासते अशा वेळी या क्षेत्रात मागासलेल्या भाषांना आपला सामान्य आणि पारिभाषिक शब्दसंग्रह पद्धतशीर योजना आखून वाढवणे आवश्यक होते असे शिक्षणातील देशी भाषांच्या उपयोगासंबंधीच्या युनेस्कोच्या अहवालात स्पष्टपणे सांगितले आहे.[१] या भाषाविकासाच्या योजना कशा व कोणत्या पद्धतीने आखण्यात याव्यात, याबाबत सदर अहवालात, मार्गदर्शन केले असून त्यासाठी कायम कोशमंडळ स्थापन करण्याची शिफारस करण्यात आली आहे आणि त्या त्या विषयांतील तज्ज्ञांनी परिभाषानिर्मितीचे कामी परस्परांशी व मंडळांशी सहकार्य करावे, असे सुचवले आहे. वर उल्लेखिलेल्या बहुतेक सर्व राष्ट्रांनी याच पद्धतीने तज्ज्ञांची कोशमंडळे स्थापन करून व त्यांच्याकरवी निरनिराळ्या विषयांवरील कोश तयार करवून आपापल्या भाषेचा व तिच्यातील परिभाषेचा विकास करून घेतला आहे. भारतातही केंद्र सरकार याच पद्धतीने शास्त्रीय व तांत्रिक परिभाषामंडळाद्वारे निरनिराळ्या विषयांवरील पारिभाषिक शब्दसंग्रह तयार करून घेत

[१] "However, in the event of new departures in education and culture ......or the attempt to develop scientific and technical literature and training in a Language which has previously been little used in this way, then the need arises for conscious planning of vocabulary development."
—*UNESCO's Report on the Use of Vernacular Languages in Education, 1953*, p. 65.

असल्याचा मागे एकदा उल्लेख आलेलाच आहे. पारिभाषिक वा अन्य शब्दसंग्रह व्यापक प्रमाणावर वाढवण्याची गरज असताना त्यासाठी तज्ज्ञांच्या साह्याने कोशादी ग्रंथ तयार करण्याचा मार्ग हा आज सर्वमान्य व व्यवहार्य ठरला आहे. हा उपाय अनैसर्गिक, अशास्त्रीय वा भाषेच्या मूळ स्वभावाविरुद्ध आहे, असे आता मानण्यात येत नाही.

केवळ पारिभाषिक शद्वनिर्मितीसाठीच हा मार्ग चोखळण्यात येतो असे नव्हे तर एखाद्या व्यवहारोपयोगी बोलण्यालिहिण्याच्या भाषेचा सांस्कृतिक माध्यम म्हणून स्तर वाढवायचा असेल, अशा वेळीही भाषेतील शब्दसंग्रह 'अनैसर्गिक' ठरविण्यात आलेल्या वरील पद्धतीने समृद्ध होऊ शकतो, याचा दाखला युनेस्कोच्या वर उल्लेखिलेल्या अहवालातच मिळतो. युरोपातील हंगेरीयन व फिनिश भाषा ही याची उदाहरणे होत. शब्दनिर्मितीच्या निरनिराळ्या प्रक्रियांचा अवलंब करून आणि आरंभी कृत्रिम वाटणारे हजारो नवे शब्द तयार करून या भाषांनी आपला दर्जा सुधारला. एकेकाळी मागासलेल्या या भाषांची पातळी इतकी उंचावली की, जगातील कोणत्याही उन्नत भाषेतील विचार नेमकेपणाने व परिणामकारक रीतीने व्यक्त करणे आज त्यांना सहज शक्य झाले आहे. तज्ज्ञांनी व भाषापंडितांनी परस्पर सहकार्याने सुमारे १२,००० नवीन शब्दांची हंगेरीयन भाषेत भर घातली. मान्य भाषाशास्त्रीय परंपरेशी हा प्रयोग जुळत नसतानाही वरील सर्व शब्द त्या भाषेत रूढ झाले! आज हंगेरीयन लोकांच्या लिहिण्याबोलण्याचा कुठलाही भाग घेतला तर त्यात या नवीन शब्दांचे प्रमाण अदमासे ३०–४० टक्के इतके आढळेल.[1] इस्त्राएल या राष्ट्राने जुन्या हिब्रू भाषेचे रूप पालटून व्यवहारभाषा म्हणून तिचा कसा उपयोग केला, हे यापूर्वी सांगितलेच आहे.

वैज्ञानिक व सांस्कृतिक क्षेत्रांतच नव्हे, तर राजकीय, शासकीय, व्यावसायिक व अन्य सर्व क्षेत्रांत व्यवहाराच्या कक्षा सतत वाढत आहेत. जगातील राष्ट्रांचा एकमेकांशी निकट संबंध येत आहे आणि या गतिमान व्यवहारानुसार भाषांच्याही गरजा आज वाढत आहेत. या दृष्टीने

[1] *The Use of Vernacular Languages in Education* (*UNESCO—1953*) : p. 136.

प्रगत-अप्रगत सर्वच भाषांना आपल्या विकासाबाबत भाषाशास्त्रीय संकेत सांभाळता येतील असे नाही. प्रयोगामुळे व वापरामुळे शब्दांना स्थिरता येते, हा भाषाशास्त्राचा सिद्धांत खराच आहे. पण एखाद्या वेळी शब्दांची, परिभाषेची निकट अशी असते की या प्रयोगाला अवसरच मिळत नाही. युनोच्या सॅन्फ्रान्सिस्को येथील राजकीय परिषदेच्या वेळची गोष्ट. चिनी सदस्यांचे काम अडू नये म्हणून एकटया त्या परिषदेच्या वेळीच त्यांच्या भाषेत हजारावर नवीन शब्दचिन्हे तयार करावी लागली. अवाढव्य मानवी व्यवहाराला शब्दांचे चलन पुरवणारी भाषा ही एक टाकसाळ आहे. कधी भाषाशास्त्राच्या परंपरा सांभाळून, तर कधी त्या टाळून सर्व प्रकारांनी, सर्व तऱ्हांनी नवीन निर्मितीचे कार्य तेथे अखंड चालू असते.[१]

### परिभाषा विकासाच्या पद्धती व साधने

भाषेच्या विशिष्ट गरजांनुसार परिभाषेची होणारी वाढ कोणत्या पद्धतीने करावी व केली जाते, याचाही या संबंधात विचार करणे जरूर आहे. परिभाषा ही भाषेपासून वेगळी नाही. भाषेचा शास्त्रीय स्वरूपाचा उपयोग म्हणजे परिभाषा. तेव्हा सामान्य भाषेचा ज्या पद्धतीने विकास होतो त्याच पद्धतीचा अवलंब करून परिभाषाही वाढवली जाते. नव्याने प्रचलित झालेले शब्द जसे कोशात अंतर्भूत होतात, तसेच नव्याने घडवलेले शब्दही कोशातून भाषेत येतात. फरक असलाच तर तो केवळ या प्रकारात असलेल्या प्रयत्नपूर्वकतेचा, योजनाबद्धतेचा आहे. परिभाषा-निर्मितीचा प्रयत्न संघटितपणे, सहकार्याने केलेला असतो. वैयक्तिक-रीत्या सुचवलेल्या सुटया शब्दांनाही मागाहून त्या त्या क्षेत्रातील तज्ज्ञांच्या चर्चेची, मान्यतेची गरज असते. तज्ज्ञांच्या सहकार्याने योजनापूर्वक तयार होणाऱ्या परिभाषेत ही चर्चा आधीच संघटितपणे झालेली असते. ती अनेकांच्या विचारांचा परिपाक असते. वैयक्तिकरीत्या ग्रंथांतून वा वृत्त-

[१] "The Language mint is more than a mint ; it is a great manufacturing centre, where all sorts of productive activities go on unceasingly."

—Mario Pei : *The Story of Language*, p. 162.

पत्रातून सुचवलेल्या शब्दांत विचाराचे एखादे सूत्र, संदर्भाचा एखादा दुवा, अर्थाची एखादी छटा दुर्लक्षिली जाऊ शकते. तज्ज्ञांनी केलेल्या एकत्रित विचारात ही शक्यता कमी असते व त्यामुळे अशा प्रकारे तयार करण्यात आलेली परिभाषा परिपूर्णतेच्या अधिक जवळ पोचू शकते. दोन्ही प्रकारे तयार होणारी परिभाषा ही सरतेशेवटी वापराच्या कसोटीवरच पारखली जाणार असते; आणि प्रकार हा असो की तो, तिला डॉ. एरेन्बर्ग यांनी म्हटल्याप्रमाणे, "The terms are born (or Stillborn), grow, flourish, degenerate and die" या अटळ नियतिक्रमातून जावे लागते.

सामान्य शब्द काय किंवा पारिभाषिक शब्द काय, कोणत्याही शब्दाच्या जन्माची तऱ्हा एकच असते. भाषाशास्त्रज्ञांच्या मते भाषेत एखाद्या नव्या शब्दाची भर पडते ती (१) एखादा अगदी नवा शब्द तयार करून, (२) आधीच्याच एखाद्या शब्दावरून शब्दसिद्धीच्या नेहमीच्या प्रक्रियेने दुसरा शब्द निर्माण करून, (३) दुसऱ्या एखाद्या भाषेतून शब्द उसनवार घेऊन किंवा (४) अस्तित्वात असलेल्या शब्दाला वेगळा अर्थ देऊन[1] 'चेम्बर्स टेक्निकल डिक्शनरी' मध्ये पारिभाषिक शब्दांची जी व्याख्या दिली आहे तिच्यानुसार हे शब्द विशिष्ट विषयातील तज्ज्ञ अथवा तंत्रज्ञ (१) नव्याने तयार करतात, (२) दुसऱ्या भाषेतून घेतात वा अन्य विषयांतील अथवा क्षेत्रांतील परिभाषेतून ग्रहण करतात, किंवा (३) दुसऱ्या भाषेतील शब्द त्यातील कल्पनेसहित आपल्या भाषेशी जुळता करून घेतात.[2] परिभाषानिर्मितीच्या या पद्धती भारत सरकारने नेमलेल्या भाषा आयोगानेही आपल्या परिभाषाविषयक शिफारशींत अंतर्भूत केल्या आहेत. नवा शब्द भाषेत

---

[1] "Four methods are at the speaker's disposal when a gap in the vocabulary has to be filled. He can either create a word from a scratch, or resort to one of the usual processes of word formation, or borrow a term from some other language, or change the meaning of some existing word."

—Stephen Ullman : *Words and Their, Use*, p. 57.

[2] "Technical terms are in fact symbols adopted, adapted or invented by specialists and technicians to facilitate the precise recording of ideas"—*Chamber's Technical Dictionary*.

येण्याच्या ज्या चार स्वाभाविक पद्धती भाषाशास्त्रज्ञांनी सांगितल्या आहेत त्यांच्याहून या पद्धती वेगळ्या नाहीत, हे वरवर पाहिले तरी दिसून येईल.

१. पारिभाषिक शब्दनिर्मितीची पहिली पद्धत शब्द नव्याने तयार करण्याची होय. एखादा अगदी नवीन शब्द निर्माण करणे अथवा आधी-च्याच एखाद्या शब्दावरून शब्दसिद्धीच्या नित्याच्या प्रक्रियेने दुसरा शब्द तयार करणे या दोन्ही प्रकारांचा यात समावेश होतो. यापैकी पहिल्या प्रकाराने पारिभाषिक वा सामान्य कोणतेही शब्द तयार करण्याची आज क्वचितच गरज पडते. भाषेचा मूळ शब्दसंग्रह अशा शब्दांचा तयार झालेला असतो. सामान्यत: ज्याचा कोणताही भाग कोणत्याही अर्थाने भाषेत सापडत नाही असा अगदी नवा शब्द तयार करण्याची आज भाषेत प्रवृत्ती नाही. या पद्धतीचा आढळ होत असलाच तर तो क्वचित शास्त्रीय परिभाषेच्या क्षेत्रात होतो. ' गॅस ' हा शब्द या पद्धतीचे उदाहरण होय. १७ व्या शतकातील डच शास्त्रज्ञ फॉन हेल्मॉंट याला हा शब्द उहजगत्या सुचला व तोच सर्वत्र रूढ झाला.

भाषेतील एखाद्या मूळ शब्दावरून म्हणजेच नाम अथवा धातू यापासून प्रत्ययोपसर्गादिकांच्या साह्याने साधित शब्द बनविणे हा प्रकार देखील नवशब्दनिर्मितीच्या पद्धतीत जमा होईल. सामासिक शब्द हे देखील याच प्रकारचे शब्द होत. नवीन शब्द तयार करण्याचा हा प्रकार सामान्य भाषेतल्याप्रमाणेच परिभाषेतही अतिशय सोयीचा व प्रचारातला आहे. विचारकल्पनांचे अनेक प्रकार व भेद, शब्दांच्या वेगवेगळ्या अर्थच्छटा, सजातीय शब्द व शब्दकुलें इत्यादी परिभाषेशी संबंधित विशेषार्थदर्शक अभिव्यक्तीसाठी या प्रकाराचा उपयोग सर्वच भाषांत मोठ्या प्रमाणावर करण्यात येतो. ही व्याकरणाश्रयी पद्धत असून ज्या त्या भाषेने आपल्या मूळ प्रकृतीशी जुळेल अशा प्रकारे या पद्धतीचा वापर करणे योग्य ठरेल. मराठीच्याबाबत तत्सम व तद्भव दोन्ही प्रकारच्या शब्दां-साठी तिचा उपयोग करता येईल. या पद्धतीची मराठीतील

काही उदाहरणे पुढीलप्रमाणे सांगता येतील :—(१) धातू अथवा नाम यांना प्रत्यय वा उपसर्ग जोडून तयार झालेली रूपे—अधिग्रहण, शास्ती, अवमूल्यन, आदेशिका, वरभाव, नेणावळ. (२) सामासिक शब्द—सेवायोजन, शिक्षादेश, दंडहरण, कळयंत्र, सोडजमीन.

वरील पद्धतीशिवाय कधी कधी संशोधकाचे नाव एखाद्या कल्पनेला देणे, उदाहरणार्थ, रामन इफेक्ट, किंवा यदृच्छेने एखादा संकेत निर्माण करणे, उदाहरणार्थ, एक्सरे, अशा पद्धतीही अवलंबिल्या जातात. अशा पारिभाषिक शब्दांचा वरीलसारख्या नवनिर्मित शब्दांतच समावेश करावा लागेल. परिभाषा निर्मितीची ही तऱ्हा आजही संमत असून युनेस्कोच्या अहवालात अशी परिभाषा मान्य ठरविण्यात आली आहे.

२. भाषेत पारिभाषिक शब्दांची वाढ करण्याची दुसरी पद्धत, अन्य भाषेतील शब्द आहे तसाच स्वीकारायचा किंवा एखाद्या इतर विषयातील वा क्षेत्रातील पारिभाषिक शब्द विवक्षित संदर्भात लागू करायचा ही होय. यांपैकी परभाषेतले शब्द आहेत तसेच घेण्याची पद्धती ही भाषेच्या जिवंतपणाचे लक्षण मानण्यात येत असून शब्दसंग्रह वाढविण्याचा तो एक इतिहाससिद्ध मार्ग आहे. राजकीय प्रभाव, सांस्कृतिक संपर्क आणि अशाच इतर कारणांमुळे परभाषेतील अनेक शब्द एखादी भाषा आत्मसात करीत असते व हे शब्द शेवटी त्या भाषेत अभिन्नत्वाने सामावून जातात. कधी ते शब्द आपले मूळ रूप टिकवून ठेवतात, तर कधी अपभ्रष्ट स्वरूपात टिकाव धरून राहतात. आजच्या वाढत्या सांस्कृतिक संपर्कात व विज्ञान, तंत्र इत्यादिकांच्या एकरूप क्षेत्रात एका भाषेतून दुसऱ्या भाषेत असे उसनवार शब्द (Loan words) येत जात असतात. परिभाषेच्या बाबतीत हा ‘ शब्दग्रहणा ’ चा मार्ग विनासायास अवलंबता येण्यासारखा आहे व काही विशिष्ट बाबतींत तो स्वीकारणे योग्यही ठरणार आहे. परंतु हा मार्ग पत्करताना तारतम्य वापरणे जरूर असते. शब्द जसेच्या तसेच घेताना भाषेची

विकासशील निर्मिती अवरुद्ध होईल, तिच्यात परावलंबित्व निर्माण होईल अथवा तिचा समतोल ढळून ती विकृत होईल, अशा प्रकारे व इतक्या प्रमाणात ते घेण्यात येऊ नयेत. विज्ञानादी क्षेत्रांत आज सोयीच्या दृष्टीने थोड्याबहुत प्रमाणात एकरूप परिभाषा अस्तित्वात येत आहे. अशा एकरूप परिभाषेतील शब्द स्वीकारण्यास हरकत नाही. केंद्र सरकारने या विषयात आंतरराष्ट्रीय शब्दांचा एक वर्ग निश्चित केला असून असे शब्द आहेत तसेच स्वीकारण्याचे धोरण ठेवले आहे. वजने आणि मापे यांच्या मीटर, लिटर, कॅलरी वगैरे संज्ञा, संशोधकांच्या नावाशी संबंधित ॲम्पिअर, व्होल्ट, वॅट वगैरे शब्द, सर्वत्र प्रचलित रेडिओ, रडार इत्यादी साधनांची नावे यांचा आंतरराष्ट्रीय शब्दावलीत समावेश होतो व हे पारिभाषिक शब्द मराठी व अन्य भारतीय भाषांनी आपल्या शब्दसंग्रहात सामावून घेतले पाहिजेत.

उसनवार शब्दांचा एक गट असाही असतो की, त्यांपैकी काही शब्द भाषेने पूर्णत: आत्मसात केलेले असतात, तर काही विशिष्ट वर्गात वा क्षेत्रातच तेवढे प्रचलित असतात. या दुसऱ्या प्रकारच्या शब्दांसाठी पर्यायी ठरणारे शब्द भाषेत वापरात असतात किंवा तयार करता येऊ शकतात. वरील दोन प्रकारच्या शब्दांपैकी भाषेच्या प्रवाहाशी एकरूप झालेले शब्द कायम ठेवणेच इष्ट होईल. पण या प्रवाहात वरवर तरंगणारे दुसऱ्या प्रकारचे शब्द, ते केवळ प्रचलित आहेत म्हणून राहू देणे भाषेच्या प्रकृतीला व परिभाषेच्या एकरूप व्यवस्थेला विघातक ठरणारे असते. मराठीबाबत सांगायचे तर अपील, फी, इंजिन, पोलीस, गॅस वगैरे शब्द हे पहिल्या सदरात मोडतात. परंतु दुसऱ्या प्रकारात मोडणारे ऑफिस, ऑर्डर, फॉर्म, कलेक्टर, सुपरिंटेंडेंट, सेक्रेटरी असे काही इंग्रजी शब्द व राज्यकारभाराच्या भाषेत एक काळ प्रयुक्त होते असे पुष्कळसे फार्शी शब्द हे बदलून त्यांच्या जागी नवी परिभाषा आणणे श्रेयस्कर ठरेल. उसनवार

शब्दांसारखाच उसनवार भाषांतरित शब्दांचा (Loan Translations) एक वर्ग अधूनमधून भाषेत दिसून येतो. क्वचित असे शब्द अर्थवाहकही असतात. अशा वेळी ते राहू देणे अथवा त्या धर्तीवर नवीन शब्द तयार करणे वावगे होणार नाही ; परंतु हे शब्द ज्यावेळी त्यात अभिप्रेत असलेल्या कल्पनेचे वाचक नसतात त्यावेळी ते बदलणेच योग्य ठरेल. किंडरगार्टन हा शब्द याचे उदाहरण म्हणून सांगता येईल. जर्मन भाषेतील या शब्दाचा मूळ अर्थ 'मुलांचे उद्यान' असा असून मराठीत तो बराच कांळ 'बालोद्यान' असा रूढ होता. पण त्या ऐवजी आता 'शिशुविहार', 'बालकमंदिर' असे अधिक अर्थवाही शब्द प्रचलित झाले आहेत. White Paper—श्वेतपत्रिका, Blue Print—नीलपत्र असे या प्रकारचे आणखी काही शब्द उदाहरणादाखल सांगता येतील.

एका विषयातील वा क्षेत्रातील पारिभाषिक शब्द दुसऱ्या विषयात व क्षेत्रात वापरणे हाही 'शब्दग्रहण' चा एक प्रकार असतो. 'टर्म' हा इंग्रजी पारिभाषिक शब्द वेगवेगळ्या विषयांच्या वा क्षेत्रांच्या संदर्भात वेगवेगळ्या अर्थी वापरण्यात येतो. कायद्यात, शिक्षण-क्षेत्रात, तर्कशास्त्रात विषयानुरूप या शब्दाचे वेगवेगळे अर्थ आहेत. पण अशा रीतीने एकच शब्द अर्थ बदलून निरनिराळ्या विषयांसाठी वापरणे हे अर्थनिश्चितीच्या दृष्टीने घोटाळ्याचे असते. पारिभाषिक शब्दांत तरी या प्रवृत्तीला अवसर देणे योग्य ठरणार नाही. काही शब्द रूढ असतील तर त्यांचा पुनर्विचार करणे वावगे ठरू नये.

बोलभाषेतून अथवा कारागीर, शिल्पी व अन्य व्यावसायिकांच्या रूढ शब्दसंग्रहातून योग्य असे शब्द उचलणे हाही पारिभाषिक शब्दांबाबत 'शब्दग्रहणा' चा आणखी एक प्रकार होय. प्रसंगी हे शब्द अर्थवाहक असतात तेव्हा त्यांचा परिभाषेसाठी उपयोग करून घेता येतो. याशिवाय, परकीय शब्दांपेक्षा हे शब्द मळ भाषेला अधिक जवळ असतात व त्यामुळे भाषेची एकात्मता विघडतही

नाही. मराठीत रोकडवही, तारण, हडप, यारी, ओतकाम, वाहणावळ, कथीलगार, जोडारी वगैरे अनेक शब्द रूढ असून यांचा परिभाषेत समावेश करून घेता येईल.

उसनवारीच्या वरील पद्धतीनुसार परकीय भाषेतून आहेत त्याच स्वरूपात परिभाषा म्हणून शब्द घ्यायचे झाले, तर शास्त्रीय वा तांत्रिक दृष्ट्या अनिवार्यतेचा भाग असेल अथवा या क्षेत्रातील सोयीचा किंवा सार्वत्रिकतेचा विचार असेल तरच ते घेण्यात यावे. आंतरराष्ट्रीय परिभाषेचा असा एक भाग वेगळा काढण्यात आलेलाच आहे. त्याचप्रमाणे जेथे वस्तू व कल्पना दोन्ही अविच्छिन्नपणे परकीय आहेत व त्यांचा वाचक शब्द वैशिष्ट्यपूर्ण म्हणून इतर भाषांतही स्वीकारण्यात आला आहे असे 'स्पुटनिक' सारखे शब्द, किंवा जेथे मूळ कल्पना अथवा भाव आपल्या भाषेत संपूर्णतः व्यक्त होऊ शकत नाहीत असे काही शब्द (भारतीय तत्त्वज्ञानातील 'ब्रह्म', 'माया' वगैरे परिभाषा इंग्रजी भाषेत तशीच घेण्यात आली आहे) जसेच्या तसेच घेण्यात यावे. याव्यतिरिक्त इतर बाबतीत सामान्यतः परकीय परिभाषेसाठी ज्या त्या भाषेने शब्दसिद्धीसारख्या उपायांनी आपले स्वतंत्र पर्याय तयार करणे योग्य ठरेल. एखाद्या परकीय राष्ट्राच्या राजकीय वा सांस्कृतिक वर्चस्वाखाली असलेल्या प्रदेशाच्या भाषेवर त्या राष्ट्राच्या भाषेचा पगडा बसणे ही भाषेच्या इतिहासात नवीन गोष्ट नाही. अशा परिस्थितीत परकीय शब्द, सामान्य शब्दसंग्रहाचा देखील केवढा मोठा भाग व्यापतात, हे मराठीत रूढ होऊन बसलेल्या फार्शी, इंग्रजी शब्दांवरून निदर्शनास येते. परभाषेतील उसनवारीची एखाद्या राष्ट्रास वा समाजास सवय झाली म्हणजे भाषा अभिव्यक्तिक्षम असूनही परकीय शब्द घेण्याची प्रवृत्ती त्या समाजात वाढीस लागते, असे येस्पर्सनने म्हटले आहे.[१] परिभाषा म्हणून उसनवार शब्द घेताना ते या प्रवृत्तीतून घेतले जाणार नाहीत

[१] "When a nation has once got into the habit of borrowing words, people will very often use foreign words where it would have been perfectly possible to express their ideas by means of native speech material."
—Otto Jesperson : *Language, its Nature, Development and Origin*, p. 210.

अथवा टिकवून धरले जाणार नाहीत, याची मराठीला काळजी घेणे जरूर आहे.

३. परिभाषानिर्मितीची तिसरी पद्धती दुसऱ्या भाषेतील शब्द आपल्या भाषेशी जुळता करून घेण्याची होय. ही रूपप्रक्रिया व अर्थ-प्रक्रिया अशा दोन्ही प्रकारांत दृष्टीस पडते. यापूर्वी उसनवार शब्द घेण्याच्या ज्या पद्धतीचा उल्लेख केला आहे तिच्याशी जुळता पण काही अंशी वेगळा असा हा प्रकार आहे. उसनवार शब्द हे एकतर भाषेत पूर्णतः आत्मसात झालेले असतात, अथवा भाषेत समाविष्ट झालेले असतानाही त्यांपैकी काहींनी आपली वेगळी जात टिकवलेली असते. इंग्रजीतील 'पोलीस' किंवा फार्शीतील 'अंदाज' या शब्दांचे अर्थ नि रूपप्रक्रिया अशा दोन्ही दृष्टींनी पूर्ण मराठीकरण झाले आहे. 'पोलिसी पहारा' किंवा 'खर्च अंदाजणे' हे प्रयोग पाहता त्यांना मराठीच्या नामआख्यात व्यवस्थेत पूर्ण स्थान मिळाल्याचे दिसून येते. परंतु वापरात असलेले असे कित्येक परकीय शब्द आहेत की त्यांना मराठीची व्याकरणप्रक्रिया पूर्णतः सामावून घेऊ शकत नाही. परकीय शब्द स्वीकारताना तो सुरुवातीसच आपल्या भाषेच्या रूप-प्रक्रियेसहित आणणे हे या तिसऱ्या पद्धतीचे वैशिष्टच होय. 'अपेलेट' या शब्दाचा मराठीत पर्याय देताना 'अपिली' असे त्याचे जे रूप संविधानाच्या शब्दावलीत घेतले आहे ते या पद्धतीचे उदाहरण म्हणून सांगता येईल. 'कार्बनायझेशन' चे 'कार्बनीकरण' हे रूपही असेच सिद्ध होते. थोड्याफार प्रमाणावर ही प्रक्रिया उपयुक्त ठरली तरी फार मोठ्या संख्येत असे परकीय शब्द घेणे, ती दुसरी भाषा सजातीय वा संबंधी नसेल तर, भाषेच्या मूळ प्रकृतीस विघातक ठरते. अशा पद्धतीचा व्यापक प्रमाणावरील पारिभाषिक प्रयोग पूर्वी उस्मानिया विद्यापीठाने करून पाहिला होता.[1] त्यांनी तयार केलेले 'एस्कॉर्ट' साठी 'एस्कॉर्टणे', 'डिरेलमेंट' साठी 'डिरेलन' असे शब्द भारतीय भाषात खपणे कठीण आहे, हे

[1]*English Prefixes and Suffixes and Their Hindi Equivalents—Osmania University Publication.*

सांगायला नको. मूळ परकीय शब्दाशी ध्वनिसाम्य असलेला व अर्थाशीही संवादी असा 'इन्टेरिम' साठे 'अंतरिम' असा एखादा सुटसुटीत शब्द क्वचित या पद्धतीने तयार होऊ शकतो.

दुसऱ्या भाषेतील अथवा प्रसंगी आपल्याच भाषेतील शब्द, त्याचा अर्थ बदलून विवक्षित आशयाशी जुळता करून घेणे हीसुद्धा 'शब्दग्रहणा'ची पद्धत समजण्यास हरकत नाही. या संदर्भात ही प्रक्रिया वाटल्यास अर्थानुकूलनाची म्हणावी. भाषाशास्त्रानुसार शब्द-निर्मितीचा जो चौथा प्रकार सुरुवातीस सांगितला आहे तो वरील पद्धतीत बसणारा आहे. 'आयुक्त', 'निगम' वगैरे संस्कृत पारिभाषिक शब्दांच्या त्यावेळच्या आणि आजच्या अर्थकक्षा सर्वस्वी सारख्या नाहीत; पण थोड्याफार फरकाने त्यांचा अर्थ आजच्या कल्पनांशी जुळवून घेतला आहे तो वरील प्रक्रियेने. 'गॅझेट' या शब्दाच्या 'राजपत्र' या स्वीकृत पर्यायातही वरील पद्धतीचा अवलंब करण्यात आला आहे. शिवकालात तो शब्द 'फर्मान' या अर्थाचा वाचक होता.[१] त्याच्या मूळच्या अर्थात थोडा बदल करून आजच्या राज्य-व्यवहाराशी जुळणाऱ्या कल्पनेसाठी तो वापरण्यात आला व त्याचे रूपही 'राजपत्र' असे बदलून घेण्यात आले. 'कारवाई' हा शब्द सामान्य मराठी भाषाप्रयोगात एका विवक्षित अर्थी वापरला जात असताना तो 'प्रोसिडिंग' याचा समानार्थी पारिभाषिक शब्द म्हणून घेण्यात आला आहे, तीही अर्थानुकूलनाची प्रक्रियाच होय.

शास्त्रीय दृष्ट्या एखादी कल्पना निश्चित अर्थी व्यक्त करण्यास सामान्य शब्दसंग्रह बहुधा तोकडा पडतो. अशा वेळी त्यासाठी नेमका आशय व्यक्त न करणारा व अर्थभ्रांती निर्माण करणारा सामान्य रूढ शब्द राबवण्यापेक्षा वरील पद्धतीचा उपयोग करून पारिभाषिक निश्चितपणा भाषेत आणणे हा मार्ग अधिक बरा. या पद्धतीच्या

[१] "किताब : पदवी नाम फर्मानं राजपत्रकम्।"
—राज्य व्यवहारकोश, पृ. ३६.

मर्यादा लक्षात वागवून ती वापरण्यात आल्यास भाषेत परकीय उसनवार शब्दांची भरमसाट भर पडणार नाही.

पारिभाषिक शब्दसंग्रह वाढवण्यासाठी सामान्य भाषाविकासाशी जुळत्या अशा वरील पद्धतीच, विशिष्ट विषयानुरूप व व्यवहारक्षेत्र कोणते हे पाहून, कमीजास्त प्रमाणात उपयोगात आणण्यात येतात. युनेस्कोच्या देशी भाषांच्या उपयोगावरील व तांत्रिक भाषेच्या समस्येवरील अशा दोन्ही प्रतिवेदनांत या कामी सामान्यत: वरील पद्धतींचाच पुरस्कार केला आहे. यापैकी दुसऱ्या प्रतिवेदनात परिभाषानिर्मितीची चर्चा करताना ‘सायन्स’ या अमेरिकन नियतकालिकाचे संपादक डॉ. रोलर यांनी, परिभाषा म्हणून प्रगत अशा परकीय भाषांतून घेण्यात येणाऱ्या शब्दांवरोबर पूर्वीच्या ग्रीक, लॅटीन भाषांतील शब्दही घेण्यात यावे, असे सांगितले आहे. जुन्या ग्रीक भाषेतून घेतलेले पारिभाषिक शब्द शास्त्रीय क्षेत्रात कोणत्याही भाषेत अधिक मान्य ठरतात, असा निष्कर्ष त्यांनी काढला आहे. या मताचा मुद्दाम उल्लेख करण्याचे कारण असे की, भारतीय भाषांत परिभाषेच्या विकासासाठी अशाच रीतीने संस्कृत भाषेचा उपयोग करून घेता येईल, व ती परिभाषा भारतातील निरनिराळ्या भाषिक समाजांना मान्य होऊ शकेल. भारतीय भाषांतील पारिभाषिक शब्दांत आजही संस्कृतावर आधारलेल्या शब्दांचे प्रमाण बरेच आहे. भारतातील भाषांनी आपली परिभाषा तयार करताना संस्कृत भाषेचे अशा प्रकारे साह्य घ्यावे, असे डॉक्टर रंगनाथन् यांनी उपरिनिर्दिष्ट प्रतिवेदनात भारतातील शास्त्रीय व तांत्रिक परिभाषेसंबंधी आपले विचार प्रकट करताना स्पष्टच म्हटले आहे. परिभाषानिर्मितीसाठी प्रादेशिक भाषांतील शब्दसंग्रहाचा केव्हा व कोठे वापर करावा हे सांगताना त्यांनी अशा प्रकारच्या उपयोगाची पुढील क्षेत्रे निर्दिष्ट केली आहेत.

१. दैनंदिन जीवनातील सामान्य व्यवहार ;

२. शिल्प, कारागिरी व तत्सम इतर व्यवसाय ; आणि

३. सूक्ष्म व सखोल विचारांचा जेथे संबंध येत नाही असे विषय.[१] प्रादेशिक भाषांतील सामान्य शब्दसंग्रहाला अनुलक्षूनच त्यांनी वरील मत व्यक्त केले आहे. भारतातील निरनिराळ्या प्रादेशिक भाषांचा स्तर कोणता आहे आणि विकासाचा कोणता टप्पा त्यांनी गाठला आहे यावरच अर्थात त्यांच्या उपयोगाचे क्षेत्र अवलंबून राहील. परंतु त्यांना अन्य क्षेत्रांतील परिभाषेसाठी, विशेषत: शास्त्रीय, तांत्रिक व वरच्या पातळीवरील विषयांसाठी आपली अभिव्यक्तिक्षमता वाढवायची असल्यास ती कशी वाढवता येईल यासंबंधीचा वरील विचारातील दिशानिर्देश मराठी परिभाषेचा विकास करताना अवश्य लक्षात ठेवण्यासारखा आहे.

**मराठी परिभाषा : प्रयत्न व प्रवृत्ती**

गरज शास्त्रविज्ञानाची असो, की व्यापारव्यवसायाची वा शासनव्यवहाराची असो, त्यानिमित्त लागणारी तांत्रिक स्वरूपाची व विशिष्टार्थवाचक परिभाषा कशी असते व कशी घडवली जाते याची नीट कल्पना वरील सविस्तर विवेचनावरून येईल. राज्यव्यवहाराच्या भाषेचे सामान्य भाषेहून असलेले विशिष्ट व वेगळे स्वरूप आणि त्या दृष्टीने आजच्या वा कालच्या शासनप्रयुक्त मराठीचा अपुरेपणा लक्षात घेता आधुनिक कल्पनांशी सुसंवादी असलेली शास्त्रसंमत व परिपूर्ण अशी राज्यकारभाराची परिभाषा पुष्कळ अंशी नव्याने घडवावी लागणार आहे. या परिभाषेची जातकुळी शास्त्रीय स्वरूपाची असल्यामुळे, इतर शास्त्रीय विषयांतील परिभाषेच्या स्वरूपाशी व परंपरेशी ती विसदृश असून चालणार नाही. स्वतंत्र भारताच्या घडणीत शास्त्रीय व तांत्रिक ज्ञानाच्या विकासासाठी त्या क्षेत्रांतील परिभाषेला जशी सिद्धता करावी लागेल तशीच व तेवढीच सिद्धता शासनाच्या

[१] "......and as regards the use of regional languages in India......a term derived from regional language should be used to represent a common idea recurring in daily life, an idea needed in the pursuit of arts and crafts, and an idea belonging to the superficial layers of thought."—Dr. Rangnathan.
*Scientific and Technical Translating and other Aspects of the Language Problem (UNESCO's Report—1957)* : pp. 213-14.

विस्तारत्या, अनेकमुखी व्यवहाराच्या पूर्ततेसाठी प्रशासनिक भाषेलाही करावी लागणार आहे. या दोन्ही क्षेत्रांतील परिभाषांचे प्रश्न सारखे व अडचणीही सारख्याच राहणार आहेत, आणि त्यांतून मार्ग काढण्यासाठी या दोन्ही प्रकारच्या परिभाषांना कदाचित एकच वाट शोधावी लागणार आहे. या दृष्टीने आज नव्याने आकारास येत असलेल्या प्रशासनिक परिभाषेने शास्त्रीय परिभाषेशी असलेले आपले नाते ओळखले पाहिजे. विज्ञानतंत्रादिकांच्या प्रत्यक्ष वापराव्यवहारात आणि उच्च शिक्षणाच्या अथवा संशोधनाच्या क्षेत्रात मराठीला आजपर्यंत फारसे स्थान नव्हते. त्यामुळे मराठीतील शास्त्रीय परिभाषा मागासलेली असणे साहजिक आहे. परंतु आज बराच काळ ज्या थोड्या-फार प्रमाणात ती प्रयुक्त होत आहे आणि शास्त्रीय विषयांवरील लहान-मोठ्या ग्रंथांतून व नियतकालिकांतून वापरली जात आहे त्यायोगे तिने एक निश्चित आकार घेतला आहे. प्रारंभिक अवस्थेच्या पुढे जरी तिने मजल गाठली नसली तरी तिची एक परंपरा स्थिरावली आहे ; तिची प्रवृत्ती स्पष्ट झाली आहे. इंग्रजांच्या शासनकाळी मराठीला प्रशासनात कधीच स्थान मिळाले नाही. संस्थानी राजवटीत राज्यकारभारासाठी तिचा वापर होत होता व तिची प्रशासनिक परिभाषाही होती. पण ती पूर्वपरंपरेत रुळलेली, कालविसंगत होती. नव्या धर्तीच्या शासनव्यवहारा-साठी शास्त्रीय स्वरूपाची तिची नवी परिभाषा अस्तित्वातच आली नव्हती. आज ती निर्माण होत आहे. अशा वेळी मराठी परिभाषेची जी एक परंपरा स्थिरावली आहे तिचाच मागोवा घेतला पाहिजे ; तिची जी प्रवृत्ती आहे तीच स्वीकारली पाहिजे. "एखाद्या भाषेतील शब्दसंग्रहाचा योजनाबद्ध विकास करून घ्यावयाचा असल्यास तिची जी सहजसिद्ध प्रवृत्ती असेल तिचा उपयोग करून घेतला पाहिजे."[१]

परिभाषेच्या बाबतीत मराठी भाषेची सहजसिद्ध प्रवृत्ती कोणती आहे ? इंग्रजी भाषेच्या वा ज्ञानाच्या संपर्कात येण्यापूर्वी शास्त्र-

[१] "......... the planned vocabulary development should make the best possible use of the natural tendencies of the language."

—*The Use of Vernacular Languages in Education* (*UNESCO—1953*) · p. 6.5

व्यवहारादींच्या बाबत मराठी परिभाषा संस्कृतानुसारी होती, हे स्पष्टच आहे. सामान्य व्यवहाराहून वेगळ्या वेदांतव्याकरणादी शास्त्रविषयांबाबत मराठीने संस्कृत परिभाषा उचलली होतीच. परंतु शास्त्रादीहून वेगळी राज्यव्यवहाराची परिभाषा तयार करण्याचा शिवकाली प्रसंग आला असतानासुद्धा तिने संस्कृत भाषेचाच अवलंब केला. परिभाषेसंबंधीचा खरा प्रश्न मराठीपुढे निर्माण झाला तो इंग्रजी अमदानीच्या आरंभकाली. आधुनिक पद्धतीच्या पाश्चात्य ज्ञानाशी व विद्येशी यावेळीं मराठीचा परिचय होऊ लागला. या परकीय कल्पना कोणत्या भाषेतून व्यक्त कराव्या यासंबंधी शालेय पुस्तकांच्या बाबतीत प्रथम अडचण निर्माण झाली. इंग्रजी शब्द तसेच ठेवता येत नव्हते. ते कळले नसते. सामान्य मराठीत योग्य पर्याय नव्हते. त्यासाठी संस्कृत भाषेचाच आश्रय घेण्यात आला. शास्त्रीय विषयांपैकी अंकगणितावर पहिले मराठी पुस्तक तयार झाले. ते तयार करणाऱ्या कॅप्टन जॉर्ज जर्व्हिसने शास्त्रीय विषयांवरील मराठी परिभाषेचा पाया घातला असे म्हणता येईल. या पुस्तकातील परिभाषेसंबंधी सुरुवातीसच त्याने लिहिले आहे :

> " हा गणितमार्ग महाराष्ट्र भाषेंत दाखवितो. यांत कित्येक पदार्थांची नांवे या भाषेंत अप्रसिद्ध आहेत. त्यांस संस्कृत शब्दे करूनच लिहिली आहेत. "[1]

संस्कृतनिष्ठ परिभाषेच्या वापरामुळे जर्व्हिसचे लेखन क्लिष्ट झाल्याचा अभिप्राय सोप्या मराठीचा पक्षपाती मेजर कॅन्डी याने व्यक्त केला. या टिकेस उत्तर देताना " In the exact sciences loose, ambiguous language cannot be admitted, "[2] असे त्याने जे म्हटले आहे त्यात परिभाषेच्या स्वरूपाची जर्व्हिस याला नीट जाण असल्याचे स्पष्ट दिसून येते. परिभाषेच्या स्वरूपाची जर्व्हिस याने घालून दिलेली यथार्थ कल्पना शास्त्रीय विषयांवरील मराठी लेखनात पुढे नीट रुजली. जर्व्हिसनंतर रसायनशास्त्र, पदार्थविज्ञानशास्त्र, शिल्पविद्या, यंत्रशास्त्र आणि यांच्याच जोडीला वैद्यकशास्त्र, कृषिशास्त्र, अर्थशास्त्र इत्यादी

[1] जॉर्ज जर्व्हिस : गणितकृति अथवा गणितमार्ग (आ. २री.) पृ. १.
[2] कृ. भि. कुलकर्णी : आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांति, पृ. २४६.

शास्त्रीय विषयांसंबंधी लहानमोठी पुस्तके लिहिणाऱ्या हरि केशवजी, केरो लक्ष्मण छत्रे, नारायणशास्त्री जोशी, चौलकर, बाळाजी प्रभाकर मोडक, गोविंद गंगाधर फडके, कृष्णशास्त्री चिपळूणकर, गोविंद नारायण माडगावकर इत्यादी लेखकांनी मराठीत संस्कृत भाषेच्या मदतीने बऱ्याच मोठ्या प्रमाणावर शास्त्रीय परिभाषा तयार केली व ती रूढ झाली. श्रेणी, घातकर्म, त्रिकोणमिति, सच्छिद्रता, दाढर्य, गुरुत्वाकर्षकत्व, वातमानयंत्र, धृवोत्सृष्टिप्रेरणा, पार्श्वाहतचक्र, सतत-वर्तुलगति, देहीभवन, उष्णमापक, सूक्ष्मदर्शक यंत्र, समीपदृष्टि, पतनकोण, चलनमध्य इत्यादी शेकडो निश्चितार्थकवाचक सुटसुटीत पारिभाषिक शब्द या शास्त्रीय परिभाषेच्या प्रारंभकाळी निर्माण झाले. ऑक्सिडीकरण, निरॉक्सिजन, क्लारिकाशय असे शब्दानुकूलनाच्या पद्धतीने तयार केलेले काही शब्द आढळत असले तरी ही प्रवृत्ती तुरळकच आढळून येत होती. बहुधा संस्कृतानुसारी पर्यायच तयार करण्यात येत. परिभाषेसाठी संस्कृत भाषेचा आश्रय घेण्याची आवश्यकता वरील सर्व लेख-कांना भासली व तिचे समर्थन कृष्णशास्त्री चिपळूणकरांसारख्या मातबर ग्रंथकाराने स्पष्टपणे व अनेकवार केले आहे. आपल्या 'अनेकविद्या-मूलतत्त्व-संग्रह' या ग्रंथाच्या प्रस्तावनेत कृष्णशास्त्री लिहितात :

> "या ग्रंथात शास्त्रीय विषयांचें निरूपण करताना संस्कृत शब्द आले आहेत. परंतु तसल्या विषयावर लिहितांना संस्कृत शब्द घातल्यावाचून उपाय चालत नाहीं, हें प्रायः सर्व सुज्ञ मराठी ग्रंथ लिहिणाऱ्यांचें अनुभवास आलेच असेल."

ही परिभाषा संस्कृतावर आधारलेली असावी असे तत्कालीन मराठी ग्रंथकारांप्रमाणेच सरकारचेही मत होते. सरकारी शाळापुस्तक मंडळीने हे धोरण स्पष्ट करताना आपला परिभाषाविषयक दृष्टिकोन पुढीलप्रमाणे स्पष्ट केला आहे :

> "But when the idea intended cannot be expressed by a term in either of these dialects (Marathi and Gujrathee) the assistance should be derived from their cognate language, the Sanscrit and not from Persian or Arabic."[१]

---

[१] कृ. भि. कुलकर्णी : आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांती, पृ. २६७.

मराठीची परिभाषाविषयक प्रवृत्ती संस्कृतानुसारी कोणत्या कारणास्तव झाली आहे व असावी यासंबंधी आधुनिक मराठी भाषेचे शिल्पकार विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी परिभाषेच्या शास्त्रीय स्वरूपाची पूर्ण जाणीव ठेवून जी मीमांसा केली आहे ती आजही उद्बोधक ठरेल. निबंधमालेतील 'भाषांतर' या विषयावरील आपल्या निबंधात ते लिहितात.

> "प्रत्येक शास्त्राला त्याचे त्याचे असे ठरलेले कांहीं शब्द असतात; त्यांस संस्कृतांत परिभाषा म्हणतात...असे जे नवे शब्द बनवायचे त्यांत इतके गुण असावे लागतात. एकतर या शब्दांचे वरचेवर काम लागणार, तेव्हां ते लांबलचक अदजड नसावे; तर जेवढे थोडक्यांत येतील तेवढे चांगले; जसे 'भूगर्भशास्त्र', 'पदार्थविज्ञान', 'वक्रीभवन' इत्यादि. दुसरें, ते ओबडधोबड अथवा कर्कश नसून कानास चांगले मृदु व मधुर लागावे. तिसरें, ते व्यावहारिक भाषेपेक्षां जितके निराळे असतील तितके चांगले; कारण जे शब्द नेहमी बोलण्याचालण्यांत वगैरे आलेले ते शास्त्रीय ग्रंथांत शोभत नाहींत. असो; आतां या सर्व सोयी संस्कृतामुळें मराठीस फार उत्कृष्ट साध्य झाल्या आहेत." [१]

मराठीची ही परिभाषाविषयक प्रवृत्ती हळूहळू स्थिरावली. या प्रारंभिक कालानंतर मराठीत विज्ञान, तंत्र व इतर अनेक सामाजिक शास्त्रे यासंबंधीची ग्रंथरचना झाली व त्यासाठी अनेक नवीन पारिभाषिक शब्द तयार होत गेले आणि हे त्या त्या विषयात मान्य झाले. या सर्व शब्दांचा संग्रह करून व निरनिराळ्या शास्त्रीय विषयांवरील नवे पारिभाषिक शब्द तयार करून त्यांचा एक सर्वसमावेशक असा 'शास्त्रीय परिभाषा कोश' य. रा. दाते व चिं. ग. कर्वे यांनी तयार केला. या कोशातील परिभाषेचे वरवर जरी निरीक्षण केले तरी ती कशी संस्कृतानुसारी आहे, याची सहज कल्पना येईल. अलीकडील काळात जी शास्त्रीय परिभाषा निर्माण झाली व आजही होत आहे ती संस्कृत भाषेवरच बहुतांशी आधारलेली आहे. नवीन शब्दनिर्मितीसाठी संस्कृत भाषेचे साह्य घेण्याची ही प्रवृत्ती केवळ शास्त्रीय विषयात दिसून येते असे

---

[१] विष्णु कृष्ण चिपळूणकर : निबंधमाला, पृ. १६७–६८.

नसून इतरत्र वाङ्मयात व समाजाच्या वरच्या पातळीवरील अनेकविध व्यवहारातही आढळून येते. नवीन कल्पना व्यक्त करण्याचा प्रसंग आल्यास सामान्य भाषेचा शब्दसंग्रह अपुरा पडतो व त्यासाठी आजही संस्कृत भाषेकडे धाव घ्यावी लागते. शास्त्रीय व तांत्रिक विषयांत, शासन, अर्थकारण, राजकारण यांच्या क्षेत्रांत व सामाजिक व्यवहारात कितीतरी संस्कृतनिष्ठ शब्द आज वापरण्यात येत आहेत.[१]

शास्त्रीय परिभाषेच्या व त्या अनुषंगाने सर्वसाधारण मराठी परिभाषेच्या या प्रवृत्तीचा राजकारण, अर्थकारण व शासनव्यवहार यांच्या शब्दसंग्रहावरही प्रभाव पडणे क्रमप्राप्त होते. वर्तमानपत्रांतून व ग्रंथादिकांतून या विषयांसंबंधी जे शब्द प्रत्यही तयार होत होते त्यांचे वळणही, सर्वस्वी नसले तरी बऱ्याच मोठ्या प्रमाणात, संस्कृतानुसारी होते. मराठी व अन्य भारतीय भाषांचा राज्यकारभारात वापर होत नसल्यामुळे व्यापक प्रमाणावर व संघटितपणे या विषयाची परिभाषा तयार करण्याची व कोशादी स्वरूपात संग्रहीत करण्याची गरज भासली नाही. 'शास्त्रीय परिभाषा कोशा' त इतर विषयांच्या जोडीने शासनव्यवहारातील परिभाषेचाही थोडया प्रमाणात समावेश झाला होता. नाही म्हणायला या आधी १९३१ सालात महाराष्ट्राबाहेर बडोदे संस्थानात तयार झालेल्या 'श्रीसयाजीशासनशब्दकल्पतरु' या बहुभाषिक कोशात शासनविषयक इंग्रजी शब्दांच्या गुजराती पर्यायांबरोबर हिंदी, मराठी, बंगाली, उर्दू, फार्शी, संस्कृत या भाषांचे पर्यायही देण्यात आले होते. त्या दृष्टीने मराठीचा अलीकडील काळातील हा पहिला प्रशासन कोश म्हणता येईल. या कोशात मुख्यत्वेकरून विधिविषयक परिभाषा एकत्रित करण्यात आली आहे. कायद्यासारख्या तांत्रिक विषयातील परिभाषेचा देशी भाषांत विकास व्हावा व या भाषांची शुद्धता कायम राहावी, हा या कोशरचनेमागचा हेतु स्पष्ट करण्यात आला होता. आज शासनव्यवहार व इतर विषय या बाबतीतील एकरूप

---

[१] वृत्तपत्रे व नियतकालिके यांत आढळणाऱ्या अशा शब्दांची नमुनेवजा सूची परिशिष्ट २ मध्ये दिली आहे.

परिभाषेची भारत सरकारने जी कल्पना केली आहे ती तीस वर्षांपूर्वीच बडोद्याच्या प्रागतिक शासनाने प्रत्यक्षात उतरवण्याचा प्रयत्न केला होता. अशा परिभाषेसाठी संस्कृत भाषेचा आश्रय घेणे अपरिहार्य होते. कोशाच्या प्रस्तावनेत एकरूप परिभाषेचा उद्देश विशद करताना म्हटले आहे :

> "Sanskrit being the stock from which these languages are derived, if common words having a common origin are found in the Sanskrit language which may be easily used in the five languages, and if a tendency is observed to use such words, people speaking one language will easily understand the language of others. In selecting words, therefore, Sanskrit words or words of Sanskrit origin, are given preference."[१]

या कोशातील पर्याय संस्कृत भाषेतील व तीवर आधारलेले कसे होते हे पुढील उदाहरणांवरून दिसून येईल—आव्हानपत्र, आज्ञापत्रिका, न्यायमंदिर, स्वत्वार्पण, उन्मत्ताश्रय, लग्नविच्छेद, काराध्यक्ष, काराधिकारी, अमात्य, मंत्रसचिव, कर्मसचिव, निक्षेप, निक्षेपी, मरणोत्तर परीक्षा, कृषिक्षेत्र, संग्रहस्थान, मृत्यूलेखार्पितदानभागी, मध्यस्थ पंच, नित्यावास इत्यादी. ही परिभाषा केवळ कोशातच राहिली नव्हती, तर त्या संस्थानात रूढ असून ती तेथील लोकांच्या वापरातही होती.

'शासनकल्पतरू' चा अपवाद सोडल्यास मराठीत स्वतंत्रपणे प्रशासनाची परिभाषा तयार करण्याचा प्रयत्न पूर्वी झाला नाही. तसा प्रयत्न झाला असता तर तो, भारतीय एकरूपतेचा आदर्श बाजूस ठेवला तरी, मराठी परिभाषेच्या मूळ प्रवृत्तीनुसार संस्कृत शब्दांच्या आश्रयानेच झाला असता, हे निर्विवाद. आज निर्माण होत असलेल्या प्रशासनिक परिभाषेला ही प्रवृत्ती विसरता येणार नाही. सामान्य व्यवहाराच्या भाषेने शास्त्रीय व तांत्रिक भाषेला शब्द पुरवले असले तरी या शब्दांचे जे पारिभाषिक स्वरूप स्थिर झाले ते त्यांना निश्चित व नेमका अर्थ मिळाला त्यामुळेच. परिभाषेची लक्षणे पूर्णपणे

[१] श्रीसयाजीशासनशब्दकल्पतरु—Preface, P. 18.

लागू पडतील अशा रीतीने सामान्य भाषेत शब्द तयार होत नाहीत. परिभाषा त्या त्या शास्त्रात, व्यवहारात व क्षेत्रातच तयार होते आणि त्या व्यवहाराचे साधन म्हणूनच तिचा उपयोग होतो. प्रशासनिक परिभाषा ही जनतेची सामान्य व्यवहारभाषा राहू शकत नाही. सामान्य जनतेच्या, शेतकरी-कामकऱ्यांच्या बाळबोध भाषेतून परिभाषा घडवण्यात यावी, असा आग्रह धरणे म्हणजे परिभाषेचे शास्त्रीय स्वरूप दुर्लक्षिणे होय. संस्कृतनिष्ठतेचा आरोप केला जात असतानाही शास्त्रीय विषयाच्या क्षेत्रात मराठी परिभाषेने आपले रूप बदलले नाही. तिला आपली मूळ प्रवृत्ती सोडता आली नाही. त्याच जातकुळीच्या प्रशासनिक परिभाषेलाही निराळे वळण घेता येईल वा घेतलेले सोडता येईल, हे मराठी परिभाषेची परंपरा लक्षात घेता शक्य दिसत नाही. संविधानाच्या मराठी भाषांतरातील प्रशासनिक परिभाषेने भारतीय एकरूपतेची गरज जशी ओळखली तशीच मराठी परिभाषेची प्रवृत्ती पण ओळखली होती. प्रशासनिक परिभाषेचे हे वळण मराठी आज आत्मसात करीत आहे.

# मराठीची प्रशासन परिभाषा

भाषेची किंवा परिभाषेची नैसर्गिक होणारी घडण आणि तिचा योजनापूर्वक विकास यांत सहजच अंतर पडते. योजनापूर्वक घडवून आणायच्या कामात काही ध्येयधोरण असते, प्रयोजन आणि पद्धतीचा विचार असतो आणि उद्याचे चित्र डोळ्यांपुढे असते. मराठीच्या प्रशासनिक परिभाषेची प्रयत्नपूर्वक व पद्धतशीर वाढ करायची तर ती वरील गोष्टी विचारात घेऊनच करावी लागेल. या गोष्टींची आधीच साधकबाधक चर्चा करण्यात आली आहे. तिचीच ही थोडी उजळणी.

मराठी महाराष्ट्राची राजभाषा राहणार आहे, तशीच ती इतर चौदा भाषांच्या बरोबरीने भारताची राष्ट्रीय भाषा पण राहणार आहे. तिला आपले मराठीपण सोडता येणार नाही आणि राष्ट्रीयत्वही विसरता येणार नाही. आपली शासनविषयक परिभाषा निश्चित करताना तिला भारतीय एकरूपतेचे अनुसंधान ठेवावे लागेल. या ध्येयधोरणाबरोबरच प्रयोजनाचा विचार करता मराठीची प्रशासन परिभाषा प्रामुख्याने राज्यव्यवहारासाठी असणार. शासनकार्याशी ज्यांचा रोजचा आणि सरळ संबंध त्यांच्या गरजा ती आधी भागवणार. ही परिभाषा प्रशासनाची असली तरी ती लोकशाही प्रशासनाची परिभाषा आहे.

लोकशाही म्हणजे जनतेचे राज्य: जनतेचाही राज्यकारभाराशी संबंध येणारच. तेव्हा जनतेच्या सामान्य भाषेशी फारकत करून तिला चालणार नाही. जनतेशी ती जनतेच्या भाषेत बोलेल. त्यासाठी ती सामान्य जनतेचा शब्दसंग्रह घेईल आणि आपला शब्दसंग्रह जनतेलाही देईल. भाषा आणि परिभाषा अशा बरोबरीने वाढत राहतील. जनतेची गरज भागवल्यामुळे काही कालानंतर ही परिभाषा सर्व जनतेचीच होणार आहे. तरीही शासनव्यवहार हेच तिचे खरे क्षेत्र. या क्षेत्रातील अनेक कामांशी, अनेक विषयांशीच खरा तिचा संबंध येणार. हा पसारा मोठा आणि त्यातले बारकावे फार. हे सारे सांभाळायचे म्हणजे तिला आपला आवाका वाढवावा लागेल, नेमकेपणा बाणवावा लागेल. त्यासाठी इतर देशांतल्या भाषांनी, इतर विषयांतल्या परिभाषांनी ज्या पद्धती स्वीकारल्या त्याच तिलाही पत्कराव्या लागतील. त्यांच्यासारखीच आधी आपली जातकुळी ओळखावी लागेल; आपल्या वेगळ्या रूपाची, वेगळ्या लक्षणांची जपणूक करावी लागेल. आपले हे वेगळेपण जपण्यासाठी तिला काही जुने सोडावे लागेल व नवे जोडावे लागेल. पण याबरोबरच मूळ भाषेशी असलेला आपला एकपणा मोडणार नाही, याचीही काळजी घ्यावी लागेल. या साऱ्यांतून उद्याचे तिचे जे चित्र घडणार आहे, ते कसे राहील याचे थोडेसे दिग्दर्शन पुढे केले आहे.

**'हक्क' की 'अधिकार'** : शासनव्यवहाराच्या उद्याच्या भाषेत प्रत्येक कल्पना वेगळी राहील, तिचा संकेत वेगळा राहील आणि तो संकेत एकच अर्थ नेमका सांगेल. Right ह्या इंग्रजीतील शब्दासाठी सामान्य वापराच्या मराठीत कधी 'हक्क' तर कधी 'अधिकार' असे पर्याय सोयीनुसार वा सवयीनुसार वापरले जातात. पण 'हक्क' हा पर्याय नेहमीच व निरपवाद Right साठीच वापरला जाईल असे नाही. तो कधी Title चा पर्याय असेल, तर कधी Claim साठीही वापरण्यात येईल. Privilege मध्ये तो 'विशेष हक्क' होईल. म्हणजे 'हक्क' हा शब्द नित्याच्या उपयोगात एकाच वेळी Right, Claim, Title, व Privilege अशा चार शब्दांवर आपला हक्क सांगेल. पण त्याचा

खरा हक्क कोणत्या शब्दावर आहे, हे प्रशासनाच्या परिभाषेला ठरवून घ्यावे लागेल. कारण, वरील इंग्रजी शब्द विधिव्यवहारात आणि प्रशासनात प्रयुक्त होतील ते एका निश्चित अर्थीच. कोणताही शब्द कोठेही चालू शकेल अशी सामान्य भाषेतल्यासारखी स्थिती तेथे गोंधळ निर्माण करील. अशा अनेकार्थत्वामुळे आशयात काटेकोरपणा असणार नाही आणि अभिव्यक्तीतही भोंगळपणा येईल. नेमकेपणाच्या अभावी अर्थाची फिरवाफिरव करण्यास अवसर मिळून प्रसंगी एखादी व्यक्ती शासनास अडचणीत टाकू शकेल आणि कदाचित स्वतःही अडचणीत येईल. म्हणूनच पारिभाषिक शब्द म्हणून प्रशासनात उपयोग करताना समानार्थी वाटणाऱ्या अशा अनेक शब्दांच्या अर्थच्छटा स्पष्ट कराव्या लागतील. त्यांच्या आशयातील सूक्ष्म भेद समजून घेऊन एका अर्थासाठी एकच शब्द अशी व्यवस्था करावी लागेल.

Right या शब्दाचा ‘ अधिकार ’ हा पर्याय स्वीकारला तर तोही या एकाच अर्थाने वापरला जातो, असे नाही. तो कधी Power या अर्थी उपयोगात येईल, तर कधी Authority या अर्थानेही प्रयुक्त होईल. वापराचा हा अनिश्चितपणा दूर करण्यासाठी एक कल्पना मध्यवर्ती ठरवून तिच्या अर्थकक्षेत येणारे शब्द सजातीय ठरवावे लागतील. त्यानंतर त्यांच्या सूक्ष्म अर्थच्छटा निश्चित करून अशा शब्दांचा मध्यवर्ती कल्पनेशी संबंध सुटणार नाही अशा रीतीने त्यांचे पर्याय ठरवावे लागतील. ही कल्पना या वेगवेगळ्या पर्यायांत अनुस्यूत असणे या दृष्टीनेच आवश्यक ठरेल. असे पर्याय नित्य व्यवहाराच्या किंवा सामान्य जनतेच्या भाषेत सापडणे अशक्यच; कारण, तिच्यातील शब्दसंग्रह यदृच्छया तयार झालेला असतो. अशा शब्दांतील आशय अर्थाच्या काटेकोरपणापेक्षाही संदर्भावलंबी अधिक असतो. सूक्ष्म अर्थच्छटा व्यक्त तर करायच्या असतात, पण त्यासाठी उपलब्ध शब्दसंग्रहात शब्द नसतात. अशा परिस्थितीत योग्य पद्धतीने हवा तो आशय व्यक्त करतील असे नवीन शब्द निर्माण करण्यावाचून गत्यंतर नसत. यासाठी शब्दनिर्मितीच्या कृत्रिम प्रक्रियेचा अवलंब करणे, हाच एक मार्ग असतो. दुसरा मार्ग म्हणजे इंग्रजी शब्द जसेच्या

तसेच स्वीकारणे हा होय. पर्याय नाहीत म्हणून इंग्रजी शब्द वापरण्याच्या पद्धतीमुळे भाषेला कसे संकर स्वरूप येते, ह्याची उदाहरणे पूर्वी दिलीच आहेत. संस्कृतातील प्रत्ययोपसर्गांच्या साह्याने शब्दनिर्मिती सुकर होत असल्यामुळे त्या त्या अर्थाच्या छटा दर्शविणारे उपसर्ग वा प्रत्यय वापरून प्रत्येक अर्थच्छटेचा वाचक असा वेगळा पर्याय तयार करणे हाच एक व्यवहार्य मार्ग ठरतो. हे लक्षात घेता प्रशासनाच्या आवश्यकतेच्या दृष्टीने शब्दांचा रूढ प्रयोग बदलणे, त्यांना वेगळा अर्थ देणे आणि संस्कृत भाषेतील शब्दांचे व उपसर्गादिकांचे साह्य घेणे या गोष्टी अपरिहार्य होतात. या प्रक्रियेने Right व त्याचे सजातीय पर्याय कसे तयार करता येतील, हे पाहू.

वरील सजातीय इंग्रजी शब्दांपैकी Right या शब्दाची अर्थकक्षा व्यापक आहे.[१] तेव्हा त्यातील कल्पना मध्यवर्ती म्हणून ठरवून त्या अनुरोधाने इतर शब्दांचे पर्याय निश्चित करावे लागतील. Right हा जर 'अधिकार' असेल, तर Privilege हा सवलत म्हणून वा विधिद्वारा मिळालेला 'विशेष अधिकार' होय. Prerogative हा अधिकारच, पण तो श्रेष्ठत्व, दर्जा अथवा पद या कारणास्तव मिळालेला असतो. म्हणजे सामान्य अधिकाराहून या अधिकाराचा दर्जा वरचा असतो. Authority हाही अधिकारच आहे, पण तो दुसऱ्याने विशिष्ट प्रयोजनासाठी, विवक्षित अंमलबजावणीसाठी दिलेला असतो. अशा तऱ्हेने अर्थाच्या छटा स्पष्ट झाल्या म्हणजे त्यांचे निश्चित अर्थाने पर्याय तयार होतात, ते असे :

| इंग्रजी शब्द | | प्रचलित पर्याय | निश्चित केलेले योग्य पर्याय |
|---|---|---|---|
| Right | .. | हक्क, अधिकार | अधिकार |
| Privilege | .. | विशेष हक्क | विशेषाधिकार |
| Prerogative | .. | विशेष अधिकार | परमाधिकार |
| Authority | .. | अधिकार | प्राधिकार |
| Claim | .. | हक्क | दावा |
| Title | .. | हक्क | हक्क |

वरील सहाही शब्द कायद्याच्या भाषेत व न्यायालयाच्या वा विधानमंडळाच्या व्यवहारात उपयोगात येतात. त्यांचा निश्चित अर्थी

[१] Right is by far the most inclusive term.—*Webster's Dictionary of Synonyms.*

काटेकोरपणे वापर केला नाही, तर गोंधळ निर्माण होण्याचा संभव असतो. अशा वेळी सुचवलेले नवीन पर्याय रूढ नाहीत, ते बालबोध नसून संस्कृतनिष्ठ आहेत, क्लिष्ट आहेत असे म्हणून झिडकारले व त्याऐवजी प्रचलित शब्दच वापरले, तर ते शासनाला आणि पर्यायाने सामान्य जनतेला अतिशय गैरसोयीचे ठरेल. परिभाषेच्या निमित्ताने भाषेची अर्थवाहकता वाढवायची असते. परिभाषा टाळली, तर भाषेचा विकास कुंठित होईल व तिचे सामर्थ्य वाढणार नाही आणि राजभाषेचे कर्तव्य ती नीट रीतीने पार पाडू शकणार नाही.

**रद्द करणे :** परिभाषा ही एकार्थक, यथार्थतेने व नेमकेपणे अर्थ व्यक्त करणारी असावी हे परिभाषेचे महत्त्वाचे लक्षण, पारिभाषिक शब्द निश्चित करताना कटाक्षाने का पाळले पाहिजे हे स्पष्ट करणारे उदाहरण वर दिले. परिभाषा ही निश्चितार्थक तशीच स्पष्टार्थकही असली पाहिजे. शब्दांना अन्वर्थकता येते ती त्यांचा अर्थ स्पष्ट असेल तरच. प्रशासनात, विशेषत: कायद्याच्या दृष्टीने, स्पष्टार्थकतेला फार महत्त्व आहे. सामान्य व्यवहारात अर्थ स्थूलमानाने सरासरी व्यक्त झाला तरी चालतो. परंतु प्रशासनादी व्यवहारात शब्दांचा तसा वापर केल्यास संदिग्धता, मोघमपणा, द्व्यर्थता असे दोष निर्माण होतील. पुढे विधिविषयक भाषाप्रयोगात नेहमी आढळणारे व अर्थाच्या दृष्टीने परस्परांच्या निकट असणारे काही शब्द दिले आहेत. त्या सर्वांसाठी प्रचलित भाषाप्रयोगात ‘ रद्द करणे ’ हा एकच पर्याय दिलेला आढळतो. त्यांचे विशेषार्थदर्शक पर्याय वापरले नाहीत तर अर्थ स्पष्ट होणार नाही, व विधिव्यवहाराच्या दृष्टीने ते सदोष ठरेल.

| इंग्रजी | | प्रचलित पर्याय | निश्चित केलेले योग्य पर्याय |
|---|---|---|---|
| Annual | .. | रद्द करणे | विलोपन करणे |
| Abolish | .. | रद्द करणे | नाहीसे करणे |
| Abrogate | .. | रद्द करणे | निराकरण करणे |
| Cancel | .. | रद्द करणे | रद्द करणे |
| Revoke | .. | रद्द करणे | परत घेणे |

उपरोक्त सर्व पर्यायांसाठी मराठी भाषेमध्ये ' रद्द करणे ' हा एकच पर्याय आहे. परंतु या प्रत्येक शब्दाची अर्थच्छटा भिन्न असल्यामुळे त्यासाठी एकच शब्द वापरणे विधिदृष्टया अनुचित ठरेल. वेब्स्टरच्या शब्दकोशात उपरोक्त शब्दांमधील सूक्ष्म अर्थभेद स्पष्ट केलेला आहे, तो असा :

" Annual is the most general term, denoting simply to make void ; Abolish applies particularly to things of a permanent nature, such as institutions, usages, customs ; Abrogate to the annuling by a ruler or an executive body of laws, ordinances, treaties, connections ; Revoke to the recall of a previous grant which conferred power, privilege etc. Cancel refers to the instruments as deeds, contracts, writs rather than to statutes........ "

**सल्लागार :** सारख्या स्वरूपाची कामे असलेली, पण विवक्षित परिस्थितीनुसार त्यांच्या स्वरूपात थोडाफार फरक असणारी पदे शासनात असतात. त्यांचा दर्जाही त्या कामाप्रमाणे ठरवण्यात आलेला असतो. त्यांना सोपवलेल्या वेगवेगळ्या कामांचा बोध होणार नाही अशा स्वरूपाच्या जर या पदसंज्ञा असल्या, किंवा सर्व पदांसाठी एकच पर्याय असला, तर ते शासनाच्या दृष्टीने गैरसोयीचे ठरेल. पर्याय रूढ आहे किंवा दुसरा पर्याय उपलब्ध नाही, असे म्हणून नवा पर्याय शोधण्याची जबाबदारी भाषेला टाळता येणार नाही. एकच पर्याय वापरात असलेली अशीच काही पदनामे पुढे दिलेली आहेत :

| इंग्रजी शब्द | | प्रचलित पर्याय | निश्चित केलेले योग्य पर्याय |
|---|---|---|---|
| Adviser | .. | सल्लागार | सल्लागार |
| Consultant | .. | सल्लागार | संमंत्रक |
| Counsellor | .. | सल्लागार | समुपदेष्टा |
| Remembrancer | .. | सल्लागार | परामर्शी |

**आदेश :** प्रशासनाची, विशेषत: कायद्याची परिभाषा अर्थदृष्टया जेवढी काटेकोर तितकीच ती आटोपशीर स्वरूपाची असावी लागते. ती वर्णनात्मक व स्पष्टीकरणात्मक असून चालत नाही.

यासाठी एका शब्दापासून अनेक सजातीय शब्द तयार करता आले तर त्यामुळे भाषेत सुटसुटीतपणा निर्माण होतो. 'आदेश' या शब्दाचे पुढील उदाहरण पहा :

| | | |
|---|---|---|
| Order | .. | आदेश |
| Ordinance | .. | अध्यादेश |
| Command | .. | समादेश |
| Commission (Military) | .. | राजादेश |
| Mandamus | .. | परमादेश |
| Order-in-council | .. | परिषदादेश |
| Issue of Rule | .. | नियमादेश |
| Instruction | .. | अनुदेश |
| Process (Law) | .. | आदेशिका |

सुटसुटीतपणाबरोबर या शब्दांना अर्थाचाही एक निश्चितपणा आहे. Order साठी हुकूम ह्या सामान्य मराठीत वापरात असलेल्या शब्दापासून असे सुटसुटीत सजातीय शब्द तयार करता येणार नाहीत. त्यामुळे एका आटोपशीर शब्दाऐवजी स्पष्टीकरणात्मक अभिव्यक्तींचा उपयोग करावा लागेल. कायद्याची भाषा सामान्यत: विस्तारशील नसते. तिच्यात एकप्रकारचा बंदिस्तपणा असतो, आणि बोजही असतो. नेमकेपणाबरोबरच नेटकेपणाही असतो.

या पर्यायांपासून मूळ इंग्रजी शब्दांशी संबंधित असे दुसरेही सुटसुटीत शब्द तयार होऊ शकतात. Officer Commanding या शब्दासाठी 'समादेशक अधिकारी' अशी अर्थवाही व नेटकी पदसंज्ञा Command साठी असलेल्या 'समादेश' या शब्दापासून तयार करता येईल. Commissioned Officer या शब्दासाठी आज 'कमिशन मिळालेला अधिकारी' अशी स्पष्टीकरणवजा अभिव्यक्ती वापरावी लागते. Commission चा 'राजादेश' हा पर्याय घेतला तर वरील शब्दाऐवजी 'राजादिष्ट अधिकारी' हा सुटसुटीत पर्याय वापरता येईल.

**कुलपती :** पारिभाषिक शब्द निश्चित करताना विशिष्ट विषयातील वा क्षेत्रातील परस्परांशी संबंधित संज्ञांचा एकत्रितपणे विचार करणे आवश्यक असते. अशा संज्ञांचे एक कुल असते व त्यात कधी कधी श्रेष्ठकनिष्ठतेचा एक क्रम असतो. अशा संज्ञांचे पर्याय ठरवताना त्यांच्यात संगती राखता आली, त्यातील मुख्यार्थवाचक एखादा सलग भाग सर्व संज्ञांस जोडता आला, तर अशा संज्ञांना एक व्यवस्थाबद्ध स्वरूप प्राप्त होते व त्या विशेष अर्थवाहक ठरू शकतात. उदाहरण म्हणून विद्यापीठातील पदसंज्ञांचे असे कुल पुढीलप्रमाणे तयार करता येईल. यात Vice-Chancellor साठी सामान्यत: आजवर वापरण्यात येणाऱ्या 'उपकुलगुरू' या पर्यायातील 'कुल' ही अंशसंज्ञा आधारभूत घेतली आहे:

| | | |
|---|---|---|
| Chancellor | .. | .. कुलपती |
| Vice-Chancellor | .. | .. कुलगुरू |
| Rector | .. | .. कुलमंत्री |
| Proctor | .. | .. कुलशासक |
| Registrar | .. | .. कुलसचिव |

**समर्थता :** इंग्रजीसारख्या प्रगत भाषांची समृद्धी त्यांच्यातील विपुल शब्दभांडारावर अवलंबून आहे. भाषेच्या संपन्नतेचा विचार करताना एकच शब्द किती विविध अर्थच्छटा व्यक्त करू शकतो, अनेक अर्थांत व संदर्भांत कसा वापरला जाऊ शकतो, हेच एक मोजमाप नाही. एकाच अर्थाचे वाटणारे, पण प्रत्येक सूक्ष्म अर्थच्छटा वेगवेगळेपणे प्रकट करणारे किती अधिक शब्द आहेत यावरूनही भाषेचे वैभव अजमावता येते. मराठीचा शब्दसंग्रह या दृष्टीने संपन्न आहे, असे म्हणता येणार नाही. संदर्भानुसार एकच शब्द वेगवेगळ्या अर्थी वापरून सामान्य भाषा काम चालवू शकते. पण शासनव्यवहाराच्या बाबतीत सूक्ष्मतेचे व काटेकोरपणाचे अवधान बाळगणे जरूर असल्यामुळे, त्यांसाठी उपयोगात येणाऱ्या भाषेत वेगवेगळ्या अर्थच्छटांसाठी वेगवेगळे शब्द निश्चित करावे लागतील आणि ते

कमी पडल्यास संस्कृत वा अन्य भाषांतून योग्य पर्याय मराठीत आणावे लागतील. अशा प्रसंगी केवळ रूढ प्रयोगाचा आग्रह धरला तर मराठीचा शब्दसंग्रह वाढणार नाही आणि अभिव्यक्तीच्या बाबतीत ती उणी पडेल. प्रशासनविषयक भाषेत नेहमी आढळणाऱ्या पुढील शब्दांसाठी मराठीत 'पात्रता', 'लायकी' वगैरे दोन तीन शब्दांचाच आलटून पालटून वापर होतो. वेगवेगळ्या अर्थच्छटांनुसार त्यांचे पुढील पर्याय ठरवता येतील :

| | | |
|---|---|---|
| Ability | .. | .. समर्थता |
| Capability | .. | .. शक्तता |
| Capacity | .. | .. सामर्थ्य |
| Competence | .. | .. क्षमता |
| Eligibility | .. | .. पात्रता |
| Fitness | .. | .. योग्यता |
| Qualification | .. | .. अर्हता |
| Efficiency | .. | .. कार्यकुशलता |

**भंग :** कायद्याच्या भाषेत उपयोगात येणाऱ्या समानार्थी शब्दांचे असेच आणखी एक कुल उदाहरणादाखल पुढे दिले आहे. अतिक्रमण, भंग, उल्लंघन अशा दोन तीन पर्यायांचाच आज या सर्व शब्दांसाठी वापर करण्यात येत असल्यामुळे त्यातील कल्पनांचा सूक्ष्म भेद व्यक्त करणे शक्य होत नाही. असा सूक्ष्म फरक करणे कायद्याच्या क्षेत्रात किती आवश्यक असते हे सांगावयास नको. हा फरक पुढील पर्यायांद्वारे दाखवता येईल :

| | | |
|---|---|---|
| Breach | .. | .. भंग |
| Contravention | .. | .. विरोधन |
| Encroachment | .. | .. अतिक्रमण |
| Infraction | .. | .. व्यतिक्रमण |
| Infringement | .. | .. उल्लंघन |
| Transgression | .. | .. अतिचार |
| Trespass | .. | .. अपप्रवेश |

**रूढ परिभाषा : समीक्षणात्मक दृष्टिक्षेप**

सामान्य भाषाप्रयोगातून घेतलेल्या व प्रशासनाच्या भाषेत रुळलेल्या काही पारिभाषिक शब्दांचा मूळ इंग्रजी कल्पनांच्या अनुरोधाने

पुनर्विचार करणे पुष्कळदा आवश्यक ठरते. असे शब्द परिभाषा म्हणून स्वीकारताना ते ज्या इंग्रजी शब्दांचे वाचक आहेत त्यांच्या सूक्ष्म अर्थच्छटांचा बारकाईने विचार झाला पाहिजे. हे पर्याय मूळ इंग्रजी शब्दांतील कल्पना संपूर्णत: व तंतोतंत व्यक्त करू शकत नसतील, तर ते बदलून त्याऐवजी समर्पक ठरतील असे निश्चित अर्थाचे व शक्यतोवर एकरूप भारतीय परिभाषेशी जुळतील असे वेगळे पर्याय निवडणेच योग्य ठरेल.

**'अर्थ' की 'वित्त'** : उदाहरणादाखल Finance या शब्दासाठी मराठीत रूढ असलेल्या 'अर्थ' या पर्यायाचा विचार करू. Finance Department म्हणजे 'अर्थ खाते', Finance Minister म्हणजे 'अर्थ मंत्री' असे प्रयोग आज अनेक वर्षे रूढ आहेत. पण त्यातील 'अर्थ' हा पर्याय मूळ Finance या शब्दातील कल्पनेचा तंतोतंत वाचक आहे काय ?

Finance या शब्दाचा पर्याय निश्चित करताना त्याच्या जोडीच्या Economy या सहयोगी शब्दाचा विचार करणेही जरूर आहे. या दोन शब्दांसाठी त्यांतील आशय निश्चितपणे व्यक्त करू शकतील असे दोन वेगवेगळे पर्याय नसल्यास, बिनचूक वापराच्या दृष्टीने त्यांच्या अर्थाची गल्लत होणे संभवते आणि क्वचित जोडीने हे शब्द एकत्र आल्यास अनुवादाच्या दृष्टीनेही व्यावहारिक अडचण उपस्थित होऊ शकते. मराठीत सध्या या दोन्ही शब्दांसाठी 'अर्थ' हा एकच पर्याय रूढ आहे. वरील दोन इंग्रजी शब्दांतील भिन्न अर्थच्छटा व त्यांतील व्याख्यात्मक बारकावा दाखवायचा झाल्यास या दोन शब्दांसाठी वेगवेगळे पर्याय घेणे आवश्यक आहे. वेब्स्टरच्या सर्वमान्य इंग्रजी शब्दकोशातील Economy व Finance या दोन शब्दांच्या व्याख्या अनुक्रमे अशा आहेत :

Economy = Orderly arrangement and management of the affairs of a community, estate, or establishment, directly concerned with its maintenance or productiveness.

(Economic blockade=to stifle the *trade* of another country as a punitive measure.

Economic cycle=*Business* cycle.

Economic motive=A motive impelling to the *production, conservation,* or *use of wealth.*)

Finance=1. The *pecuniary* resources of a ruler or a state.
2. Management of *monetary affairs.*
(Financial=Pertaining to *money matters.*)

वरील स्पष्टीकरणावरून Economy व Finance या शब्दांच्या अर्थच्छटा वेगवेगळ्या असून Economy हा शब्द अधिक व्यापक अर्थाने वापरला जातो असे दिसून येते. (विशेषण म्हणून Economic या शब्दाचा उपयोग करताना trade, business, wealth इत्यादी अनेक छटा त्यातून व्यक्त होतात, हे लक्षणीय आहे). Finance या शब्दाचा आशय मर्यादित असून तो 'पैसा' व तत्संबंधित व्यवहार याशीच मुख्यत्वेकरून निगडित आहे, हे दिसून येईल.

Finance साठी 'अर्थ' हा पर्याय आज रूढ असला व तो सामान्यत्वाने 'पैसा', 'संपत्ती' या अर्थाचा वाचक असला तरी त्या शब्दाचा प्रयोग पूर्वी बऱ्याच व्यापक अर्थाने होत असे. 'अर्थशास्त्र' या नावाखाली प्राचीन काळात भारतीय लोक व्यावहारिक जीविताशी संबंधित सर्व गोष्टींचा समावेश करीत. कौटिलीय अर्थशास्त्रात कृषी, पशुपालन, वाणिज्य, राजकारण या सर्व विषयांचा ऊहापोह आहे.

आधुनिक अर्थशास्त्रातही 'अर्थ' या शब्दाचा आशय केवळ 'पैसा' एवढाच अभिप्रेत नसून उत्पादन, उपभोग व वाटप या व्यवहारांशी संबंधित सर्व प्रकारची भौतिक साधनसंपत्ती एवढी त्या शब्दाची व्याप्ती आहे.

रूढ प्रयोगानुसार 'अर्थ' हा शब्द Economy व Finance या दोन्ही अर्थी प्रयुक्त होत असला तरी काटेकोरपणे त्याचा वापर करायचा झाल्यास Economy या शब्दाच्या व्याप्तीशी त्याचा आशय अधिक जुळता येईल. तेव्हा 'अर्थ' हा पर्याय Economy या शब्दासाठी निश्चित करणे योग्य होईल. पैसा व त्याशी संबंधित व्यवहार

एवढीच Finance या शब्दाची व्याप्ती असल्याने त्याचा वाचक असलेला 'वित्त' हा शब्द त्यासाठी घेण्यात यावा. 'अर्थ' हा शब्द तेथे अतिव्याप्त ठरेल.

Economy व Finance हे शब्द जेथे जोडीने एकत्र येतात तेथे या दोन शब्दांना 'अर्थ' हा एकच पर्याय असला तर त्याच्या बिनचूक अनुवादाच्या दृष्टीने अडचणी उपस्थित होतील, हे पुढील काही वाक्यांवरून लक्षात येऊ शकते :

(1) Public finance is a part of finance in general, and *finance* is a part of *economics*.[१]

(2) The characteristics of the *financial* organization of a country depend upon the degree of its *economic* development.[२]

(3) In assessing the significance of the *financial* control of *economic* activities......the interest of the financial institutions and those of the owners of the funds with which they operate do not always coincide.[३]

वरील शब्दांसाठी दोन वेगवेगळे पर्याय असण्याची आवश्यकता, त्यांच्याशी संबंधित वेगवेगळ्या पदनामांच्या अनुरोधानेही भासू शकते. Economic Adviser व Financial Adviser अशी दोन वेगवेगळी पदनामे शासनव्यवस्थेत आढळतात. या दोन पदांची कर्तव्ये व व्याप्ती वेगवेगळी असल्याने त्यांसाठी अनुक्रमे 'अर्थ सल्लागार' व 'वित्त सल्लागार', अशी वेगळी पदनामे घेण्यात येऊन 'अर्थ' व 'वित्त' असा पर्याय-भेद करता येईल.

Finance व Economy या शब्दांसाठी दोन वेगवेगळे पर्याय असण्याची आवश्यकता भारतीय संविधानाच्या अनुवादासाठी नेमलेल्या १४ भाषांच्या तज्ज्ञ समितीलाही भासली आणि तिने Economy साठी 'अर्थ' व Finance साठी 'वित्त' हेच पर्याय निश्चित केले आहेत.

---

१ *Encyclopaedia of the Social Sciences* ; Public finance, p. 639.
२ *Ibid*-Financial organization, p. 241.
३ *Ibid*-Financial organization, p. 242.

Finance या शब्दाचा 'अर्थ' हा रूढ पर्याय बदलून त्याऐवजी 'वित्त' हा नवीन पर्याय परिभाषेत स्वीकारणे कसे आवश्यक ठरते, हे वरील विवेचनावरून स्पष्ट होईल.

**'तपासनीस' की 'निरीक्षक'** : वरील नवी परिभाषा वापरात आली तर सामान्य जनतेला परिचित अशा रूढ शब्दांची हकालपट्टी होईल व त्याजागी संस्कृताविष्ठित कृत्रिम शब्द येतील, अशी याबाबत शंका घेतली जाऊ शकते. नव्या परिभाषेची वर जी उदाहरणे दिली आहेत त्यांत रूढ शब्दांची हकालपट्टी झाली असे नाही, तर प्रशासनाच्या विशिष्ट भाषेत त्या शब्दांचा निश्चित अर्थ ठरवून शास्त्रीय पद्धतीवर त्यांची पुनर्व्यवस्था लावून देण्यात आली आहे. ही व्यवस्था लावताना जेथे सामान्य प्रचलित भाषेतील शब्दसंग्रह कमी पडला तेथे संस्कृत भाषेचे साह्य घेऊन समर्पक व सुटसुटीत अशा नव्या शब्दांची प्रशासनाच्या आणि सामान्य भाषेच्याही शब्दसंग्रहात भर टाकण्यात आली आहे. ही व्यवस्था राज्यकारभाराच्या भाषेत स्थिरावली की सामान्य भाषेतही या शब्दांच्या उपयोगातला काटेकोरपणा उतरेल व परिणामी भाषेची अर्थवाहकता वाढेल.

या नव्या परिभाषेचा रूढ वा प्रचलित शब्दांना विरोध असण्याचे वस्तुतः काही कारण नाही. प्रचलित शब्द परिभाषेच्या लक्षणात बसू शकत असतील, ते स्पष्ट व निश्चित अर्थाचे असून त्यांच्या वापरामुळे प्रशासनाच्या भाषेतील व्यापक व्यवस्थेस बाध येत नसेल, तर असे शब्द घेण्यास मुळीच प्रत्यवाय असू नये. पण यात कटाक्षाने पहायची गोष्ट ही की, भाषेत या शब्दांच्या अर्थाला नेमकेपणा असावा. म्हणजेच अर्थाच्या दृष्टीने ते अतिव्याप्त वा अव्याप्त असू नयेत. दुसरे, अर्थकक्षेच्या दृष्टीने शब्द जर सजातीय असतील तर त्यांतील मुख्य कल्पनेच्या अनुरोधाने त्यांचे एक शब्दकुल तयार करता यावे.[१] या शब्दांच्या अर्थच्छटा

[१] "One word leads to several associated words................ In evolving a new word therefore, due weight should be given to its potentiality to generate associated words."

—Dr. D. S. Kothari : *The Problem of Scientific and Technical Terminology in Indian Languages*, p. 4.

वेगळ्या असाव्या व त्या वेगळेपणे व्यक्त करता याव्यात, त्या प्रत्येकापासून नामआख्यातादी व्याकरणरूपे तयार करता यावीत, आणि अर्थप्रक्रिया व रूपप्रक्रिया या दृष्टीने त्यांच्यात एक संगती असावी. या दृष्टीने आता सामान्य भाषेत रूढ असलेले व राज्य-कारभाराच्या भाषेत पदसंज्ञा म्हणून स्वीकारण्यासाठी सुचविलेले 'तपासनीस', 'चौकसनीस' वगैरे शब्द परिभाषेच्या नव्या शास्त्रशुद्ध व्यवस्थेत बसू शकतात काय, हे पाहू. आधी 'तपासनीस' याच शब्दाची तपासणी करू.

या दृष्टीने पाहता प्रथमच जी गोष्ट लक्षात येते ती ही की, 'तपासणी' या शब्दाची अर्थच्छटा निश्चित नाही. इतर शब्दांच्याही अर्थच्छटा त्यात समाविष्ट आहेत. 'तपासनीस' हा शब्द Inspector साठी सुचवण्यात आला आहे. पूर्वी ही संज्ञा 'गुन्ह्याची चौकशी करून सरकारात कळवणाऱ्या अधिकाऱ्यास' लावीत. पण आज Police Inspector ला 'पोलीस तपासनीस' बहुधा म्हणत नाहीत. सामान्यत: कोणताही तपासणी करणारा अधिकारी 'तपासनीस' समजला जातो. उलट Inspector General of Police अथवा Inspector General of Prisons हे मोठे अधिकारी असून ते तपासणीचे काम मुळीच करीत नाहीत. मुख्यत्वेकरून 'शाळा तपासनीस' वगैरे शब्दांपुरती या संज्ञेची व्याप्ती सध्या आढळून येते. 'Supervisor' अशा अर्थीही तो वापरण्यात येतो, असे 'महाराष्ट्र शब्दकोशा' वरून दिसून येते. Ticket Checker म्हणजे 'तिकीट तपासनीस' यात तो Checker या शब्दाचाही पर्याय म्हणून घेतला आहे. Medical Examination म्हणजे वैद्यकीय तपासणी, Cross Examination म्हणजे उलटतपासणी. यात 'तपासणी' चा संबंध Examination या कल्पनेशी आहे. वरील उदाहरणांवरून 'तपासणी' हा शब्द अतिव्याप्त असून तो Inspection या शब्दाचा तंतोतंत पर्याय होऊ शकत नाही. वेब्स्टरच्या Dictionary of Synonyms मध्ये

Scrutinize, Examine इत्यादी समान अर्थाच्या शब्दांच्या कक्षेत Inspection हा शब्द घातला असून त्याचा अर्थ पुढीलप्रमाणे दिला आहे :

" Inspect or Inspection in general use often imply a little more than a careful observation, but in legal, military and Governmental use they imply a searching scrutiny for possible errors, defects, flaws, shortcomings, or the like. "

' तपासणी ' हा शब्द केवळ वरील व्याख्येतील अर्थापुरताच मर्यादित नसून त्याबरोबरच Examine, Check, Supervise अशा अनेक अर्थांच्या छटा त्यात अंतर्भूत होतात. मुख्यत्वेकरून Examine या अर्थी त्याचा अधिक वापर होतो. Inspector या शब्दाचा ' तपासनीस ' हा पर्याय, परिभाषा ही नेमकी व एकार्थक असावी या लक्षणाशी जुळणारा नाही.

' तपासनीस ' या शब्दाच्या जोडीचे व त्याच धर्तीवर सोपी परिभाषा म्हणून सुचवण्यात आलेले ' चौकसनीस ', ' देखरेखनीस ' किंवा ' देखरेखदार ', ' सरनीस ' हे शब्द एकाच कुळात बसणारे आहेत. Investigator साठी सुचवलेला ' चौकसनीस ' हा शब्द ' तपासनीस ' प्रमाणेच अतिव्याप्त आहे. महाराष्ट्र शब्दकोशात या शब्दाचे पुढील अर्थ दिले आहेत :

" चौकसनीस : तपासनीस, पाहणी करणारा ; देखरख करणारा ; इन्स्पेक्टर. "

Investigation या शब्दात ' चौकशी ' पेक्षा ' तपास ' लावण्याची कल्पना अधिक अभिप्रेत आहे. वेब्स्टरने या शब्दाची अर्थच्छटा पुढीलप्रमाणे स्पष्ट कली आहे :

" Investigation applies to an inquiry which has for its aim the uncovering of the facts and the establishment of the truth. "

' देखरेखनीस ', ' देखरेखदार ' हे Supervisor साठी सुचवलेले शब्द महाराष्ट्र शब्दकोशात दिलेले नाहीत. बहुधा ते वरील शब्दांच्या धर्तीवर बनवण्यात आले असावेत. Supervision या शब्दाची अर्थच्छटा वेब्स्टरच्या समानार्थी कोशानुसार पुढीलप्रमाणे आहे :

" Supervision carries the strongest implication of authoritative powers of responsibility and of superintendence. "

'देखरेख' या शब्दाचा महाराष्ट्र शब्दकोशातील अर्थ 'नजर ठेवणे चौकशी, पाहणी, पैरवी' असा असून त्यानुसार Supervision मधील' अर्थाची संपूर्ण कल्पना त्यात व्यक्त होत नाही. 'देखरेख' मधील कल्पना मुख्यत्वेकरून 'नजर ठेवणे' या अर्थापुरती मर्यादित असल्यामुळे, हा शब्द अव्याप्त ठरतो. शिवाय, या शब्दाचा वापरही सैलपणे होतो हे, त्याचे 'नजर ठेवणे' याच्या जोडीला जे इतर पर्याय दिले आहेत त्यावरून लक्षात येईल. 'देखरेखदार' किंवा 'देखरेखनीस' या शब्दांतील 'दार' वा 'नवीस' हे प्रत्यय मूळ Supervision मध्ये असलेल्या अधिकाराच्या कल्पनेचे वाचक ठरू शकत नाहीत. 'नवीस' (नविस्तन्-लिहिणे) हा 'लिहिणारा' या अर्थाचा फार्शी प्रत्यय असून Supervision मध्ये लिहिण्याच्या कल्पनेचा मुख्यार्थाने संबंध येत नाही.

Superintendent साठी सुचवलेला 'सरनीस' हा शब्द कोशात नाही व तो पूर्वीही वापरात नव्हता. तो तयार करण्यात आला आहे तोही चुकीच्या पद्धतीने. 'सर' म्हणजे वरिष्ठ, सर्वोच्च. याच अर्थी तो 'सरहिशेबनीस' (Accountant General), 'सर-तपासनीस' (Inspector General) या सुचवण्यात आलेल्या शब्दांत वापरला आहे. पण 'सरनीस' हा शब्द Superintendent साठी घेतला म्हणजे 'सर' याचा अर्थ 'सर्वोच्च' असा करता येणार नाही. तेथे तो केवळ 'मुख्य', 'वरचा' या अर्थीच घ्यावा लागेल. म्हणजे 'सर' या प्रत्ययाच्या वापरात अर्थसंगती राहत नाही. एके ठिकाणी त्याचा अर्थ 'सर्वोच्च', तर दुसऱ्या ठिकाणी तो केवळ 'मुख्य', 'वरचा' या अर्थी वापरला जाणार. प्रत्ययसंगतीचा मुद्दा सोडला तरी 'नवीस' या पदाच्या मागे नेहमी नाम येते, विशेषण नाही. अखबारनवीस, वाकेनवीस, चिटनवीस, नकलनवीस इत्यादींत पूर्वपद नामच असलेले दिसून येईल. कदाचित शिवकालात 'सुरनीस' म्हणून जे अधिकारपद होते त्या संज्ञेशी या शब्दाची गल्लत करण्यात आली असावी! दिवाण दप्तराचा

सर्वात वरिष्ठ अधिकारी व प्रधानमंडळात 'सचिवा'[1] चा दर्जा असलेला 'सुरनीस' हा आजच्या Superintendent शी समकक्ष मानणे चुकीचे ठरेल. या संज्ञेतील पूर्वपद 'सुर' (सुरू या अर्थी) असून ते कागदपत्र, सनदा वगैरेवर 'सुरू' हा शब्द लिहिण्याचे दर्शक आहे.[2]

सुचवण्यात आलेले वरील शब्द वापरातील व सामान्यपणे समजतील असे असले तरी ते अन्वर्थक व परिभाषा म्हणून योग्य आहेत की नाहीत हाच खरा प्रश्न आहे. परिभाषेच्या कसोटीस ते कसे उतरू शकत नाहीत व त्यांतील काही पर्याय तर शब्दसिद्धीच्या दृष्टीने कसे चुकीचे आहेत हे वर दाखवण्यात आले आहे. तंतोतंत व बिनचूक अर्थ व्यक्त करणारे पर्याय रूढ शब्दांतून जेव्हा घेता येत नाहीत त्यावेळी एखादा अन्वर्थक शब्द मध्यवर्ती कल्पनेसाठी घेऊन त्यापासून त्याचे सजातीय कुल तयार करणे आवश्यक ठरते. नवीन शब्दनिर्मिती अगतिक परिस्थितीतच करण्यात यावी हे तत्वतः बरोबर असले तरी प्रशासनातील व्यावहारिक अडचणी सोडवण्यासाठी वरील मार्गाचा बरेचदा अवलंब करणे भाग पडते. संस्कृतातील उपसर्ग व प्रत्यय हे, या दृष्टीने फार्शीच्या प्रत्ययोपसर्गादिकांपेक्षा मराठीला अधिक जवळचे व परिचित, ठराविक व निश्चित अर्थाचे, शास्त्रीय स्वरूपाच्या भाषेत नित्यशः उपयोगात येणारे आणि इतर भारतीय भाषांशी ठेवायच्या एकरूपतेचा निर्वाह करणारे असे आहेत. Inspector साठी त्याच अर्थकक्षेत बसणाऱ्या शब्दांचे कुल तयार करावयाचे म्हणजे त्यातील मुख्य कल्पना (Spect-L. *Specis*=Look) 'पाहणे' ही आधाराला घ्यावी लागेल. 'परीक्षक' सारख्या शब्दात 'ईक्षक' = 'पाहणारा' या शब्दघटकात ती व्यक्त झाली आहे. तिच्या

---

[1] 'युक्तभिज्ञो दबीरः स्यात् सुर्नीसः सचिवस्तथा'—(राजवर्ग)
—राज्यव्यवहारकोश, पृ. ११.

[2] शं. ना. जोशी : अर्वाचीन महाराष्ट्रेतिहासकालातील राज्यकारभाराचा अभ्यास, पृ. १४०.

आधारावर या शब्दकुलातील इतर पर्याय अन्वर्थक उपसर्गांचा उपयोग करून पुढीलप्रमाणे तयार करता येतील :

| | | |
|---|---|---|
| Examiner | .. | परीक्षक |
| Inspector | .. | निरीक्षक |
| Supervisor | .. | पर्यवेक्षक |
| Superintendent | .. | अधीक्षक |
| Scrutinizer | .. | परिनिरीक्षक |
| Surveyor | .. | सर्वेक्षक |
| Overseer | .. | अवेक्षक |

वरील शब्दांवरून त्यांची संबंधी नामविशेषणादी व्याकरणरूपे 'निरीक्षण', 'निरीक्षणात्मक', 'निरीक्षण करणे' अशा पद्धतीवर सुटसुटीतपणे तयार होऊ शकतात.

'तपासनीस' हा शब्द रूढ उपयोगाप्रमाणे Inspector यासाठी वापरण्यात आला नाही म्हणजे त्याची भाषेतून हकालपट्टी झाली, असा त्याचा अर्थ नव्हे. प्रशासनाची भाषा ही सामान्य व्यवहार-भाषेतूनही शब्द घेत असते, पण त्या शब्दांना सामान्य वापरात जी अर्थनिश्चिती नसते ती त्यांना देऊन पारिभाषिक स्वरूपात त्यांचा ती स्वीकार करते. 'तपासनीस' या शब्दाला विवक्षित अर्थाची मर्यादा घालून तो Checker किंवा Searcher या शब्दांसाठी वापरता येईल. तेव्हा परिभाषेच्या प्रयोजनासाठी नवीन शब्द तयार करण्यात आल्याने भाषेची शब्दसंपत्ती रोडावेल असे म्हणणे वस्तुस्थितीस धरून नाही. उलट जुन्या शब्दांच्या जोडीला नवीन अर्थपूर्ण शब्दांची भाषेत त्यायोगे भरच पडेल. 'शब्दसंग्रह संपन्न होतो तो केवळ त्याची संख्या फुगीर असते म्हणून नव्हे, तर प्रत्येक शब्दाला जितक्या विविध संदर्भात जितके विविध अर्थ किंवा अर्थच्छटा व्यक्त करण्याची संधी मिळते त्यामुळे,' असा युक्तिवाद करून नव्या शब्दांच्या निर्मितीची अनावश्यकता प्रतिपादण्यात येते. शब्दांचे अनेकार्थत्व हा साहित्यिक भाषेचा गुण ठरू शकेल. परिभाषेसाठी निश्चित शब्द निश्चित अर्थीच वापरणे जरूर असते.

सदर 'तपासनीस' हाच शब्द घेतला तर रूढ भाषेतील वापराप्रमाणे प्रशासनाच्य भाषेत तो Inspector, Examiner, Supervisor, Checker, Investigator, Scrutinizer इत्यादी अनेक अर्थांत एकाच वेळी वापरता येणे कसे अशक्य आहे, हे वेगळे सांगण्याची जरुरी नाही.

**जुनी परंपरा**

याच संदर्भात आणखी एक मुद्दा विचारात घेण्याची आवश्यकता आहे. मराठीत शिवकाली वा नंतरही संस्थानी कारभारात रूढ असलेले फडणीस, कोटनीस, चिटणीस, सुभेदार वगैरे काही परिचित शब्द आजच्या शासनव्यवहाराच्या कामासाठी उपयोगात आणण्याच्या दृष्टीने पुनरुज्जीवित करावे, असाही विचार पुष्कळदा मांडण्यात येतो. या विचारांत वावगे असे काही नाही. भाषेची व तिच्याद्वारे इतिहासाची परंपरा कायम राहिली तर ती अवश्यच राहावी. पण असे करताना प्रत्येक शब्दाची पूर्ण परीक्षा करून तो आजच्या बदललेल्या परिस्थितीत व शासनव्यवहाराच्या वेगळ्या परंपरेत बसू शकतो की नाही, हे मात्र पाहिले पाहिजे. याशिवाय अशा शब्दांचा सामान्य भाषेतल्याप्रमाणे सुटा, वेगळा विचार करून चालणार नाही. राज्यकारभाराच्या दृष्टीने एक कल्पना दुसऱ्या अनेक कल्पनांशी व एक काम इतर अनेक कामांशी संबद्ध असते. हा संबंध व त्यांतील संगती या गोष्टींकडे दुर्लक्ष होता कामा नये. या दृष्टीने पदसंज्ञा पूर्वीच्या परंपरेतून घेऊन त्या आजच्या शासनपरंपरेत बसविणे हे वाटते तेवढे सोपे नाही. यांत भाषेविषयीचा व परंपरेविषयीचा अभिमान असला तरी शासन-व्यवस्थेचे आजचे जे स्वरूप आहे त्याच्याशी विसंवादी व व्यवहाराच्या दृष्टीने गैरसोयीचा असा हा प्रयत्न ठरतो. मुळात असे शब्द एक विवक्षित कल्पना, संदर्भ घेऊन तयार झालेले असतात व वापरात असतात. पेशव्यांच्या वेळचे 'फडणिशी' खाते आणि आजचा सचि-वालयातील 'वित्त विभाग' या दोहोंतील मूलभूत कल्पनांत आज केवढी तफावत पडली आहे! दुसरे 'चिटणीस' वगैरेसारखे शब्द असे आहेत की ते दीर्घकालीन वापराच्या प्रक्रियेत परिस्थितीनुसार

वेगवेगळे संदर्भ व अर्थच्छटा ग्रहण करीत मूळ अर्थापासून सुटले आहेत. ते विशिष्टार्थदर्शक राहिले नसल्याने प्रशासनाच्या परिभाषेसाठी उपयोगी पडू शकत नाहीत. आजच्या सामान्य व्यवहारातील कोणत्याही संस्थासमारंभाचे 'चिटणीस' हे शिवकालातील 'चिटणीस' खासच नव्हेत ! पारिभाषिक दृष्टचा शब्दाची निवड करायची तर समानार्थक शब्दांतून कमी वापरातला, दैनंदिन व्यवहाराच्या कक्षा ज्याला नित्यश: स्पर्श करीत नाहीत असा थोडासा अपरिचित शब्द घेऊन त्याचा अर्थ त्या नेमक्या कल्पनेपुरता मर्यादित करावा लागतो. या कारणा-साठीच Secretary या शासनातील उच्च पदासाठी शब्द निश्चित करताना 'चिटणीस', 'कार्यवाह', 'सचिव' अशा शब्दांपैकी 'सचिव' शब्द घेणे योग्य ठरते. शासनाखेरीज इतर व्यवहारात, चिटणीस, कार्यवाह वगैरे शब्द वापरात राहिले तरी त्यामुळे प्रशासनास बाध येत नाही.

'सुभेदार' हा शिवकालातील 'देशाधिकारी' इंग्रजीतील Commissioner साठी हा पर्याय आजच्या प्रशासनव्यवस्थेत कितपत बसू शकेल व शोभून दिसेल ?[२] 'सुभा' म्हणजे आज विभाग (Division) म्हणून ओळखला जातो तो राज्यातील प्रदेश असे समजून त्याचा मुख्य अधिकारी तो 'सुभेदार' अशी या शब्दाची व्यवस्था लावावी लागेल. म्हणजे Division साठी 'सुभा' हा पर्याय घ्यावा लागेल आणि त्याच्याशी संबंधित इतर अनेक पर्याय त्याप्रमाणे तयार करावे लागतील. हे केले नाही तर 'सुभेदार' या सुटच्या पदनामाचा स्वतंत्र Commissioner असा अर्थ घेणे कठीण होईल. याशिवाय अन्यत्र 'सुभेदार' असा पर्याय आजच्या पदनामांत कोठे असला तर त्याची सदर अर्थाशी गल्लत होऊ नये म्हणून तो बदलावा लागेल. 'कोतवाल' हा पोलीस विभागाचा प्रमुख अधिकारी पूर्वीच्या व्यवस्थेत असला तरी आजच्या बदललेल्या प्रशासनप्रकारात त्याची

---

[१] "सुभेदारस्तु देशाधिकारीति-परिभाषित:"—राज्यव्यवहारकोश, पृ. ४८.

[२] "सुभेदार—सुभ्यावरील अधिकारी, गव्हर्नर"—महाराष्ट्र शब्दकोश.

सोय लावणे असेच कठीण जाईल. महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांत कोठे 'पोलीस सुपरिंटेंडेन्ट', तर कोठे 'सब-इन्स्पेक्टर' अशा अर्थी हा शब्द आजही वापरात आहे. खेडेगावात 'कोतवाल' हा एक लहान दर्जाचा कर्मचारी आहे तो वेगळाच. Superintendent साठी 'नायक' किंवा 'नाईक' हा पर्याय घेणे याच दृष्टीने गैरसोयीचे होईल. हे पर्याय 'कोतवाल' या शब्दाप्रमाणे इतर पदांसाठी आधीच रूढ आहेत. पण या सर्वांहून महत्त्वाचा मुद्दा असा की, वरीलसारख्या शब्दांचा जुन्या परंपरेतील मूळ अर्थ कधी वेगळा असतो, तर कधी तो वापराने बदललेला असतो. 'कारकून' हाच शब्द घेतला तर तो शिवकाली 'कार्यकारक' म्हणजे 'वरिष्ठ अधिकारी' अशा अर्थी वापरात होता. याहून लगेच वरची जागा जी 'सरकारकून' तिचा अमात्यमंडळात समावेश होई.[१] पण तोच 'कारकून' हा शब्द इंग्रजी अंमलात खालच्या दर्जाच्या जागेसाठी उपयोगात येऊ लागला व या पदाशी एक कनिष्ठतेची भावना निगडित झाली. निकटच्या इतिहासकालातील पदनामे घेण्यात अशा रीतीने अनेक अडचणी उपस्थित होतात. त्या टाळण्याच्या दृष्टीने पदसंज्ञा पूर्वपरंपरेतील घ्यायच्या झाल्या तर त्या प्राचीन काळातील घेतलेल्या एकपरी चालतील. कारण आज त्यांचा वापर नसल्याने त्या विशिष्ट अर्थी राबवून घेता येतील. 'आयुक्त' हा असाच अशोककालीन शब्द असून त्याचा 'विशिष्ट विभागाधिकारी' म्हणून वापर होत असे. 'अधिकरण' (न्यायाधिकरण-Tribunal), 'अधिवक्ता' (Advocate), 'दंडनायक' (दंडाधिकारी-Magistrate) इत्यादी अधिकारदर्शक संज्ञा चाणक्याच्या अर्थशास्त्रात आढळत असून त्या काळी त्या प्रचारात होत्या. अशी पदनामे घ्यायची ती अर्थातच आजच्या शासनव्यवस्थेत ती सामावू शकली किंवा थोडाफार बदल करून आजच्या अर्थाशी अनुकूल करून घेता आली तरच घ्यावीत.

[१] शं. ना. जोशी : अर्वाचीन महाराष्ट्रेतिहासकालातील राज्यकारभाराचा अभ्यास, पृ. २६.

पदसंज्ञा वगळल्या तर इतर पारिभाषिक शब्द व शासनोपयोगी अभिव्यक्तीचे प्रकार पूर्वीच्या मराठी परंपरेतून आणि त्याहीपूर्वीच्या भारतीय परंपरेतून घेता येण्यासारखे आहेत. 'गणराज्य', 'संसद', 'परिषद', 'विधि', 'राजदूत', 'सदस्य', 'सत्र', 'मंत्री', 'सचिव', 'दल', 'निकाय', 'निगम' इत्यादी भारत सरकारने घेतलेली शासनविषयक परिभाषा वर्तमानकालीन शासनकल्पनांचा प्राचीन भारतीय परंपरेशी दुवा जोडणारी आहे. राज्यशास्त्र, विधी, वैद्यक, वास्तुशास्त्र, कृषी इत्यादी निरनिराळ्या विषयांतील परिभाषा थोडीफार आजही या दृष्टीने उपयोगी पडू शकेल. परकीय वर्चस्वाच्या काळात या सांस्कृतिक मूलधनाचा आपल्याला उपयोग करून घेता आला नाही. जुन्या ग्रंथांतील ही परिभाषा केवळ परंपरेशी संबंध जोडण्यापुरतीच उपयोगी पडेल असे नाही, तर अनेक शतके वापरात असलेल्या या शब्दांचा आजच्या परिभाषेला अर्थनिश्चिती आणण्यासाठीही उपयोग करून घेता येईल. त्याबरोबरच पूर्वपरंपरेशी अशी सांगड घातली गेल्यामुळे या परिभाषेला एक स्थायी स्वरूप येईल. भारतीय परंपरेबरोबरच मराठीची स्वतःची अशी जी परंपरा आहे तिचाही, कालोचित ठरेल व परिभाषेच्या पद्धतीत बसेल अशा रीतीने, डोळसपणे उपयोग करता येईल. मुसलमानी राजवटीत मराठीने ग्रहण केलेल्या व नंतर स्वतःच्या परंपरेत सामावून घेतलेल्या कल्पना व शब्द यांचीही दखल परिभाषा ठरवताना वरील कारणासाठीच घेतली जावी. 'वाद', 'अभियोग' हे भारतीय परंपरेतले शब्द घेतानाच 'फिर्याद, खटला' हे मराठी परंपरेतलेही शब्द घेणे योग्य ठरेल. 'शुल्का' बरोबरच 'जकात', 'प्राप्ति', 'उत्पन्न' यांबरोबरच 'महसूल', 'सारा', 'संमतिपत्रा' बरोबरच 'करारनामा', 'निक्षेपा' बरोबरच 'बयाना' व 'स्वामित्वा' बरोबरच 'मालकी' या शब्दांना मराठीचे अविभाज्य अंग म्हणून या परिभाषेत स्थान द्यावे लागेल. परंतु परिभाषेच्या आजच्या नव्या घडणीत जसे सारेच प्राचीन भारतीय येणार नाही, तसे मराठीतील सारेच जुने टिकणार नाही. या जुन्याचा उपयोग करून

घ्यायचा तो नवीन घडवायचे आहे म्हणून. नव्या गरजांच्या दृष्टीने जुन्यावर संस्कार करून घेता आले तर जुने टिकवता येईल व नवीन घडवताही येईल. यासंबंधीचा यथार्थ दृष्टिकोन कसा असावा हे, युनेस्कोच्या पूर्वी उल्लेखिलेल्या प्रतिवेदनात पुढीलप्रमाणे स्पष्ट केले आहे :

> "The salvage of indigenous cultures is only conceivable given the preservation, in its essence, of the idiom in which those cultures have been expressed, and this can only be done if the idiom in question succeeds in adapting itself to the new needs .............. for a people desirous of preserving their heritage, no price could be too high in effort to adapt their language to the needs which circumstances impose upon them."[१]

नवी परिभाषा घडवताना सारी जुनी संस्कृत परिभाषा पूर्वी होती तशीच आणायची आणि उपयोगी पडतील असे व मराठीने पूर्ण पचविलेले इतर भाषांतील शब्दसुद्धा बदलायचे असे धोरण ठेवता येणार नाही. तसे करणे म्हणजे आजच्या पूर्वीहून अगदी वेगळ्या नव्या व्यवस्थेसाठी व तिच्या व्यवहारसौकर्यासाठी हा सारा प्रयास आहे, हे विसरणे होय. पण त्याचबरोबर संस्कृतनिष्ठ म्हणून, बाळबोध नाहीत म्हणून, जुन्या भारतीय परंपरेतून उचललेले संस्कृत भाषेतील अर्थवाही शब्द त्याज्य समजायचे आणि मराठीत जे शब्द पूर्वीपासून रूढ आहेत, मराठी परंपरेशी जे निगडित आहेत तेच केवळ घ्यायचे असे म्हणणे म्हणजेही नव्या गरजांकडे डोळेझाक करणेच होय. परंपरेच्या केवळ आत्यंतिक अभिमानाने कोणतीही परंपरा टिकून राहात नाही. नवे सामावून घेऊन जुने टिकवण्याच्या चिवटपणातूनच परंपरा जगत असतात.

### नवी परंपरा

इंग्रजी अमदानीच्या सुरुवातीच्या काळापासूनच 'दर्पण', 'प्रभाकर' इत्यादी वृत्तपत्रांनी मराठी भाषेविषयीचा जो अभिमान व जागरूक वृत्ती धारण केली ती पुढील पिढ्यांत वाढीस लागून

[१] *The Use of Vernacular Languages in Education* (*UNESCO—1953*), p. 74.

'निबंधमाला', 'केसरी' वगैरेसारख्या नियतकालिकांनी व त्याच परंपरेत वाढलेल्या नंतरच्या वृत्तपत्रांनी अगदी अलीकडील काळापर्यंत लोकशिक्षणाबरोबरच भाषाशिक्षणाचेही महत्त्वाचे कार्य केले. शासन, राजकारण, अर्थकारण, व्यापारउदीम या सर्व क्षेत्रांशी संपर्क ठेवून त्यांनी या विषयांतील शब्दसंग्रह पुष्कळच वाढवला. मराठी भाषेच्या आधुनिक घडणीतील ही त्यांची कामगिरी महत्त्वाची आहे. त्यांनी या निमित्ताने शासनविषयक व संबंधित स्वरूपाचा जो शब्दसंग्रह निर्माण केला, तो बहुतांशी रूढही झाला. या प्रचलनामुळे वृत्तपत्रीय परिभाषेलाही आज एका परंपरेचे स्वरूप आले आहे. परिभाषानिर्मितीचा आज प्रयत्न चालू असताना ही नवी परंपरा चालू राहावी असा आग्रह करण्यात येतो. 'वृत्तपत्रांच्या ऐरणीवर अहर्निश ठोकून घडवल्या जात असलेल्या' या परिभाषेने स्वीकारता येतील असे अनेक चांगले शब्द मराठीला दिले हे निःसंशय. पण तिने जे जे काही घडवले ते सारेच आज उपयोगी पडेल असे, नाही. 'नगरपालिका', 'महापौर', 'महामंडळ', 'उच्चाधिकार समिती', 'अधिवेशन', 'प्रवर समिती', 'प्रतोद', 'अर्थसंकल्प', 'निर्देशांक', 'नियोजन', 'आचारसंहिता', 'नभोवाणी', 'अवमूल्यन', 'परिसंवाद', 'शिशुविहार', 'आरोग्यधाम', 'राष्ट्रकुल, 'श्वेतपत्रिका', 'क्षेपणास्त्र' असे कितीतरी शब्द आहेत की ज्यांना परिभाषेत स्थान मिळणे आवश्यक आहे. परंतु शासनव्यवहाराच्या विशिष्ट गरजा, त्यातील बारकावे व काटेकोरपणा लक्षात घेता आणि परिभाषेच्या स्वरूपाचा विचार करता वृत्तपत्रांनी तयार केलेल्या शब्दांपैकी पुष्कळसे जर बदलावे लागले तर अशा परिवर्तनाचा रूढतेच्या कारणास्तव विरोध करण्यात येऊ नये; अथवा हे परिवर्तन 'जुन्याशी फारकत करण्याच्या वृत्तीतून व संस्कृतीकरणाच्या प्रवृत्तीतून' घडत आहे, असेही समजण्यात येऊ नये. बदलणे जरूर असलेल्या वृत्तपत्रीय पर्यायांची काही उदाहरणे घेऊन हा मुद्दा स्पष्ट करता येईल.

वृत्तपत्रीय मराठीत Council साठी 'मंडळ' हा शब्द रूढ आहे. परंतु नव्या परिभाषेत त्यासाठी 'परिषद' हा पर्याय घेण्यात आला आहे.

हा बदल का करण्यात आला ? ‘ मंत्री मंडळ ’ आणि ‘ मंत्री परिषद ’ हे दोन पर्याय घेतले तर वृत्तपत्रीय परिभाषेला त्यात फरक करण्याची आवश्यकता वाटत नाही. परंतु शासनव्यवहाराच्या दृष्टीने असा फरक करणे जरूर आहे. Cabinet साठी घेतलेला मंत्री मंडळ ’ हा एकच पर्याय Council of Ministers साठी वापरून त्या दोहोतील फरक दाखवता येणे शक्य आहे काय ? वृत्तपत्रीय भाषेने या तांत्रिक बारकाव्याकडे दुर्लक्ष केले तरी चालू शकते. पण राज्यकारभाराच्या भाषेला त्याची दखल घ्यावीच लागते. केंद्र सरकारच्या संसदेच्या दोन सदनांसाठी ‘ लोकसभा ’ व ‘ राज्यपरिषद ’ हे पर्याय अनेक वर्षे संविधानाने रूढ केले आहेत. महाराष्ट्र राज्यातही विधानमंडळाचे ‘ विधानसभा ’ व ‘ विधानपरिषद ’ हे दोन भाग असून त्यांची नावे लोकांना परिचित आहेत. या दोन्ही ठिकाणी Council साठी ‘ परिषद ’ हा पर्यायच वापरात आहे. ‘ परिषद ’ या शब्दाचा आता शासनव्यवहाराच्या परिभाषेत अर्थ निश्चित झाला आहे. ही निश्चित परिभाषा टाकून सामान्य व्यवहारात सैलपणे वापरण्यात येणारा शब्द त्या जागी वापरावा, असे कोणी म्हणणार नाही. सामान्य जनतेच्या भाषेत व राज्यकारभाराच्या भाषेत वेगळेपणा कसा निर्माण होतो, हे यावरून लक्षात येईल.

दुसरे उदाहरण, ‘ विभागाध्यक्ष ’ या शब्दाचे घेता येईल. ‘ खात्याचे मुख्य ’ हा पर्याय वापरून ‘ विभागाध्यक्ष ’ व ‘ विभागप्रमुख ’ यांतील शासनाच्या दृष्टीने आवश्यक असलेला फरक व्यक्त करता येणार नाही. दोघेही विभागाचे मुख्य असले तरी ‘ विभागाध्यक्षांना ’ (Heads of Department) ज्या विशेष ‘ शक्ती ’ (powers) देण्यात आल्या आहेत, त्या ‘ विभागप्रमुखांना ’ (Departmental Heads) नसतात. हा भेद व्यक्त करण्यासाठी शासनव्यवहारातील भाषेला वृत्तपत्राच्या भाषेतील सरासरी व ढोबळमानाचे वाकप्रयोग उपयोगी पडू शकत नाहीत.

आणखी एक उदाहरण म्हणून ‘ विद्याधिकारी ’ हा शब्द घेऊ. Director of Education साठी हा पर्याय वृत्तपत्रांत वापरात होता.

पण या पर्यायात सदरहू पदाची व्यवच्छेदकपणे कल्पना येऊ शकते काय ? 'विद्या' हा शब्द आज Education या अर्थी फारसा प्रचारात नाही. शास्त्रीय दृष्टीने विचार करता, 'विद्या' व 'शिक्षण' यांतही फरक आहे व तसा तो करण्यात आला पाहिजे. पण 'विद्याधिकारी', किंवा तो बदलून 'शिक्षणाधिकारी' असा शब्द घेतला तरी तो स्पष्टार्थक आहे, असे म्हणता येणार नाही. शिक्षण विभागात एकच नव्हे तर अनेक अधिकारी असतात. ते सारेच शिक्षणाधिकारी आहेत. अधिकार व कामे या दृष्टीने त्या सर्व अधिकाऱ्यांत कोणता फरक आहे हे दाखवण्यासाठी विशिष्टार्थवाचक परिभाषा शासन-व्यवहाराच्या भाषेला तयार करावी लागते. व वृत्तपत्रांनी रूढ केलेल्या वरील अतिव्याप्त शब्दांच्या ऐवजी 'शिक्षण संचालक' अशा-सारखा निश्चित अर्थाचा पर्याय नव्याने प्रचारात आणावा लागतो.

अशीच आणखी उदाहरणे द्यायची तर 'मासेमारी खाते', 'अबकारी खाते' या रूढ शब्दांचीही देता येतील. 'मासेमारी' खात्याच्या पूर्वीच्या कल्पनेत आज कितीतरी बदल झाला आहे. या विभागाच्या कक्षेत केवळ मासेमारीचाच समावेश होत नसून माशांपासून तयार होणाऱ्या पदार्थांची निर्मिती वगैरे त्याच्याशी संबंधित इतर अनेक गोष्टीही समाविष्ट होतात. त्या दृष्टीने 'मत्स्यव्यवसाय' ही व्यापक संज्ञाच अधिक समर्पक ठरणार आहे. 'अबकारी' या शब्दाचेही तसेच आहे. पूर्वी केवळ दारूपासूनचे उत्पन्न त्यात घेण्यात येई. पण आज Excise या शब्दाची व्याप्ती इतकी वाढली आहे की 'अबकारी' हा शब्द गैरलागू ठरतो. त्यासाठी 'उत्पादन शुल्क' हा पर्याय घ्यावा लागतो तो या शब्दातील अभिप्रेत कल्पना यथार्थ रीतीने व संपूर्णपणे व्यक्त करता यावी म्हणून.

वृत्तपत्रांची भाषा ही मुख्यत्वेकरून सामान्य जनतेसाठी असते. कोणत्याही विषयाची सामान्य जनतेची आकलनशक्ती लक्षात घेऊनच त्यांना लिहावे लागते. म्हणूनच सकृद्दर्शनी समान वाटणाऱ्या, पण त्या त्या क्षेत्रांतील व्यवहाराच्या व गरजांच्या दृष्टीने फरक

करण्यात आलेल्या कल्पनांचे सूक्ष्म बारकावे समजून घेण्याची व त्यांसाठी समर्पक असे वेगवेगळे शब्द शोधण्याची त्यांना आवश्यकता वाटत नाही आणि वेळेच्या दडपणाखाली त्यांना ते शक्यही होत नाही. प्रशासनात किंवा अशाच सारख्या इतर विशिष्ट व्यवहारक्षेत्रात हा बारकावा लक्षात घेतला नाही, तर त्यामुळे अडचणी निर्माण होतील. विधानमंडळाच्या कामात Assent व Consent .या दोन कल्पना वेगवेगळ्या असून त्यांतील भेद दर्शवावा लागतो. तेव्हा चालू भाषेत यासाठी वापरात असलेला 'संमती' हा एकच पर्याय तेथे उपयोगी पडणार नाही. सामान्य अर्थी व सामान्य भाषाप्रयोगानुसार Consent चा 'संमती' हा पर्याय घेऊन Assent मधील विशेष अर्थ व्यक्त करण्यासाठी 'अधिसंमती' हा वेगळा शब्द प्रशासनाच्या भाषेला घेणे जरूर पडते. अशाच जवळपास अर्थाचे पण वरील कल्पनांहून वेगळी अर्थच्छटा असणारे Concurrence व Approval हे दोन शब्द प्रशासनिक कामकाजात प्रयुक्त होतात. वृत्तपत्रीय परिभाषेत या दोन्ही शब्दांना 'संमती' हा पर्याय चालू शकेल. पण प्रशासनाच्या भाषेत या दोन कल्पनांत तर फरक करावाच लागेल, पण त्याबरोबरच त्यांचे पर्याय विधानमंडळात प्रयुक्त असलेल्या Assent व Consent यांच्या पर्यायाहून वेगळे घ्यावे लागतील. या कारणासाठी 'सहमती' व 'मान्यता' असे विशिष्टार्थवाचक शब्द परिभाषा म्हणून प्रशासनाच्या भाषेला स्वीकारणे भाग पडेल. वर्तमानपत्रांच्या भाषेत Session म्हणजे बैठक, व Sitting म्हणजेही बैठक. पण एका Session मध्ये एकाहून अधिक Sittings असतात. हा भेद विधानमंडळाच्या भाषेला आपल्या कामकाजाच्या दृष्टीने करणे प्राप्त आहे. Sitting साठी सामान्य भाषेतला 'बैठक' हा शब्द ठेवून Session साठी 'सत्र' हा पर्याय म्हणूनच घ्यावा लागतो. याच दृष्टीने Debate व Discussion साठी वृत्तपत्रातल्याप्रमाणे 'चर्चा' हा एकच शब्द न घेता त्यासाठी अनुक्रमे 'अभिचर्चा' व 'चर्चा' हे दोन

शब्द निश्चित करावे लागतात. Schedule, Appendix, Annexure, Addendum ही सर्व वृत्तपत्रांच्या भाषेत 'परिशिष्टे' ठरतात. पण प्रशासनासाठी अनुक्रमे 'अनुसूची', 'परिशिष्ट', 'जोडपत्र', 'पूरकपत्र' अशा शब्दांनी त्यांतील भेद दाखवावा लागतो. Factory, Workshop हे सामान्य भाषेत एकच. पण शासनव्यवहारात ते एक नव्हेत व म्हणून त्यासाठी 'कारखाना' व 'कर्मशाळा' असे दोन शब्द पाहिजेत. वरील सारखी आणखी कितीतरी उदाहरणे देता येतील. लोकव्यवहारात प्रयुक्त होणारी परिभाषा ही अशा रीतीने यथार्थवाची नसल्यामुळे व शासनाच्या गरजांना अपुरी ठरत असल्यामुळे राज्यकारभाराच्या भाषेसाठी नवे शब्द व नव्या अभिव्यक्ती शोधाव्या लागतात.

सामान्य जनतेची आकलनशक्ती हाच वृत्तपत्रीय भाषेचा मापदंड असल्यामुळे सोपेपणावर त्यांना भर द्यावा लागतो. या सोपेपणाच्या कल्पनेतून सामान्य भाषेतील शब्दांना परिभाषेचे स्थान देण्यात आल्यामुळे, आतापर्यंत आजच्या प्रशासनिक भाषेच्या दृष्टीने समर्पक ठरणार नाहीत असे अनेक शब्द रूढ झाले. Government Servant म्हणजे 'सरकारी नोकर', Government Service म्हणजे 'सरकारी नोकरी' हे शब्द पहा. स्वातंत्र्यपूर्व काळात या कामाकडे ज्या दृष्टीने पाहत ती आजच्या लोकशाहीच्या युगात बदलली आहे. सरकारी नोकर हा 'लोकसेवक' (Public Servant) आहे. नोकर या शब्दामागे जी कमीपणाची भावना आहे ती आजही चालू ठेवणे योग्य नाही. 'कारकून' या शब्दाचेही अलीकडील काळात सामाजिक प्रतिष्ठेच्या दृष्टीने अवमूल्यन झाले आणि ते काम करणाऱ्या लोकांत हा शब्द अप्रिय ठरला. प्रशासनव्यवहाराला एक प्रकारची शिष्टता, प्रतिष्ठितपणा व बोज या गोष्टी हव्या असतात. 'कर्मचारी', 'सेवा-योजन' वगैरे शब्द याच दृष्टिकोनातून स्वीकारायचे आहेत. ते झिडकारून, केवळ रूढ आहेत म्हणून त्या जागी 'नोकरवर्ग', 'रोजगार', वगैरे शब्द चालू देणे सामान्य भाषेहून विशिष्ट स्वरूपाच्या प्रशासनिक भाषेला शोभून दिसणार नाही. याच दृष्टीने 'नोंदणीदार' (Registrar),

'देखरेखदार' (Supervisor), 'पहाणीदार' (Surveyor) ही नावे किंवा 'रस्ता वाहतूक महामंडळ', 'रोजगार विनिमय केंद्र' अशी अभिधाने बदलून त्या जागी 'निबंधक', 'पर्यवेक्षक', 'सर्वेक्षक', 'मार्ग परिवहन महामंडळ', 'सेवायोजन केंद्र' या संज्ञा रूढ करणे अधिक योग्य ठरेल. सोपेपणाचा दंडक स्वीकारला व सामान्य जनतेत रूढ असलेले शब्दच तेवढे घ्यायचे झाले तर 'ग्रामसेवक' या शब्दासाठी 'गावनोकर' किंवा 'गावचाकर' असा पर्याय रूढ करावा लागेल. 'ग्रामसेवक' यासारखे शब्द जर आज खेड्यापाड्यांत रूढ होऊ शकतात तर 'निबंधक', 'सर्वेक्षक' 'परिवहन', 'सेवायोजन' वगैरे शब्द सामान्य जनतेच्या तोंडी रुळणार नाहीत असे का समजावे ?

सामान्य स्वरूपाच्या परिभाषेतील काही रूढ व आकलन होण्याजोगे शब्द प्रशासनाच्या सोयीच्या व एकरूपतेच्या दृष्टीने बदलणेही कधी कधी आवश्यक ठरणार आहे. भारत सरकारच्या प्रत्यक्ष अंमलाखाली येणाऱ्या विभागांची व त्यातील पदांची नावे ही रूढ मराठीत वेगळी असतील तर, वरील कारणासाठीच बदलून घ्यावी लागतील. 'प्राप्तिकर' (Income-tax) हा शब्द मराठीत प्रचलित असला तरी केंद्र सरकार जर 'आयकर' म्हणत असेल तर तोच शब्द प्रशासनिक मराठीलाही घ्यावा लागेल. एकाच वेळी आणि त्यातूनही केवळ केंद्र सरकारच्या नियंत्रणाखाली येणाऱ्या पदांसाठी वेगवेगळे पर्याय घेणे शासनाच्या सोयीत बसणार नाही. Accountant General साठी भारत सरकारने मान्य केलेला 'महालेखापाल' हा शब्द वरील कारणासाठीच मान्य करावा लागतो. या किंवा अशाच इतर शब्दांतील General या पदासाठी 'सर' असा शब्द मराठी परंपरेशी जुळणारा म्हणून घ्यावा, असा युक्तिवाद करण्यात येतो. परंतु 'महा' हा शब्द सर्वोच्च पददर्शक म्हणून प्राचीन भारतीय परंपरेतलाच आहे (महाबलाधिकृत म्हणजे Field Marshal). एकरूप परिभाषेसाठी या प्राचीन परंपरेला मराठीचा विरोध असू नये.

मराठी वृत्तपत्रीय भाषेत आढळून येणाऱ्या आणखीही एक प्रवृत्तीचा परिभाषेच्या नव्या परंपरेच्या अनुषंगाने उल्लेख करणे जरूर आहे. वृत्तपत्रीय लिखाणात वेळेला महत्त्व असल्यामुळे सुचतील ते पर्याय वापरून किंवा वेळेवर पर्याय आढळला नाही तर इंग्रजी शब्दच आहे तसा ठेवून वेळ भागवण्याची प्रवृत्ती अशा लिखाणात निर्माण झालेली आढळून येते. कधी या प्रवृत्तीमुळे, तर कधी सामान्य व्यवहारात सुशिक्षित वर्ग जो संकर भाषाप्रयोग करतो त्यातील कित्येक इंग्रजी शब्द अंगवळणी पडल्यामुळे वृत्तपत्रीय भाषेने बरेच इंग्रजी शब्द 'रूढ' केले. प्रतिशब्द उपलब्ध असतानाही किंवा तसा तो सहज तयार करता येणे शक्य असताही इंग्रजी शब्द वापरण्याची प्रवृत्ती मराठीतील स्वतंत्र परिभाषानिर्मितीच्या दृष्टीने अनिष्टच म्हणावी लागेल. 'अंगवळणी पडलेले, स्वाभाविक जिभेच्या टोकावर येणारे ते रूढ', या कल्पनेनुसार सामान्य मराठीत 'कोर्ट', 'कमिशन', 'कॉलेज', 'सोसायटी', 'फंड', 'कलेक्टर', 'आफिस', 'कॉर्पोरेशन', 'कॉलनी' इत्यादी अनेक शब्द रूढ म्हणून वापरले जातात. पण परिभाषेच्या लक्षणांनुसार व गरजांनुसार त्यांचा पारिभाषिक शब्द म्हणून स्वीकार करणे योग्य ठरणार नाही. भाषेत ज्यांची मुळे खोल रुजली आहेत अशा परकीय रूढ शब्दांची गोष्ट वेगळी आहे. परंतु वर उल्लेखिलेल्या प्रवृत्तीनुसार वृत्तपत्रे वापरीत असलेले इंग्रजी शब्द रूढ समजून परिभाषेच्या सुसंघटित व्यवस्थेत त्यांना स्थान देण्याचा आग्रह धरणे योग्य होणार नाही. मराठीतील श्रेष्ठ व ज्येष्ठ वृत्तपत्रे-सुद्धा असे इंग्रजी शब्द आजही वापरीत आहेत.[१]

राज्यकारभाराच्या विशिष्ट स्वरूपाच्या भाषेला व तिच्यातील परिभाषेला स्थिर स्वरूप द्यायचे असेल तर वृत्तपत्रांनी रूढतेची उपरिनिर्दिष्ट कल्पना बदलली पाहिजे व अनावश्यक इंग्रजी शब्दांचा प्रयोग टाळून त्या जागी मान्य परिभाषा रूढ केली पाहिजे. नवी परिभाषा रूढ करण्याच्या कामी वृत्तपत्रे महत्त्वाची कामगिरी बजावू

[१] अशा काही शब्दांची यादी परिशिष्ट ३ मध्ये पहावी.

शकतात. या परिभाषेतील अनेक शब्द आज सामान्य जनतेतही रुळले आहेत याचे कारण ते वृत्तपत्रीय भाषेत जागरूकतेने व जाणीवपूर्वक वापरण्यात येत आहेत हेच होय.

**नव्या परिभाषेचे 'मराठी' स्वरूप**

वृत्तपत्राद्वारे व अन्य प्रकाराने प्रचलित झालेल्या परिभाषेचा वर सविस्तर विचार केला. यापैकी अनेक शब्द रूढ झालेले असले तरी परिभाषेच्या व राज्यकारभाराच्या भाषेच्या गरजा लक्षात घेता, ते बदलणे कसे व का आवश्यक आहे, हेही पाहिले. पण याचा अर्थ सर्वच रूढ शब्द बदलतील आणि त्या जागी अपरिचित संस्कृत शब्द येतील, असा नव्हे. परिभाषेच्या लक्षणांत बसू शकतील असे लहानमोठ्या व्यवसायांतील व उद्योगधंद्यांतील शुद्ध मराठी शब्द आहेत तसेच स्वीकारणे योग्य ठरेल. या दृष्टीने ओतशाळा, कताईकाम, जोडकाम, जोडारी, जुळारी, घडकामी, घणकरी, खरात, लाखरंगण, मुकादम, कोतवाल, मापारी, राखणदार, अशा अनेक रूढ शब्दांना परिभाषेत स्थान मिळू शकेल. असे शब्द परिभाषा म्हणून घेण्यात यावे, अशी भाषा आयोगानेही शिफारस केलीच आहे. परिभाषा शक्यतोवर एकरूप असावी, असा भाषा आयोगाचा दृष्टिकोन असला तरी भाषेच्या मूळ प्रकृतीशी जुळू शकत नाहीत असे एकरूप परिभाषेतील शब्द बदलण्याचे वा भाषेच्या प्रकृतीनुसार नवे तयार करण्याचे स्वातंत्र्यही आयोगाने मान्य केले आहे. मराठीच्या प्रकृतीनुसार Nursery—रोपमळा, Mutation—नोंदबदल, Progeny Testing—पैदास चाचणी, Filer—फाईलकरी, Gin—पिंजण-गिरणी, House of Correction—सुधारघर, Copyist—नकलनवीस असे मराठी वळणाचे कितीतरी शब्द ही परिभाषा आत्मसात करू शकेल. परंतु अशाच पद्धतीने सुटसुटीत ठरतील असे निश्चित अर्थाचे व कळण्याजोगे संस्कृत वळणाचे शब्द तयार करता आले, तर तेही घेण्याची भाषेची तयारी पाहिजे. मराठीतील परिभाषेची प्रवृत्ती संस्कृतानुसारी आहे, हे आपण पाहिलेच आहे. Horticulture—उद्यानविद्या,

Plastic Surgery—सुघटन शल्यचिकित्सा, Orthopaedics—अस्थि-व्यंगोपचार, Jurisprudence—विधिमीमांसा, Quarter Master—सामग्री प्रबंधक, Comptroller of Household—परिवारप्रबंधक, Aviation—विमानचालन, Passport—पारपत्र, Visa—प्रवेशपत्र, Executive—कार्यांग, Judiciary—न्यायांग, Legislative—विधानांग, Distillery—आसवनी, Model—प्रतिमान, Negative—व्यस्तचित्र, Offset printing—प्रतिरूपमुद्रण, Lino-type—पंक्तिमुद्रण, Honorary—मानसेवी, Stipendiary—वृत्तिधारी असे किती तरी संस्कृतनिष्ठ पण समर्पक पारिभाषिक शब्द मराठीला सहज आपले म्हणता येतील व रूढ करता येतील.

भारतीय परिभाषेची एकरूपता राखण्याच्या धोरणामुळे अथवा परिभाषेच्या लक्षणांनुसार अन्वर्थक पर्याय शोधण्याच्या वा तयार करण्याच्या खटाटोपामुळे मराठीतील आज वापरात असलेला प्रशासनोपयोगी सर्वच शब्दसंग्रह टाकाऊ ठरतो, आणि त्या जागी 'क्लिष्ट, दुर्बोध व बोजड' संस्कृत शब्द घ्यावे लागतात, असा याचा अर्थ नाही. 'मराठी भाषेचे शुद्धिकरण' अथवा 'संस्कृतीकरण' करण्याचे उद्दिष्ट पुढे ठेवून राज्यकारभाराची परिभाषा तयार करणे हे कोणालाही पटणारे नव्हे. शुद्ध मराठी स्वरूपाची अन्वर्थक परिभाषा, जुन्या संस्थानी राजवटीत रूढ असलेल्या राज्यकारभाराच्या मराठीतील अर्थवाहक शब्द व वाक्प्रयोग आणि नव्या परिभाषाव्यवस्थेत चपखल बसणारे मराठीने आत्मसात केलेले अर्थसुलभ इंग्रजी वा फार्शी शब्द यांना त्यांचे योग्य ते स्थान देणे, हे केव्हाही उचितच ठरेल. शुद्ध मराठी वळणाची सलग अशी पुढीलसारखी शब्दकुले ही मराठी परिभाषेच्या स्वरूपाशी विसंगत ठरणार नाहीत :

| | | |
|---|---|---|
| Concession | .. | सवलत |
| Remission | .. | सूट |
| Commission | .. | अडत |
| Discount | .. | कसर |
| Deduction | .. | वजात |
| Set off | .. | वजावट |

इंग्रजी वा फार्शी शब्दांचा बहिष्कार करणे या नव्या परिभाषेला अपरिहार्य ठरेल असेही समजण्याचे कारण नाही. बँक, पासबुक, रेडिओ, अपील, इंजिन, गॅस, बुलेटिन, प्लॅटून, फी, बँड, बेकिंग, शेरीफ असे अनेक इंग्रजी शब्द ही परिभाषा सामावून घेऊ शकेल. फार्शी शब्द ही तर एका अर्थी महाराष्ट्राने पूर्वीच्या आपल्या जेत्यांकडून घेतलेली भाषिक खंडणीच होय. ते धन परक्याचे समजणे म्हणजे मराठीच्या भाषिक घडणीचा विसर पडणे होय. हुकुमनामा, करारनामा, जामीन, रुजुवात, दाखला, दस्तऐवज, रहदारी, जप्ती, कब्जा, बंदोबस्त, अर्ज, फौजदारी, दिवाणी असे कित्येक शब्द मराठी भाषेने जसे आत्मसात केले तसे मराठी परिभाषेलाही आपले म्हणावे लागतील.

मराठीच्या शासनविषयक परिभाषेचे उद्याचे चित्र हे असे राहील. राज्यकारभाराची भाषा म्हणून मराठीचा विकास घडवून आणायचा याचा अर्थ तिच्या परिभाषेची शास्त्रीय पद्धतीवर व योजनाबद्ध रीतीने वाढ करण्याची एकदाच करण्यात आली आहे. ही मराठी आपले मराठीपण खोडील, तिच्या शतकानुशतके चालत आलेल्या परंपरेपासून वेगळी पडेल, अशी कल्पना करण्याचे कोणतेच कारण नाही. शास्त्रीय विषयांची, तसेच अन्य तांत्रिक, व्यावसायिक क्षेत्रांतील मराठी परिभाषा आजही वेगळी आहे म्हणून ती मराठी भाषेचा भाग नाही, असे कोणी समजत नाही. शास्त्रीय पद्धतीने एखाद्या गोष्टीचा विकास होऊन जे काही निर्माण होईल ते पत्करण्याची मात्र तयारी पाहिजे. विकासात नव्याची निर्मिती असते, तशीच जुन्याची पुनर्रचनाही असते. मराठी परिभाषेला व्यवस्थाबद्धता आणणे, जुन्याच्या पुनर्घडणीची तयारी ठेवणे आणि कालोचित व व्यापक अशी दृष्टी ठेवून नवे पत्करणे, हाच मराठी राजभाषेच्या विकासाचा अर्थ होय. परंपरा, व्यवस्था, साधने या साऱ्या गोष्टी समाजासाठीच असतात ; समाज त्यांच्यासाठी नसतो. समाज जेथे परंपराशरण असतो तेथे त्याच्या प्रगतीचा रोधच होतो, तो प्रतिगामी ठरतो. आणि सरतेशेवटी मराठी समाजच नव्हे,

तर भारतातील सर्वच भाषिक समाज हे भारतासाठीच नाहीत काय? मराठी राजभाषेच्या विकासातून कदाचित हेच भारतीय एकात्मतेचे दर्शन घडणार असेल. आणि हे घडावे अशीच प्रादेशिक भाषा राजभाषा ठरवताना भारताची दृष्टी असेल. महाराष्ट्रीय दृष्टिकोनात राष्ट्रीय दृष्टिकोन अंतर्भूत आहेच.

# परिशिष्ट १

## रूढ झालेली राज्यकारभारविषयक नवी परिभाषा

| | |
|---|---|
| Act | अधिनियम |
| Administration | प्रशासन |
| Administrator | प्रशासक |
| Agriculture Minister | कृषी मंत्री |
| All India Radio | आकाशवाणी |
| Ambassador | राजदूत |
| Bill | विधेयक |
| Central Government | केंद्र सरकार |
| Central Secretariat | केंद्रीय सचिवालय |
| Chairman | सभापती |
| Circular | परिपत्रक |
| Civil Procedure Code | व्यवहार प्रक्रिया संहिता |
| Commission | आयोग |
| Court | न्यायालय |
| Criminal Procedure Code | दंड प्रक्रिया संहिता |
| Decentralisation | विकेंद्रीकरण |
| Deputation | प्रतिनियुक्ती |
| Deputy Secretary | उपसचिव |
| Finance Department | वित्त विभाग |
| Forest Range Officer | वनपरिक्षेत्राधिकारी |
| Government | शासन |
| Government House | राजभवन |
| Governor | राज्यपाल |
| Grant | अनुदान |
| House of States | राज्यपरिषद |
| Home Minister | गृह मंत्री |
| Income-tax | आयकर |
| Indian Penal Code | भारतीय दंड संहिता |
| Increment | वेतनवाढ |

| | |
|---|---|
| Leather Industry .. | .. चर्मोद्योग |
| Legislative .. | .. वैधानिक |
| Legislative Assembly | .. विधानसभा |
| Legislative Council .. | .. विधानपरिषद |
| Legislature .. | .. विधानमंडळ |
| Liaison Officer .. | .. संपर्क अधिकारी |
| Maharashtra Housing Board | .. महाराष्ट्र गृहनिर्माण मंडळ |
| Member .. | .. सदस्य |
| Ministry .. | .. मंत्रालय |
| Notification .. | .. अधिसूचना |
| Office .. | .. कार्यालय |
| Official Language .. | .. राजभाषा |
| Order .. | .. आदेश |
| Parliament .. | .. संसद |
| Pension .. | .. निवृत्तिवेतन |
| Planning .. | .. नियोजन |
| President .. | .. राष्ट्रपती |
| Probation period .. | .. परिवीक्षावधी |
| Procedure .. | .. प्रक्रिया |
| Proceedings .. | .. कार्यवाही |
| Proposal .. | .. प्रस्ताव |
| Proposed .. | .. प्रस्तावित |
| Rigorous Imprisonment | .. सश्रम कारावास |
| Scale of Pay .. | .. वेतनश्रेणी |
| Secretariat .. | .. सचिवालय |
| Secretary .. | .. सचिव |
| Session .. | .. सत्र |
| Small Scale Industries | .. लघु उद्योग |
| Standard .. | .. मानक |
| Store .. | .. भांडार |

| | | | |
|---|---|---|---|
| Supervision | .. | .. | पर्यवेक्षण |
| Supervisor | .. | .. | पर्यवेक्षक |
| Supreme Court | .. | .. | सर्वोच्च न्यायालय |
| Telephone | .. | .. | दूरध्वनी |
| Tender Notice | .. | .. | निविदा सूचना |
| Town Planning | .. | .. | नगर रचना |
| Trained | .. | .. | प्रशिक्षित |
| Trainee | .. | .. | प्रशिक्षार्थी |
| Training | .. | .. | प्रशिक्षण |
| Transfer | .. | .. | हस्तांतरण |
| Water Resources | .. | .. | जलसंपत्ती |

## परिशिष्ट २

### मराठी वृत्तपत्रे, नियतकालिके इत्यादींमधून आढळणारे संज्ञानिक शब्द

| शब्द | पर्यायी इंग्रजी शब्द | वृत्तपत्र अथवा नियत-कालिक |
|---|---|---|
| अणुस्थिति | .. Molecular state | .. शेतकी आणि शेतकरी ३.६१ पृ. १२ |
| अंत:केंद्रित | .. Convergent | .. आरोग्य मंदिर ३.६२ पृ. १६ |
| अंतराळ स्थानक | .. Space Station | .. किर्लोस्कर ४.६२ पृ. ५० |
| अंत:स्रावी ग्रंथी | .. Endocrine gland | .. आरोग्य मंदिर ४.६२ पृ. १८ |
| अधिकोष | .. Treasury | .. सहकारी जगत ३.६१ |
| अधोमंडल | .. Troposphere | .. अमृत १.६२ पृ. ५० |
| अंतराळयान | .. Rocket | .. केसरी ८.९.६१ पृ. १ |
| अपकृत्य | .. Tort | .. न्यायबोध १०.६१ पृ. ४७० |
| अभिप्रमाणित | .. Attested | .. न्यायबोध ९.६१ पृ. २३ |
| अर्ध स्वयंचलित | .. Semi Auto operated | संपदा १०.६१ पृ. ४० |
| अवकाशयान | .. Spaceship | .. किर्लोस्कर ४.६२ पृ. ५१ |
| आचारभ्रष्ट | .. Corrupt | .. तरुण भारत २४.९.६१ पृ. ६ |
| आचारसंहिता | .. Code of conduct | .. मराठा २०.११.६१ |
| आंतरराष्ट्रीय मौद्रिक | .. International Currency | व्यापारी मित्र ९.६१ पृ. २ |
| अधिस्वनिक | .. Supersonic | .. उद्यम ९.६१ पृ. ४९४ |
| इष्टोष्णतादायक | .. Air conditioned | .. वैभव ९.६१ पृ. १९ |
| उच्चाधिकार मंडळ | .. High Power Commission | केसरी ८.९.६१ पृ. ३ |

## परिशिष्ट २—चालू

| शब्द | पर्यायी इंग्रजी शब्द | वृत्तपत्र अथवा नियतकालिक |
|---|---|---|
| उत्तरदायित्व | Responsibility | शब्दरंजन दिवाळी ६२ पृ. २०६ |
| उपन्यास | Commencement | केसरी १०.९.६१ पृ. ३ |
| ऊर्ध्वमंडल | Stratosphere | अमृत १.६२ पृ. ४९ |
| उर्ध्वस्थ प्रणालिका | Aqueducts | जीवन शिक्षण १०.६१ पृ. २१० |
| कर्षुकीय द्रवणता | Magnetic susceptibility | सृष्टिज्ञान ९.६१ पृ. ५०५ |
| किण्व | Yeast | उद्यम ११.६२ पृ. ६१४ |
| किरणउत्सर्जन | Radio-activity | केसरी ३.९.६१ पृ. १ |
| चयापचयक्षम | Metabolisable | बहर ५.६२ पृ. २१ |
| चलन विप्रेषण | Remittance | सहकारी जगत ५.६१ |
| चाप विद्युन्मोच | Arc discharge | संपदा ११.६२ पृ. ६२० |
| जंतुघ्न | Germicide | हंगाम ९.६१ पृ. २५ |
| जलोघनिर्मित वीजशक्ती | Hydro-electric power | वैभव १०.६१ पृ. ४८ |
| तालतंतु | Coir | संपदा ४.६२ पृ. ६० |
| दुग्धाम्ल | Lactic acid | किर्लोस्कर ४.६२ पृ. ८९ |
| नवनिर्मायिक | Creative | किर्लोस्कर ६.६२ पृ. ९७ |
| निर्देशांक | Index Number | बहर ५.६१ |
| निरामिष | Vegetarian | चित्रमय जगत ६.६२ पृ. ४३ |
| निर्जंतुक | Sterilized | उद्यम ११.६२ पृ. ६४४ |
| नीलातीत | Ultra voilet | साहित्य सहकार १२.६२ पृ. १० |
| परिभाषण | Symposium | वैभव ९.६१ पृ. १८ |
| परिसंवाद | Seminar | केसरी २४.९.६१ पृ. ४ |

| शब्द | | पर्यायी इंग्रजी शब्द | | वृत्तपत्र अथवा नियत-कालिक |
|---|---|---|---|---|
| पृष्ठवंशीय प्राणी | .. | Chordates | .. | केसरी १७.११.६१ |
| प्रयत्न प्रमाद पद्धती | .. | Trial and Error method | | शिक्षण पत्रिका ९.६१ पृ. ७ |
| प्रवेशिका | .. | Pass | .. | वसुधा, दिवाळी ६२ पृ. ३६ |
| बाष्पीभवन पात्र | .. | Evaporator | .. | शेतकी आणि शेतकरी ९.६१ पृ. ८४–८५ |
| भिन्नत्वकारक परिगती | .. | Differentiation | .. | नवभारत ११.६१ पृ. ४५ |
| लोकप्रसादन | .. | Public relations | .. | वैभव ९.६१ पृ. १८ |
| विकिरण | .. | Scattering | .. | सृष्टिज्ञान ९.६१ पृ. ५०४ |
| सत्यदमन | .. | Fact-hiding | .. | मराठा ७.९.६१ पृ. २ |
| सत्यान्वेषण | .. | Fact-finding | .. | आलमगीर ३.९.६१ पृ. ३ |
| संवाहक मार्ग | .. | Transmission Line | | संपदा ११.६२ पृ. ५२९ |
| साविका | .. | Midwife | .. | आरोग्य मंदिर ६.६२ पृ. १७ |
| सूचिका | .. | Injection | .. | किर्लोस्कर ९.६१ पृ. ३५ |
| सेंद्रिय | .. | Organic | .. | बहर ५.६१ पृ. ३ |
| स्पर्धक | .. | Contestor | .. | दीपलक्ष्मी १.६३ पृ. ३९ |
| स्फुल्लिग विद्युन्मोच | .. | Spark discharge | .. | संपदा ११.६२ पृ. ६२० |
| स्वनिर्भर दाबयंत्र | .. | Automatic Press | .. | उद्यम ६.६१ |
| स्वागतिका | .. | Receptionist | .. | सृष्टीज्ञान ११.६१ पृ. ६७७ |
| हरितद्रव्य | .. | Chlorophyll | .. | बहर |
| क्षेपणास्त्र | .. | Missile | .. | नवशक्ति १९.९.६१, पृ. १ |

## परिशिष्ट ३

### मराठी प्रतिशब्द असताना वृत्तपत्रांतून वापरात असलेले इंग्रजी शब्द

| इंग्रजी शब्द | वृत्तपत्र | मराठी प्रतिशब्द |
| --- | --- | --- |
| गव्हर्नमेंट ट्रेझरी | .. लोकसत्ता १-७-६३ | सरकारी खजिना |
| कोर्ट | .. लोकसत्ता १-७-६३ | न्यायालय |
| सोसायटी | .. लोकसत्ता १-७-६३ | संस्था |
| पोलीस स्टेशन | .. लोकसत्ता १-७-६३ | पोलीस ठाणे |
| कॉलेज | .. लोकसत्ता १-७-६३ | महाविद्यालय |
| रिझर्व्हॉयर | .. लोकसत्ता १-७-६३ | हौद, टाकी |
| एम्प्लॉयमेंट एक्स्चेंज | .. लोकसत्ता २-७-६३ | नोकरी कार्यालय, रोजगार विनिमय केंद्र |
| जी. पी. ओ. | .. लोकसत्ता २-७-६३ | मोठे/मुख्य पोस्ट ऑफिस |
| कमिशन | .. लोकसत्ता २-७-६३ | अडत, दलाली |
| नोटीस | .. लोकसत्ता ४-७-६३ | सूचना |
| ओव्हरटाईम | .. नवशक्ति २-७-६३ | जादा वेळ |
| हायस्कूल | .. नवशक्ति २-७-६३ | विद्यालय, उच्च विद्यालय |
| फंड | .. नवशक्ति २-७-६३ | निधि |
| हाउसिंग सोसायटी | .. नवशक्ति २-७-६३ | गृहनिर्माण संस्था |
| फाउंडेशन | .. महाराष्ट्र टाइम्स ८-४-६३ | धर्मादाय संस्था |
| हॉस्पिटल | .. महाराष्ट्र टाइम्स ३१-७-६३ | दवाखाना, रुग्णालय |
| अवॉर्ड | .. महाराष्ट्र टाइम्स ३१-७-६३ | पारितोषिक, पुरस्कार |
| काँग्रेस हायकमांड | .. महाराष्ट्र टाइम्स ३१-७-६३ | काँग्रेसश्रेष्ठी |
| पार्लमेंटरी बोर्ड | .. महाराष्ट्र टाइम्स ३१-७-६३ | संसदीय मंडळ |

## परिशिष्ट ३—चालू

| इंग्रजी शब्द | | वृत्तपत्र | मराठी प्रतिशब्द |
|---|---|---|---|
| कॉलर | .. | महाराष्ट्र टाइम्स ३१—७—६३ | पट्टी |
| कलेक्टर | .. | महाराष्ट्र टाइम्स ३१—७—६३ | जिल्हाधिकारी |
| डॉक | .. | मराठा ३१—७—६३ | गोदी |
| सुप्रीम कोर्ट | .. | मराठा ३१—७—६३ | सर्वोच्च न्यायालय |
| मेडिकल कॉलेज | .. | केसरी २४—७—६३ | वैद्यक महाविद्यालय |
| फोन | .. | केसरी २४—७—६३ | दूरध्वनि, दूरभाष |
| पोलीस पार्टी | .. | केसरी २४—७—६३ | पोलीस पथक/तुकडी |
| क्लार्क | .. | केसरी २४—७—६३ | कारकून |
| कॅनॉल | .. | केसरी २४—७—६३ | कालवा, पाट |
| ऑफिस | .. | केसरी २४—७—६३ | कार्यालय |
| केस | .. | केसरी २५—७—६३ | प्रकरण |
| लोकलबोर्ड | .. | केसरी २५—७—६३ | स्थानिक मंडळ |
| मार्केटिंग | .. | केसरी २५—७—६३ | खरेदी-विक्री |
| जनरल मीटिंग | .. | केसरी २५—७—६३ | सर्वसाधारण सभा |
| हायकोर्ट | .. | केसरी २६—७—६३ | उच्च न्यायालय |
| डायरेक्टर | .. | केसरी २६—७—६३ | संचालक |
| कॉर्पोरेशन | .. | केसरी १२—७—६३ | महानगरपालिका |
| जनरल बॉडी | .. | केसरी १२—७—६३ | सर्वसाधारण सभा |
| सेंट्रल रेल्वे | .. | केसरी १२—७—६३ | मध्य रेल्वे |
| ऑडिटर्स | .. | केसरी १२—७—६३ | हिशोबतपासनीस |
| कॉलनी | .. | केसरी १२—७—६३ | वसाहत |
| कॉंट्रॅक्टर | .. | केसरी १३—७—६३ | कंत्राटदार, ठेकेदार |
| पोस्टखाते | .. | केसरी १३—७—६३ | टपालखाते |
| स्टेट फार्म | .. | महाराष्ट्र टाइम्स ५—७—६३ | सरकारी मळा |

| इंग्रजी शब्द | वृत्तपत्र | मराठी प्रतिशब्द |
|---|---|---|
| डेप्युटी कलेक्टर | .. महाराष्ट्र टाइम्स ५–७–६३ | उपजिल्हाधिकारी |
| मॅनेजर | .. महाराष्ट्र टाइम्स ३–७–६३ | व्यवस्थापक |
| फेडरेशन | .. महाराष्ट्र टाइम्स ४–७–६३ | संघ |
| जज्ज | .. महाराष्ट्र टाइम्स ४–७–६३ | न्यायाधीश |
| बॉंड | .. महाराष्ट्र टाइम्स ४–७–६३ | बंधपत्र |
| फर्स्ट इयर | .. महाराष्ट्र टाइम्स ४–७–६३ | प्रथम वर्ष |
| एक्साइज ड्यूटी | .. महाराष्ट्र टाइम्स ४–७–६३ | अबकारी कर |

# आधारभूत संदर्भ–साहित्य

## ग्रंथ


१. अर्वाचीन महाराष्ट्रेतिहासकालातील राज्यकारभाराचा अभ्यास — शं. ना. जोशी (पुणे विद्यापीठ प्रकाशन, १९५९)

२. अर्थविज्ञान और व्याकरण दर्शन .. डॉ. कपिलदेव द्विवेदी, आचार्य (हिन्दुस्तानी एकेडेमी, अलाहाबाद, १९५१)

३. आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांति .. डॉ. कृ. भि. कुलकर्णी, १९५६

४. मराठी लोकांची संस्कृति .. डॉ. इरावती कर्वे (आवृत्ती २ री), १९६२

५. भाषा आणि संस्कृति .. डॉ. ना. गो. कालेलकर, मौज प्रकाशन, १९६२

६. महाराष्ट्र भाषाभ्यास .. य. रा. दाते

७. यादवकालीन मराठी भाषा .. डॉ. शं. गो. तुळपुळे, १९४२

८. पेशवे दप्तरांतील मराठी भाषेचे स्वरूप डॉ. गं. बा. ग्रामोपाध्ये, १९४१

९. मराठेकालीन समाजदर्शन .. शं. ना. जोशी, १९६०

१०. निबंधमाला .. विष्णुशास्त्री चिपळूणकर

११. विचारतरंग .. द. के. केळकर, १९५२

१२. शिवचरित्र साहित्य, खंड ३ रा .. सं.—शं. ना. जोशी

१३. मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड २० वा सं.—वि. का. राजवाडे

१४. पेशवे दप्तर, भाग ३१ वा .. सं.—गो. स. सरदेसाई

१५. पंतअमात्य बावडा दप्तर

१६. जत संस्थान दप्तर

१७. सांगली ग्याझिट, १८९४

१८. मिरज सिनियर स्टेट गॅझेट, १९४४

१९. हिंदुस्थानांतील टेलिग्राफसंबंधी आक्ट, १८८५

२०. सन १९४७ चा मुंबईचा आक्ट नं. ५७

२१. भारताचे संविधान (मराठी) [ ६ जानेवारी १९६० पर्यंत रूपभेद केलेले ]

२२. महाराष्ट्र सरकारचे गॅझेट, जानेवारी १९६३

| | | |
|---|---|---|
| २३. | Language in the Modern World | Simeon Potter (1960), Penguin Books |
| २४. | The Spirit of Language in Civilization | Karl Vossler (1951), London |
| २५. | Words and their Use .. | Stephen Ullman (1951), London |
| २६. | Language in Thought and Action | S. I. Hayakawa (1952), London |
| २७. | Language in Society .. | M. M. Lewis |
| २८. | The Story of Language .. | Mario Pei |
| २९. | Language, its Nature, Development and Origin | Otto Jesperson |
| ३०. | People in Quandaries .. | Wendell Johnson |
| ३१. | Aspects of Translation Studies in Communication 2 | Secker and Warburg, 1958 |
| ३२. | The Problem of Scientific and Technical Terminology | Dr. D. S. Kothari, 196[illegible] |
| ३३. | The Constitution of India .. | Govt. of India |
| ३४. | Handbook of General Circulars | Govt. of Maharashtra |

अहवाल

| | | |
|---|---|---|
| ३५. | Report of the States' Reorganization Commission | Govt. of India, 1955 |
| ३६. | Report of the Official Language Commission | Govt. of India, 1956 |
| ३७. | Report of the Committee of Parliament on Official Language | Govt. of India, 1958 |
| ३८. | The Use of Vernacular Languages in Education | UNESCO Report, 1953 |

३९. Scientific and Technical Translating and other Aspects of Language Problem — UNESCO Report, 1957

## कोश

४०. Webster's Dictionary of Synonyms

४१. The Great English-Hindi Dictionary — Dr. Raghavir

४२. Chember's Technical Dictionary

४३. Everyman's Encyclopaedia

४४. Engineering Encyclopaedia

४५. List of Technical Terms in Hindi (General Administration, Defence, Commerce) — Govt. of India

४६. ज्ञानकोश .. डॉ. केतकर

४७. शास्त्रीय परिभाषा कोश .. दाते-कर्वे

४८. [illegible]

४९. महाराष्ट्र शब्दकोश .. दाते

५०. राज्यव्यवहारकोश .. सं.—रा. गो. काटे

५१. अर्वाचीन राज्यव्यवहारकोश .. मधुकर वामंत

५२. पदनामकोश .. महाराष्ट्र शासन, १९६२

५३. मराठी संसदीय प्रथावली व वाक्संहिता — महाराष्ट्र विधानमंडळ, सचिवालय, १९६६.

## नियतकालिके

५४. भाषा (त्रैमासिक) अंक १, २, ३, ४ .. १९६१, ६२ केंद्रीय हिंदी निदेशालय दिल्ली.

५५. धर्मयुग (हिंदी साप्ताहिक), २१ एप्रिल १९६३ — मुंबई

५६. मनोहर, जानेवारी १९६३ .. पुणे

५७. महाराष्ट्र साहित्य पत्रिका, ऑक्टोबर १९६२ — पुणे

आणि केसरी, मराठा, महाराष्ट्र टाइम्स, नवशक्ति इत्यादी दैनिके.